वि. का. राजवाडे

केशवाचार्यादिकृत

# महिकावतीची
ऊर्फ
# माहिमची बखर

॥ आद्यशक्ति महाराष्ट्रधर्मरक्षिका तुम्हां सुप्रसन्न असो ॥

—केशवाचार्य—

मुद्रक व प्रकाशक—शंकर नरहर जोशी, चित्रशाळा प्रेस, १०२६
सदाशिव पेठ, पुणें सिटी

शक १८४६



किंमत अडीच रुपये

# अनुक्रमणिका



**रकाना**

॥ श्री ॥

# महिकावतीची बखर



## प्रस्तावना

१ कल्याणचे सदाशिव महादेव दिवेकर यांनीं वसईचे हिरा हरि भंडारी शेषवंशी यांज कडून मिळवून ही बखर प्रकाशनार्थ माझ्या हवालीं केली. सुटी किंवा पोथीवजा नसून, बखर बांधीव पुस्तकवजा आहे. एकंदर पत्रें किंवा पानें ६९ व पृष्ठें १३८. पानाची लांबी १२ इंच व रुंदी ८ इंच. पृष्ठास ओळी २५ पासून २७. अक्षर बाळबोध, टपोरें, लहान चिंचोक्या एवढें. ओळीस अक्षरें २५ पासून ३०. कागद फुलस्केप असून, त्याच्या गर्भांत MAGNANI हीं रोमन अक्षरें स्पष्ट दिसतात. पानें, पृष्ठें, ओळी व अक्षरें सर्व येथून तेथून शाबूत आहेत. अक्षराचा संदिग्धपणा प्रायः कोठें हि नाहीं. बखर लिहून झाल्या वर, ती पुस्तकबांध्या कडे बांधण्यास गेली. पुस्तकबांध्यानें समास कांपतांना मथळ्या वरील पानाचें आंकडे कोठेंकोठें छाटले आहेत, त्या वरून दिसतें कीं मूळ पानाची लांबी १२ इंचा हून व रुंदी ८ इंचा हून अर्धा पाव इंच जास्त असावी. मूळ नकलकारानें चोहो बाजूंनीं समासाची माया सडकून ठेविल्या मुळें, पुस्तकबांध्याच्या अडाणी हाता करवीं बखरीला इजा बहुतेक बिलकुल पोहोंचली नाहीं.

२ बखरीची समाप्ति अशी:—" शके १७४१ प्रमाथिनामसंवत्सरे माहे वैशाखशुद्धप्रतिपदा रविवासरे ते दिवसी वंषावळिलेख समाप्तः ॥ हस्ताक्षर वालजी पाटिल सिंधे शेषवांशि वस्ति वसइ बाहादरपुरा हे वंषावळिची पोथी राजश्री हीराजी रामजी राउत सिंधे शेषवंशी वस्ती वसइ बाहादरपुरा यांची असे ॥ पत्रे सुमार ॥ ६९ ॥ " शक १७४१ च्या वैशाखशुद्धप्रतिपदेस रविवार येतो. मित्ती बराबर आहे. अर्थात्, शक १८४६ च्या वैशाखशुद्धप्रतिपदेस ही बखर नक्कल करून बरोबर १०५ वर्षें झालीं. वसईचे हीराजी रामजी राउत सिंधे शेषवंशी यांच्या करितां वालजी पाटिल शिंदे शेषवंशी यानें ही नक्कल केली. वालजी पाटिलाचें अक्षर इतकें सुवाच्य व वळणदार आहे कीं नकलकार ब्राह्मणेतर असेल असा संशय सुद्धां, त्यानें आपलें नांव, गांव व आडनांव नमूद केलें नसतें तर, आला नसता. शक १७४१ त महाराष्ट्रांतील पाटिल लोकांना अक्षरओळख सुद्धां फारशी असण्याचा संभव नव्हता. असें असतां, वसईच्या त्या वालजी पाटलानें इतकें सुवाच्य व वळणदार अक्षर लिहावें हें सकृद्दर्शनीं आश्चर्य वाटण्यासारखें आहे. परंतु, मुंबईच्या इंग्रजांच्या अमला खालीं वसई प्रांत येऊन शक

१७४१ त सुमार पन्नास वर्षें झालीं होतीं हीं बाब लक्ष्यांत घेतली असतां, वालजी पाटील इतका अक्षरचंचू कसा झाला ह्या बाबीचा उलगडा होतो. शक १७४१ च्या पूर्वीं मुंबई बेटांत इंग्रज सरकारानें व मिशनऱ्यांनीं कांहीं मराठी व इंग्रजी शाळा काढल्या होत्या आणि त्या शाळांतून ब्राह्मण, प्रभू व इतर वरिष्ठ जातीचीं कांहीं मुलें शिकून सरकारी व व्यापारी नोकऱ्या मिळवीत. ह्या मुलांत वसईच्या पाटलांचीं व राउतांचीं कांहीं मुलें असण्याचा संभव आहे. अगदीं प्रथम मुंबईच्या ज्या घराण्यांस अक्षरविद्येची ओळख झाली त्या घराण्यांत राउतांचें घराणें प्रसिद्ध आहे.

३ ह्या नकलेला १०५ वर्षें झालीं, तेव्हां मूळ ग्रंथ नकले हून जुना असणार हें सांगावयाला नको च. किती जुना, एवढा च काय तो प्रश्न. अन्तःप्रमाणां वरून व बहिःप्रमाणां वरून ग्रंथाचा काळ ठरविण्याचा जो सर्वमान्य संप्रदाय तो ह्या ग्रंथास लावूं पाहतां प्रथमदर्शनीं च एक बाब वाचकाच्या लक्ष्यांत येते. ती ही कीं, ही बखर एक ग्रंथ नाहीं, अनेक गद्यपद्य प्रकरणांचा समाहार आहे. आजपर्यंत ज्या पांचपन्नास बखरी प्रसिद्ध झाल्या आहेत त्यां पैकीं कांहींत श्लोकादि पद्य मजकूर असलेला सर्वांच्या माहितीचा आहे. तेव्हां ह्या हि बखरींत ओव्यादि पद्य मजकूर आढळल्यास अपूर्व असें कांहीं च नाहीं. आज पर्यंत प्रसिद्ध झालेल्या बखरींत निवाडे, महजर, राजकीय पत्रें इत्यादींचा सारांशरूपानें किंवा दस्तऐवजी दाखला दिलेला जसा आढळतो तसा ह्या हि बखरींत निवाडे, महजर, इत्यादींचे दाखले आढळल्यास त्यांत हि अदृष्टपूर्व असें कांहीं च नाहीं, ह्या बखरींत गद्य आहे, पद्य आहे, निवाडे आहेत, हकीकती आहेत, लढायांचीं वर्णनें आहेत, वंशावळी आहेत, इतकें च नव्हे तर तीं तीं प्रकरणें लिहि-ल्याचे निरनिराळे अनेक काळ हि आहेत. उघड च झालें कीं ह्या बखरींत दिलेलीं निर-निराळीं प्रकरणें निरनिराळ्या काळीं स्वतंत्रपणें निरनिराळीं लिहिलीं गेलीं आणि नंतर निदान दोन वेळां तरी एकत्र गुंफिलीं जाऊन, शेवटीं सध्यां छापिलीं आहेत ह्या स्थितींत अगदीं अलीकडे म्हणजे दीड दोन शें वर्षां पूर्वीं एकवटलीं गेलीं. हा गुंफागुंफीचा खटा-टोप कसकसा होत गेला तें स्पष्ट कळण्या करितां, प्रथम बखरींतलि निरनिराळ्या प्रकर-णांची यादी देतों व प्रत्येक प्रकरणाचा रचनाकाल दर्शवितों.

## प्रकरण पहिलें

ह्या प्रकरणाचें नांव **पूर्वपरंपरा-वंशउत्पत्ती-वर्णावर्ण-व्याख्या.** हें सबंद ओवीपद्यांत लिहिलें आहे. ह्याचे दोन अध्याय असून पहिल्यांत ६९ ओव्या व दुसऱ्यांत ३०० ओव्या आहेत. पहिल्या अध्यायांत भविष्योत्तरपुराणान्तर्गत ब्रह्मोत्तरखंडाच्या व सह्याद्रिखंडाच्या आधारें वंशोत्पत्तिवर्णन केलें आहे. दुसऱ्या अध्यायांत त्या च आधारा वरून वंशावळ व वंशधर्मनिरूपण दिलें आहे. सह्याद्रिखंडनामक ग्रंथाचा आधार ज्या अर्थीं ह्या प्रकरणाला घेतला आहे त्या अर्थीं हें प्रकरण शक १५०० च्या सुमारास केव्हां तरी रचिलें गेलें असलें पाहिजे हें उघड आहे. तसें च "मछा पासुनि चारि ते नरहरी पर्यंत जाले कृती " इत्यादि श्लोक ज्या अर्थीं ह्या प्रकरणांत आला आहे त्या अर्थीं ह्या प्रकर-

णांत शक १६०० नंतर केव्हां तरी हा श्लोक घुसडला गेला असला पाहिजे. ह्या प्रकरणानें प्रस्तुत छापील बखरीचीं १ पासून ३१ पृष्टें व्यापिली आहेत. प्रकरणाचा कर्ता भगवान् दत्त म्हणून प्रकरणसमाप्तीस सांगितलें आहे.

## प्रकरण दुसरें

**ह्या प्रकरणाचें नांव राजवंशावळी.** ह्यानें प्रस्तुत छापील बखरीचीं ३ पासून ६२ पर्यंतचीं पृष्टें भरलीं आहेत. हें येथूनतेथून गद्य आहे. ह्याचा कर्ता केशवाचार्य. हें प्रकरण शक १३७० च्या फाल्गुनांत लिहिल्याचें केशवाचार्य सांगतो.

## प्रकरण तिसरें

ह्या प्रकरणाला **निवाडे व हकीकती** असें मी नांव देतों. ह्यांत एकंदर दहा लहानमोठे निवाडे व हकीकती आहेत. एक निवाडा संवत् १४५९ तला म्हणजे शक १३२४ तला आहे. तिसऱ्या प्रकरणाला प्रस्तुत ग्रंथाचीं ६२ पासून ७२ पर्यंतचीं दहा पानें खर्चीं पडलीं आहेत. प्रकरण सर्व गद्य आहे.

## प्रकरण चौथे

**ह्या प्रकरणाचें नांव श्रीचिंतामणिकौस्तुभपुराण.** सर्व प्रकरण ओवीपद्य आहे. एकंदर अध्याय चार. प्रस्तुत ग्रंथाचीं ७२ पासून ८८ पर्यंतचीं १७ पृष्टें हें प्रकरण आहे. ह्या प्रकरणाचा काळ कर्त्यानें दिला नाहीं. तत्रापि हें चिंतामणिकौस्तुभपुराण अथवा कौस्तुभचिंतामणिपुराण शक १५१६ च्या अगोदर केव्हां तरी लिहिलें गेलें असावें असें म्हणण्यास प्रमाण आहे. गर्सन ड कुन्हा याच्या The origin of Bombay ह्या पुस्तकाच्या ११९ व्या पृष्टा वर खालील वृत्त आहे:—One of the results of the conversion of the (पाठारा) Prabhus by the Portuguese was the production of a local native historian, who, when converted, became Caetano de Souza, and wrote a work in Portuguese entitled A Historia de Mahim, in 1594 A. D. He is said to have based his history on the Kaostubha—Chintamani for his account of the Prabhus. डसूझानें इसवीसन १५९४ त कौस्तुभचिंतामणि नांवाच्या ग्रंथाच्या आधारें **माहीमचा इतिहास** पोर्तुगीज भाषेंत लिहिला, म्हणून वरील वाक्यांत सांगितलें आहे. डसूझा हा मूळचा पाताण्या प्रभू होता व त्यानें कौस्तुभचिंतामणि हा ग्रंथ आधारास घेऊन १५९४ इसवींत माहीमचा इतिहास ज्या अर्थी लिहिला त्या अर्थी कौस्तुभचिंतामणि हा ग्रंथ १५९४ इसवीच्या म्हणजे शक १५१६ च्या अगोदर केव्हां तरी लिहिला गेला, हें निश्चित. हें प्रकरण पांचव्या प्रकरणाच्या नंतर म्हणजे शक १५०० च्या सुमारास लिहिलें गेलें असावें. प्रकरणाचा कर्ता भगवान् दत्त

म्हणून प्रकरणसमाप्तीस सांगितलें आहे. भगवान् नंद दत्त असें नांव प्रकरणप्रारंभीं दिलें आहे.

## प्रकरण पांचवें

**पाठारज्ञातिवंशावळि** हें नांव ह्या प्रकरणास बरेंच साजेल. हें सर्व गद्य आहे. ह्यानें प्रस्तुत छापील ग्रंथाचीं ८८ पासून १०५ पर्यंतचीं १७ पृष्ठें व्यापिलीं आहेत. हें प्रकरण शक १४६० च्या सुमारास लिहिलें गेलें असावें, असें अंतर्गत मजकुरा वरून दिसतें.

## प्रकरण सहावें

ह्या प्रकरणाचें नांव **वंशावळी**. सर्व गद्य. संवत् १५३५ म्हणजे शक १४०० त ही वंशावळी लिहिली, असें प्रकरणकार प्रकरणसमाप्तीस स्वतःच म्हणतो.

कालदृष्ट्या प्रकरणरचनेचा क्रम येणेंप्रमाणें बसतो.

| | |
|---|---|
| शक १३७० | प्रकरण दुसरें |
| शक १३७० च्यानंतर कांहीं थोड्या दिवसांनीं | प्रकरण तिसरें |
| शक १४०० | प्रकरण साहावें |
| शक १४६० | प्रकरण पांचवें |
| शक १५०० सुमार | प्रकरण चौथें व प्रकरण पहिलें |

असें दिसतें कीं मूलतः शक १३७० त ऊर्फ संवत् १५०५ त महिकावतीची बखर ऊर्फ प्रकरण दुसरें रचिलें गेलें. नंतर प्रकरण तिसरें हें ज्यादा मजकूर म्हणून कालान्तरानें दुसऱ्या प्रकरणाला परिशिष्टरूपानें जोडलें गेलें. " ह्या ( म्हणजे दुसऱ्या प्रकरणा ) वर ते ( म्हणजे तिसरें प्रकरण ) हि प्रत चढेल " म्हणून दुसरें प्रकरण ऊर्फ महिकावतीची बखर लिहिणारा गृहस्थ जो केशवाचार्य तो स्वतः च म्हणतो ( पृष्ठ ६२, ओळ ३ ). ह्या दोन्हीं प्रकरणांचा कर्ता जो केशवाचार्य त्याला शक १३७० त मालाडचा तत्कालीन देसला नायकोराव यानें सन्मानपूर्वक बोलावून हें वंशपद्धतीचें कर्म ऊर्फ महिकावतीची बखर त्याज करवीं लिहविली ( पृष्ठें ५२ व ५३ ). वंशपद्धती लिहविण्याचें कारण केशवाचार्य जें सांगतो तें फार हृदयद्रावक आहे. पहिल्या बिंबराजापासून म्हणजे शक १०६० पासून शक १३७० पर्यंत म्हणजे ही बखर ऊर्फ वंशपद्धति लिहिली गेली तावत्कालपर्यंत तीन शें वर्षें लोटून गेलीं होतीं ( पृष्ठ ५३ ओळ १६ ). सर्व कोंकणप्रांत म्लेच्छांनीं आक्रमण करून, येथून तेथून चोहीं कडे सर्वत्र म्लेछार्णवा खालीं सर्व पृथ्वी बुडून गेली. वर्णावर्ण वोळख नाहीशी झाली. स्वकुळाची वास्तपुस्त कोणाच्या गावीं हि राहिली नाहीं. क्षत्रियांनीं राज्याभिमान सांडिला, शस्त्रें सोडिलीं व केवळ कृषिकर्म स्वीकारून कित्येक निव्वळ कुणबी बनले, कित्येकांनीं कारकूनवृत्ति आदरिली, कांहीक सेवावृत्ति अंगिकारून निभ्रांत शूद्र ठरले, आणि कित्येक नष्ट होऊन नामशेष

हि राहिले नाहींत. बहुत आचारहीन झाले. गोत्र, प्रवर, कुळस्वामी व कुळगुरू ह्यांची बहुतेकांस आठवण हि राहिली नाहीं. अशी ह्या तीन शें वर्षांत भ्रष्टता माजली व महाराष्ट्रधर्म अज्जी बुडाला. अश्या संकटसमयीं श्रीदेवी कुळस्वामिणी, मालाडचा देसला जो नायकोराव त्याच्या स्वप्नांत येऊन, सांगती झाली कीं, नायकोरावा, ऊठ, महाराष्ट्रधर्म रक्षिण्या करितां अठरा पगड जातीचा मेळावा कर आणि केळव्या पासून मुंबई पर्यंतच्या सर्व गांवचे, सर्व जातींचे व सर्व गोत्रांचे खलक जमवून त्यांस केशवाचार्यांच्या मुखें महाराष्ट्रधर्म सांगीव ( पृष्ट ५३ ). देवीची ही आज्ञा शिरसा वंदन करून नायकोरावानें केशवाचार्यांच्या संमतीनें मालाड ऊर्फ म्हालजापुर येथील जोगेश्वरीच्या देवळा पुढें विस्तीर्ण मंडप रचून तीन हजार साहा शें पंचावन्न लोक जमा केले. त्यांत नायक, देसाई, पुरोहित, कुळगुरू, आचार्य, उपाध्ये, जोशी व इतर मुख्य मुख्य वृत्तिवंत पांचशे एकवीस होते. असा हा भव्य समुदाय मालाडास एकवीस दिवस राहिला. ब्राह्मणांनीं लक्ष्मीसूक्तांनीं भगवती दुर्गादेवीचें स्तवन केलें व श्रीदेवी आद्यशक्ति जगदंबिका महाराष्ट्र-धर्मरक्षिका जी जगन्माता दुर्गादेवी ती तुम्हां सर्वां वर सुप्रसन्न असो असा आशिर्वाद दिला. नंतर केशवाचार्यानें सर्व शिष्टांची संमती घेऊन जमलेल्या सर्व लोकांस प्रस्तुत छापिली जाणारी वंशपद्धति राजा बिंबा पासून अद्ययावत् कथन केली व महाराष्ट्रधर्माचें निरूपण केलें. त्या वंशपद्धतीच्या व महाराष्ट्रधर्मकथनाच्या सासष्ट नकला करून साक्ष-शिक्या निशी त्या नकला त्या त्या कुळांस, वंशास व जातींस प्रमाणपूर्वक दिल्या. कुळांनी, वंशांनीं व जातींनीं शिरीं वंदन करून त्या नकला जतन करून ठेविल्या. पैकीं एक नक्कल कल्याण येथील सदाशिव महादेव दिवेकर ह्या खटपटी गृहस्थांच्या द्वारा प्रस्तुत संपादकाच्या हातीं येऊन मुद्रणसंस्कारार्हतेस प्राप्त झाली. असा ह्या बखरीच्या रचनेचा वृत्तान्त आहे. आजपर्यंत सांपडलेल्या सर्व बखरींत शक १३७० तील ही माहिकावतीची बखर अत्यन्त जुनाट आहे.

शक १३७० तील ह्या दोन प्रकरणां नंतर तीस वर्षांनीं म्हणजे शक १४०० त प्रकरण साहावें रचिलें गेलें. प्रकरण दुसरें व प्रकरण तिसरें यांत महिकावती प्रांतांतील बहुतेक सर्व कुळांची ऊर्फ खुमांची वंशपद्धती आली असून फक्त कोळंबा व शिळंबा वंशाची हकीकत द्यावयाची राहिली होती. ती ह्या साहाव्या प्रकरणांत दिली आहे.

शक १४०० नंतर सुमारें साठ वर्षांनीं प्रकरण पांचवें लिहिलें गेलें. ह्या प्रकरणांत पाठारे प्रभूंची वंशोत्पत्ति सांगण्याचा प्रयत्न केलेला असून पाठारे प्रभूंची महिकावती-प्रांतांत जी स्थापना झाली तिचें कथन केलें आहे. ह्या प्रकरणाच्या कर्त्याचें नांव समजण्यास साधन नाहीं.

प्रकरण पांचवें रचून झाल्यावर सुमारें चाळीस पन्नास वर्षांनीं म्हणजे शक १५०० च्या सुमारास भगवान् दत्त किंवा भगवान् नंद दत्त नामें करून कोण्या पुरुषाच्या हातीं प्रकरण दुसरें, तिसरें, पांचवें व सहावें अशीं चार प्रकरणें गेलीं. तेव्हां त्याला असें दिसलें कीं प्रकरण दुसरें व तिसरें मिळून एक स्वतंत्र हकीकत आहे आणि प्रकरण पांचवें व

साहावें मिळून दुसरी स्वतंत्र हकीकत आहे. पहिल्या हकीकतींत महिकावतीच्या राज्यांतील सर्व कुळांची शक १०६० पासून वंशपद्धति दिली होती व दुसऱ्या हकीकतींत प्रामुख्यें करून पाठारे प्रभूंची वंशपद्धति दिली होती. अशा दोन स्वतंत्र हकीकती भगवान् दत्ताच्या हातीं पडल्या. प्रत्येक हकीकतीला एकेक पद्य उपोद्घात भगवान् दत्तानें जोडला. प्रकरण दुसरें व तिसरें ह्या गद्य प्रकरणांना प्रकरण पहिलें हें पद्य प्रकरण जोडलें आणि प्रकरण पांचवें व साहावें या गद्य प्रकरणांना प्रकरण चौथें हें पद्य प्रकरण जोडलें. अशा तऱ्हेनें दोन स्वतंत्र बखरी तयार झाल्या. प्रकरण पहिलें, दुसरें व तिसरें मिळून पहिली बखर व प्रकरण चौथें, पांचवें व साहावें मिळून दुसरी बखर. भगवान् दत्ताच्या नंतर दुसरा एक अनामक संहिताकार आला. त्याला असें दिसलें कीं दुसरी बखर ही पहिल्या बखरीचा च धागा पुढें चालविणारी आहे. सबब त्यानें ह्या दोन्ही बखरी एका पुढें एक लावून, प्रस्तुत छापला जाणारा सबंध ग्रंथ बनविला. ह्या दुसऱ्या संस्कारकानें भगवान् दत्ताच्या संस्करणांत अधूनमधून कांहीं जास्त मजकूर घातला. "मत्छा पासुनि च्यारि ते नरहरी पर्यंत जाले कृती," हा श्लोक, विजयानगरच्या राज्याचा नाश झाल्याचा उल्लेख, बाबर हें नांव, वगैरे शक १४६० च्या व शक १५०० च्या नंतर झालेल्या वृत्तान्ताचे जे दोन चार उल्लेख ह्या ग्रंथांत आले आहेत ते ह्या द्वितीय संस्कारकानें घातलेले आहेत. ग्रंथाची रचना वेळोवेळीं कसकशी होत गेली ती खालील तक्त्या वरून स्पष्ट होईल:—

| मूळ कर्ता | प्रकरण | काल |
| --- | --- | --- |
| केशवाचार्य— | प्रकरण दुसरें व प्रकरण तिसरें | शक १३७० |
| अनामक— | प्रकरण पांचवें | शक १४६० |
| नायक व कावळे-- | प्रकरण साहावें | शक १४०० |
| भगवान् दत्त पहिला संस्कारक | प्रकरण पहिलें व प्रकरण चौथें | शक १५०० नंतर |
| अनामक दुसरा संस्कारक-- | विजयानगरचा उल्लेख, बाबरचा उल्लेख, मच्छा पासुनि इत्यादि श्लोक | शक १६०० नंतर |

पहिला संस्कारक जो भगवान् दत्त तो कोण कोठील केव्हांचा वगैरे कची किंवा पक्की हकीकत, अनुमानिक देखील, बिलकुल उपलब्ध नाहीं. अनामक जो दुसरा संस्कारक त्याचें नांव हि माहीत नाहीं, तेव्हां तो कोणकोठचा हा प्रश्न त्याज संबंधानें काढण्यास अवसर हि रहात नाहीं. भगवान् दत्त हें लौकिक नांव नसून जर सांप्रदायिक नांव असेल तर दत्त हा भगवान् नामक गुरूचा शिष्य ठरेल. कोंकणांतलि साधुसंतांत भगवान हें नांव नवीन च उपलब्ध झालें, असा ह्या विधानाचा अर्थ होतो. दत्ताला कविता करण्याचा नाद होता, हें प्रकरण पहिलें व प्रकरण चौथें ह्यां वरून सिद्ध आहे. भगवानंद दत्त, हें जें नांव प्रकरण चौथ्याच्या प्रारंभीं आलें आहे त्या वरून असें म्हणतां येतें कीं दत्त हा भगवानाचा नंद म्हणजे नंदन ऊर्फ मुलगा किंवा शिष्य होता.

४ प्रकरण दुसरें व तिसरें हीं मूलतः शक १३७० त रचिलीं गेल्या मुळें, त्यांची भाषा मुळांत चोंभा कवीच्या भाषे हून किंचित् अर्वाचीन असणार हें उघड आहे. प्रकरण पांचवें व साहावें हीं अनुक्रमें शक १४६० व शक १४०० तील असल्या मुळें त्यांची भाषा मूळांत बहिरा जातवेदाच्या भाषे सारखी असली पाहिजे. आणि प्रकरण पहिलें व प्रकरण चौथें हीं दोन प्रकरणें शक १५०० च्या सुमारचीं असल्या कारणानें, त्यांची भाषा मूलतः एकनाथी भाषे सारखी असेल, हें सांगणें नलगे. प्रस्तुत छापील ग्रंथाची भाषा पहातां ती शक १३७० तील किंवा शक १४०० तील किंवा शक १५४० तील हि असलेली दिसत नाहीं. प्रत्यय, विभक्तिरूपें व क्रियापदरूपें बहूतेक बरीं च अर्वाचीनलेली सर्वत्र दिसतात. हा फरक नकलकारांनीं केला, हें जुन्या मराठी लेखाच्या अभ्यासकांना सांगण्याचें कारण नाहीं. नकलकाराचा धंदा करणारे प्रायः भाषेचे शास्त्रीय अभ्यासक नसतात. तेव्हां, जुनी भाषा जशी ची तशी राखण्या कडे त्यांचें लक्ष्य नसतें. त्यांचें एक च एक लक्ष्य फक्त मजकुरा कडे असतें. मजकुराची जुनी भाषा डोळ्यांनीं पहावयाची व तिचा उच्चार स्वकालीन भाषे प्रमाणें तोंडातल्या तोंडांत जिभेनें करून ती नकळत झालेली अर्वाचीन भाषा हातानें लिहावयाची, हा परिपाठ महाराष्ट्रांतील नकलकारांचा सर्वत्र दृष्टीस पडतो. जुने लेख अनेक शतकांनीं नकल करतांना नकलकार मूळ भाषेंत नकळत फेरफार करतात, ह्यांत विशेष आश्चर्य नाहीं. स्वकालीन मूळ लेखांत हि फेरफार करणारे नकलकार महाराष्ट्रवाङ्मयांत आढळतात. उदाहरणार्थ, तुकारामाच्या अभंगांच्या तळेगांवच्या संताजी तेल्यानें केलेल्या नकलांत व कडूसच्या महाजनानें केलेल्या नकलांत, तुकाराम संताजी व पाठक हे तिघे हि समकालीन असून, अंतर आहे. संताजीच्या नकला कुणबाऊ आहेत व पाठकाच्या नकला बामणाऊ आहेत. मूळ तुकारामाचें लिखाण कुणबाऊ होतें कीं तिसरें च कांहीं होतें ही बाब स्वतंत्र च. ज्ञानेश्वराच्या ज्ञानेश्वरीला हि हा च विकार बाधलेला आहे. मी आज पर्यंत ज्ञानेश्वरीच्या जुन्या नव्या नकला सुमारें अडीचशें पाहिल्या. त्यांत कोणती हि एक नक्कल कोणत्या हि दुसऱ्या नकले सारखी कोणत्याहि दहा सलग ओव्यांत नाहीं. रामदासाच्या दासबोधाची हि ही च दुर्दशा. देवांनीं छापिलेला कल्याणस्वामिलिखित दासबोध पांगारकरांना सांपडलेल्या ग्वालेरच्या दासबोधाहून अनेक स्थलीं भाषादृष्ट्या निराळा ! दोघे हि नकलकार रामदासकालीन. दोघे हि ब्राह्मण. दोघे हि गुरुग्रंथाचीं पूज्यभावें पारायणें करणारे. असें असून, दोघांच्या पाठांत भेद. अशी दुःस्थिति जर महाराष्ट्रांतील प्रतिष्ठावंत ग्रंथकारांच्या ग्रंथांच्या नकलांची, तर कोंकणांत कोनाकोपऱ्यांत लोळत पडलेल्या प्रस्तुत बखरींच्या निरनिराळ्या प्रकरणांच्या नकलांचा सांवळा गोंधळ काय विचारावा ! प्रस्तुत बखरीची शेवटली नक्कल शक १७४१ त झाली. मूळ सबंध बखर छापिली आहे त्या स्वरूपाला शक १६०० च्या सुमारास आली. शक १६०० पासून शक १७४१ पर्यंतच्या १४१ वर्षांत अनेक नकलांच्या कोशांतून नवे नवे जन्म घेऊन शक १७४१ त प्रस्तुत बखरीनें शेवटला हस्तालिखित जन्म घेतला. परंतु तेवढ्यानें च तिचें जन्मांतर संपलें असें

समजूं नये. बखरीनें प्रस्तुत जो छापील जन्म घेतला आहे त्यांत कान्हे, मात्रा, इकार, उकार, अक्षरें इत्यादि अवयवांची किती छाटाछाट झाली आहे तें माझा मींच जाणें असें म्हणावयाला नको; प्रत्येक वाचक माझ्याप्रमाणें च बखरीचे हातपाय कापले गेल्या बद्दल, बखरीचा पुनर्जन्म सर्वावयसंपन्न होई पर्यंत, अखंड दुःख करीत राहील!

५ वसईच्या वालजी पाटलानें प्रस्तुत बखर ज्या मूळा वरून केली तें मूळ स्वतः दुसऱ्या एकाँ नकलेची नक्कल होतें असें म्हणण्यास प्रमाण आहे. तिसऱ्या पृष्ठांतील एकविसाव्या ओवीचा तिसरा चरण व एकाण्णवाव्या पृष्ठांतील दहाव्या ओळींतील व एक्यायशीव्या पृष्ठांतील सव्विसाव्या ओळींतील गाळलेला मजकूर वालजी पाटलानें ज्या नकले वरून आपली नक्कल उतरली त्या नकलेंत नव्हता. म्हणजे वालजी पाटला पुढें मूळ ग्रंथ नव्हता, नक्कल होती व ती नक्कल अपूर्ण होती. अपूर्ण नक्कले वरून अपूर्ण नक्कल उतरल्यास, त्याचा दोष नकलकारा कडे येत नाहीं. परंतु मूळांतील अक्षरें किंवा आंकडे नकलकारानें हलगर्जीपणानें किंवा अज्ञानानें वगळल्यास किंवा विपर्यस्त केल्यास किंवा निराळे च वाचल्यास, दोषाचा शिक्का त्याच्या कपाळा वर मारणें सर्वस्वीं वाजवी ठरतें. असें दोष वालजी पाटलाच्या नकलेंत खालील स्थलीं झालेले आढळतातः—

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ३४ | वरून ३ | ११२५ | ११९५ |
| ४१ | वरून १४ | १२२८ | १२९८ |
| ६६ | खालून ६ | ११३५ | ११९५ |
| ७० | खालून १० | ११२५ | ११९५ |
| १०६ | वरून १५ | ११२५ | ११९५ |

११९५ बद्दल ११२५, १२९८ बद्दल १२२८ व ११९५ बद्दल ११३५, अशीं अशुद्धें वालजी पाटलाच्या नकलेंत असलेलीं आढळतात. मूळ शक १३७० तील व १४६० तील लिखाणांत ११९५ व १२९८ असें आंकडे होते. ते वालजी पाटलानें ज्या नकले वरून आपली नकल उतरली त्या नकलेच्या लेखकानें ११२५ व १२२८ असे वाचले. असे अशुद्ध कां वाचले तर त्या लेखकाला शक १३७० तील व १४६० तील मूळच्या लेखांतील नवाचा जुना आंकडा अर्वाचीन दोहोंच्या आंकड्या सारखा भासला. शक १३७० त व शक १४६० त नवाचा आंकडा महाराष्ट्रदेशांत २ सारखा काढीत व शक १६०० नंतर किंवा सुमारास ९ असा काढीत. म्हणजे अर्वाचीन ९ नवाच्या आंकड्याचें प्रारंभींचें जें गोंडगोळें संपूर्ण चोहोंकडून कड्याच्या आकाराचें वांटोळे आहे तें शक १३७० त डाव्या बाजूस किंचित् तुटलेलें म्हणजे २ सारखें दाखवीत. नवाचा हा जुना आंकडा शक १६०० च्या सुमारच्या नकलकारास ओळखतां येत नाहींसा झाला होता. त्या मुळें ११९५ व १२९८ हे जुने आंकडे त्यानें ११२५ व १२२८ असे नव्या तऱ्हेचे वाचले आणि हे चुकलेले आंकडे त्या

नकलेंतून वालजी पाटलानें आपल्या नकलेंत शोध न करतां जसे चे तसे उतरून घेतले. वालजी पाटलानें जर एखाद्या जंत्री कडे पाहिलें असतें, तर शक १०६० ला संवत् ११९५ येतो, संवत् ११२५ येत नाहीं, हें त्याच्या तेव्हां च लक्ष्यांत येतें. परंतु, हा लहानसा शोध वालजीनें केला नाहीं. कारण ११२५ वाचण्यांत चूक होत आहे, असा संशय च मुळीं त्याला आला नाहीं. "स्वस्ति श्रीनृपविक्रमार्कसमयांति–संवत् ११२५ तत् राजिंद्रचक्रचूडामणौ शालिवानशके १०६०" असें वाक्य त्याच्या पुढें होतें. शक १०६० त १३५ मिळविले म्हणजे संवत् ११९५ आले पाहिजेत, संवत् ११२५ येणार नाहींत, हें वालजी पाटलाला कळलें नसतें इतका तो मूढ होता असें म्हणवत नाहीं. त्याचा दोष एवढा च कीं आपण जो मजकूर नकलीत आहों त्यांत विसंगतपणा कोठें आहे कीं काय तें पाहून नक्कल करण्याचा अभ्यास त्याला नव्हता. नकलेची नक्कल—शब्दाला शब्द व अक्षराला अक्षर—बिनचुक केली म्हणजे आपलें काम यथाशास्त्र झालें, अशी वालजीची समजूत होती. त्या समजुतीला अनुसरून शक १०६० च्या आंकड्या बरोबर संवत् ११२५ चा आंकडा वालजीनें जसा चा तसा उतरून घेतला. पृष्ठ ४१ वरील संवत् १२२८ चा आंकडा हि वालजीनें असा च भोळ्या भावानें जसा चा तसा उतरून घेतला व शालिवाहनशक ११६३ हा हि डा जसा चा तसा संवत् १२२८ खालीं नकल करून ठेविला. शक ११६३ त १३५ मिळविले म्हणजे संवत् १२९८ येतात, ही साधी बाब त्यानें पडताळून पाहिली नाहीं. वालजीच्या व वालजीनें ज्या नकले वरून आपली नकल केली त्या नकलेच्या कर्त्याच्या ह्या दोन साध्या चुक्या इतक्या आश्चर्यकारक नाहींत. पृष्ठ ६६ त खालून ६ व्या ओळींत तर वालजीनें व वालजीनें ज्या नकले वरून आपली नक्कल केली त्या नकलेच्या लेखकानें एक फार च घबाड चूकी नकलून ठेविली आहे. बिंबदेव कोंकणांत संवत् ११३५ त उतरला, हें वाक्य वालजीनें व त्याच्या पूर्वीच्या नकलकारानें बिन-तक्रार, बिनसंशय व बिनतपास सबंद चें सबंद स्वीकारून, हलगर्जीपणाचा केवळ कळस करून टाकला. चुकीचा कां होई ना, पृष्ठ ३२ वर बिंबदेवाचा कोंकणांत उतरण्याचा संवत् ११२५ वालजीनें स्वतः लिहिला आहे. तो च काल पृष्ठ ६६ वर संवत् ११३५ म्हणून नकलतांना वालजीला जरा संशय यावयाला हवा होता: परंतु, चुकीचें हें हि घोडें वालजीनें, फाल्गुनांतील गाठीच्या गोड पदका प्रमाणें, सबंद चें सबंद मटकावून पचनीं पाडलें ! एवढ्यावर च वालजी थांबला नाहीं. पृष्ठ ७० वर 'बिंबराजा अहिनळवाड्या हून कोंकणांत संवत् १२५ त आला, असें वालजीबोवांनीं आपल्या नकलेंत सुंदर व स्वच्छ अक्षरांनीं साक्षेपानें लिहून ठेविलें आहे ! ! ! ११२५ ह्या संवताच्या आंकड्यांतील एकाच्या एका आंकड्यास वालजीबोवांनीं येथें लीलेनें काट दिला. तो काट प्रस्तुत छापील बखरींत लेखकाची नजरचूक म्हणून जसा चा तसा छापला नाहीं, दुरुस्त करून ११२५ असा पाठ छापला आहे. एवंच, ११९५ बद्दल ११२५, ११९५ बद्दल ११३५, १२९८ बद्दल १२२८ आणि ११२५ बद्दल १२५

असे अपपाठ वालजीच्या नकलेंत जे सांपडतात व जे सहज दुरुस्त होण्या सारखे होते त्यांचें पाप वालजीच्या, नाहीं तर वालजीच्या पूर्वीच्या नकलकाराच्या, माथ्या वर मारण्यास कोणती च हरकत दिसत नाहीं. सहज समजणारे हे दुरुस्त केलेले पाठ घेतले म्हणजे माहिकावतीच्या ह्या बखरींत शकसंवताच्या आंकड्यां बद्दल कोणत्या हि प्रकारचा संशय घेण्यास फार च स्वल्प जागा रहात्ये.

६ सहज दुरुस्त होण्या सारख्या आंकड्यांच्या वाचनाच्या ह्या चुक्या लक्ष्य देण्या सारख्या हि नाहींत असा पक्ष कोणी केल्यास, त्याला उत्तर एवढें च कीं चिकित्सेच्या चापांत मोठ्या बाबी जश्या पकडून रंधाव्या लागतात, त्या च प्रमाणें क्षुद्र बाबी हि कानसून झिलवल्या विना बिनपूस निसटूं जाऊं देतां येत नाहींत. नकलांच्या नकला होतांना ह्या बखरींत आंकड्यांच्या ढोबळ चुक्या झाल्या आहेत, हें निर्विवाद आहे. तसेंच, जुन्या भाषेंतील शक १३७० तील प्रत्ययांचीं रूपें हि नकलांच्या नकला होतांना ह्या बखरींत अर्वाचीनलेलीं आहेत, हें चौथ्या कलमांत दर्शविलें आहे च. अर्वाचीनलेले प्रत्यय वगळून, शक १३७० तील भाषेचा कोणता अवशेष प्रस्तुत छापल्या गेलेल्या बखरींत कायम राहिला आहे त्याचा तपास करूं. सर्वत्र माहिकावती प्रांतांत म्लेच्छार्णव झाला, अशी ओरड केशवाचार्यांनें व नायकोरावानें स्वतःच केली असल्या मुळें, ह्या म्लेच्छाक्रान्त कोंकणप्रांतांतील मराठी भाषेंत कांहीं यावनी शब्द सांपडल्यास त्यानें अजाण वाचक हि बिचकून जाण्याचा संभव नाहीं. माहाल, मुहिम, जमी, जमा, सरसुभेदार, सरसबनीस, सरचिटणीस, हवालदार, मुजुमदार, लस्कर, खाजिना, सरजमातदार, ताबा, मुलुख, फौज, काबिज, जाब, विलाथ, कागद, रहित ( रयत ), मुजा, इनाम, फरास, बखाल, मोफत, दुकान, मसाला, जखात, बंदिस्त, खत, तालुका, हवाला, वसूल, खलक, बंदरकी, सिकाबंद, खूम, खासा, कबिला, सरफौजदार, वरातदार, गुमस्ता, कबूल, तागाईत, खोती, शहाबाज, खबर, नामुस, खुशाली, बकसीस, हल्ला, अफदागीर, बेइजती, निशाण, महालदार, परगणा, हिसाब, महजर ( मझर ), सही, खबर, सुलतान, दरकार, जरूर, अर्ज, पातशा, मशीद, फत्ते, हुजूर, मजलस, कजिया, हासिल, दस्त, हरामखोर, कुफराणदार, मातबर, पैका, दिवाण, हुकूम, साहेब, गैबत, दुवा, ज्वाब, माफिल, हुशार, खेरीज, खून, खुषू, मुस्तेद, गर्ज, जाहागीर, वतन, अजम, शेख, वतनदार, बाबत, रुजू, पैराब, मदत, तह, जमीदार, ( ठिकाण ) दार, इजारदार, माह, हे १०३ फारसीआर्बी शब्द ह्या बखरीच्या ३२ व्या पृष्ठा पासून ६२ व्या पृष्ठा पर्यंतच्या ४० पृष्ठांत आले आहेत. ह्या ४० पृष्ठांत सुमारें बारा हजार शब्द आहेत. बारा हजार शब्दांत १०३ फारसी ऊर्फ यावनी शब्द ह्या बखरींत ज्या अर्थी आले आहेत, त्या अर्थी शक १३७० त कोंकणांतील मराठी भाषेंत शेकडा पांच षष्ठांश शब्द फ़ारसी येत म्हणजे सरासरीनें शेकडा एक शब्द उत्तर कोंकणांतील लेखी गद्य मराठी भाषेंत फारसी येई, असें म्हणावें लागतें. हे १०३ फारसी शब्द वगळले म्हणजे बाकी राहिलेले सर्व शब्द ह्या शक १३७० तील बखरींत अस्सल मराठी आहेत.

सबंद बखरींतील ह्या अस्सल मराठी शब्दांतून जुन्या अपरिचित अश्या सर्व शब्दांची व प्रयोगांची याद अपरिचित अर्थां सह खालीं देतों.

अगणित=मोजणी न केलेला
अडचसेरी=अडशेरी, शिधा
अनमानणें=रहित करणें
अंतरणें=अंतर पडणें
अन्योन्यी=अन्यूनतेनें, सर्वस्वीं
अव्हाणणें=बोलावणें, गोळा करणें
आंगवण=सामर्थ्य, शक्ति, वण, व्रत, पैज
आदरणें=इच्छिणें, बुद्धि होणें
आदळाआदळ=मारामारी, झटापट
आंदणी=देणगी
आमंत=आमंत्रण
आळा दिधला=अलंकार दिला
इयेरिं=सर्वांनीं
उघडे=नागडे, वस्त्रहीन
उठावला=उभा राहिला
उतावीळ=घाईनें
उत्पवन=उडून
उपकारणें=उपयोगीं पडणें
उमळे=विरघळे
ओहाणे=ओहोळाची जागा
कच=कटकट
कटक=सैन्य
काढावा=पळ
काहाळा=वाद्यविशेष
काळवटा=कलंडणी
कुळावळी=कुलावली, कुळपरंपरा
कोनीं निघणें=प्रसूत होणें
खेम=क्षेम, कुशळ
खोंचली=विषण्ण झाली, दुखावली
गंगाळटोप=शिरस्त्राण
गजबजणें=घाबरणें
गोठण=गाई उभ्या रहाण्याचें स्थान
गोपचारा=गोप्रचार, गाईंचा माग, रस्ता
गोवळ=गुराखी, गोपाल
गोवारा=गाईंचा समुदाय, कळप
चढाये=चाल
चातुरें=वाद्यविशेष
चुडा=हात, डवली
जर=यत् तऱ्हि, कीं, जे
जोडा=पत्र
जोहारिला=जयकार केला, नमस्कारिला
टिळा=तिलक
डोरले=डौरले, डवरले, पुष्ट झाले
डोहोलारिं=डोलाऱ्यांत, पाळण्यांत
तुरेल=वाजंत्री
त्यां पैं=त्यांना
तुज पैं=तुज पाशीं
थकटका=टका पैसा ( थक=टका )
दबाजा=उद्धटपणा, दबावणी, धमकी, दंभ
दमिले=पीडिले
दवडणें=हाकून देणें
दालिबंद=हत्यारबंद
दुराठी=द्विरथ्या, दोन रांगा आहेत ज्या पेठेला ती पेठ
दुराय=नम्रीभाव
देसचे=देसले, देसाई, देशांतील अधिकारी
द्वालि=तरवारीची दाली
धोत्तर=पुढील
नाथ फोडावी=दरवाजाचा आडसर फोडाव
नांवाजणें=नामना करणें, प्रतिष्ठा करणें
नेजा=भाला

पदरीं=अंतर्गत
पहिरावणी=देणग्या, आभरण
पानपट्टी=विडा
पाटवृंदें=अलंकारविशेष
पासवाडिला=मांडला
पालटणें=बदलणें
पाहे=प्रार्थी, स्पर्शी
पुणती=पुन्हां, आणीक
पुरो=पुरवाह, पुराध्यक्ष
पेटणें=प्राणघणी हिंसा करणें
पेणें=मुक्कामाची जागा
पें=पाशीं
पैं=पासून
पैं-पें=स, ला, तें
पैक=समुदाय
पैकिल=समुदायांतील
प्रमादणें=मरणें
फिरावण=वचनभंग
बळकाविलें=बळकट सुरक्षित बळाढ्य केलें
बांके=वाद्यविशेष
बाबरझोंटी=निग्रोच्या ओंठा सारखे ओठ आहेत ज्याचे तो
बिघडाव=बिघाड
बैसकार=बसण्याचा मान
भले=संस्कृत, सुधारलेले
भाख=वचन
भाणज=भाचा
भिरका=फेंक
भागाईत=भोगायतन, विलासस्थान, रहाण्याचें घर
माज=मध्य
मोहनमुख=मौनमुख
राजिणी=राजन्यकाचे

लुगडीं=वस्त्रें, दुकूलानि
वगत=अवगति, माहिती
वर्तोळा=गणित
वह्याळी=मृगया, शिकार
वाखाणणें=व्याख्यान, वर्णन करणें
वाड=वडील
वाण=उपायन, बक्षीस
वानें=वर्ण
वाहातें यंत्र=वाहन, रथ
वाळावें=पूजावें
विंदाण=कारागिरी कुशलता
विराणें=वाद्यविशेष
विखुरणें=पिस्कारणें
वरिगांठ=अलंकारविशेष
वेगवगत्र=वेगवत्तर
वेह्याळी=समुद्राच्या लाटांची मर्यादा
वोडविला=लांब आकर्षण केला
वोळग=सेवा
वोळणखांडे=सशस्त्र इसम
सजगाणी=नाणकविशेष फद्या
संपादिला=यथाशास्त्र अर्पण केला
सरता=चालता, स्मरता
सर्वैपणा=सर्वपतित्व, सर्वांच्या वरच्या मुख्य अधिकाऱ्याचें पद
साउमा=समोर
सिधावो=झाडा
सुकडा=शुल्क, कर, पट्टी
सुखासन=स्वगृह
सोंचिला=सोशिला
स्थिराविणें=राहून घेणें
स्वज्ञा=संज्ञा, हुकूम
हंकारा=दवंडी
हडकिला=गांठला

हाटवटा=बाजारीपणा, उदमीपणा
हातकडी=अलंकारविशेष
हातसांकळ्या=अलंकारविशेष
हातेरवट=हत्यारपट्टा
हारविणें=जिंकणें
होणे=ओहाणे

वर दिलेले सर्व शब्द रूपांच्या व अर्थांच्या दृष्टीनें जुनाट आहेत, हें जुनें मराठी सारस्वत व वाङ्मय पढणाऱ्यांच्या नित्यपरिचयाचें आहे. प्रत्यय व प्रयोग पहातां, करूं आदरिली, विचार मांडिला, मुहिम अनमानिली, इत्यादि प्रयोग किंचित् जुनाट भासतील. सुंतो पासून निघालेला अर्वाचीन मराठी सून किंवा हून प्रत्यय ह्या बखरींत होन व होवोन अश्या अपभ्रंशरूपानें बऱ्याच स्थलीं आलेला आढळतो. त्या वरून दिसतें कीं होवोन हा पंचमीचा प्रत्यय सुंतो पासून निघालेला आहे, डाक्टर भांडारकर आपल्या प्राकृत भाषे वरील व्याख्यानांत म्हणतात त्या प्रमाणें हो धातू पासून निघालेल्या होऊन ह्या ऊन-प्रत्ययांत धातुसाधिता पासून निघालेला समजण्याची अपरिहार्य अवश्यकता किंचिन्मात्र हि नाहीं. पाशीं बद्दल पें, पासून बद्दल पैं, स, ला, तें बद्दल पें–पैं हे प्रत्यय ह्या बखरींत आढळतात. ते जुने समजण्या पेक्षां अर्वाचिन अपभ्रष्ट समजणें जास्त सशास्त्र. चतुर्थीच्या स बद्दल सि व तृतीयेच्या सह बद्दल सिं हे जुनाट प्रत्यय ह्या बखरींत बऱ्याच ठिकाणीं योजिलेले आढळतात. तर बद्दल त ( पृष्ठ ४९ खालून तिसरी ओळ ) हें तोंडीं भाषेंत सध्यां येणारें अव्यय ह्या बखरींत एकदा आलेलें आहे. कीं ह्या अर्थाचा जे हा जुना अव्ययशब्द सर्वांच्या परिचयाचा आहे. त्याचा उपयोग ह्या बखरींत क्वचित् झालेला आहे. त्याच्या ऐवजीं कीं ह्या अन्वयार्थीं जर हा शब्द ह्या बखरींत सररहा योजिलेला आढळतो. यत् तर्हि ह्या संस्कृत अव्ययाचा कीं या अर्थाचा जर हा अव्यय-शब्द कोंकणांतील मराठींत त्या कालीं योजीत असें दिसतें. निदान बखर लिहिणारा जो केशवाचार्य त्याच्या तोंडीं हा शब्द फार होता, इतकें तरी म्हटल्या शिवाय गत्यन्तर नाहीं. हेत मीं ( देवी ) पुरवितों ( पृष्ठ ५३, ओळ ९ ) हा प्रयोग हेत मीं ( देवी ) पुरविते किंवा पुरवित्ये ह्या अर्थीं योजिलेला आहे. दिसण्याला हा पुंल्लिंगी क्रियापद-प्रयोग कोंकणांत चित्पावनांत व कऱ्हाड्यांत अद्याप हि आढळतो. ही कोंकणी लकब झाली. जुनी संस्कृत लकब, स्वप्न सांगविला ( पृष्ठ ५३, ओळ ११ ) ह्या प्रयोगांत दृष्टीस पडत्ये. स्वप्न हा शब्द संस्कृतांत प्राय: पुल्लिंगी आहे. सबब, सांगविला हें पुल्लिंगी रूप केशवाचार्यानें प्रौढपणें आपल्या लिखाणांत घातलेलें दिसतें. परंतु, लौकिकांत स्वप्न हा शब्द मराठींत नपुंसकलिंगी आहे, हें केशवाचार्यांच्या दृढ परिचयाचें होतें. सबब, हें हें नपुंसकलिंगी सर्वनामरूप स्वप्न ह्या पुल्लिंगी शब्दा मागें केशवाचार्यानें किंवा त्याच्या नकलकारानें लावून "हें स्वप्न सांगविला" हें विचित्र वाक्य निर्माण केलें असावें ! ह्या बखरींत सरता हा जुनाट शब्द आलेला आहे. "सरता केला संतांत" हें वाक्य संतमालांतून आलेलें जुन्या मराठी भाषेच्या अभ्यासकांना अवगत आहे च. येथें सरता म्हणजे गणणा केला जाणारा, स्मरण केला जाणारा, स्मर्यमाण, असा अर्थ आहे. तो सरता केला संतांत म्हणजे तो संत लोकांत स्मरला गेला, गणला गेला असा अर्थ होतो.

तो जातींत सरता केला म्हणजे तो जातींत गणला गेला. हा सरता शब्द संस्कृत स्मृ धातू पासून निघालेला आहे. स्मृ चा अपभ्रंश सर असा मराठींत होतो. उदाहरणार्थ, विस्मृ चा मराठी अपभ्रंश विसर. करूं बद्दल करीन अशी अक्षरवटिका ह्या बखरींत एकदां आली आहे. अनुनासिका च्या टिंबा बद्दल सबंद न हें अक्षर लिहिण्याची संवय बाजीरावादि पेशव्यांच्या पत्रांत आढळते. ती च लकब ह्या कोंकणी बखरींत आढळल्यास चमत्कार नाहीं. असले आणीक कांहीं प्रत्यय व प्रयोग ह्या बखरींत आहेत, ते सर्व देऊन जागा अडविणें प्रशस्त दिसत नाहीं.

७ बहिःस्वरूपाची छाननी झाल्या वर, आतां बखरीच्या आंतील मजकुराचा परिचय निर्धास्तपणें करून घेण्याच्या उद्योगास लागणें सुयुक्त दिसतें. आंतील मजकुराचा परिचय करतांना, छाननीची पहिली बाब म्हटली म्हणजे बखरींत दिलेली शकसंवत् वगैरे कालगणना बरोबर आहे किंवा नाहीं तें तपासणें. कोणत्या शकाला कोणता संवत् जुळतो, ही स्थूल बहिःछाननी मागें होऊन गेली च आहे. तिथि, वार वगैरेंच्या सूक्ष्म छाननीला आतां हात घालूं. एकंदर सबंद बखरींत शकसंवताचे जेवढे म्हणून स्थूल किंवा सूक्ष्म उल्लेख केले आहेत त्यांचा तक्ता असाः—

( १ ) पृष्ठ ३२:—संवत् ११९५, शक १०६० माघ शुद्ध ५ सोमवासरे प्रतापबिंबानें कोंकणा वर स्वारी केली.

( २ ) पृष्ठ ३६:—शक १०६९ पर्यंत प्रतापबिंबानें संवत्सर ९ माहिमास राज्य केलें. शक १०६९ त प्रतापबिंब वारला व महीबिंब राज्या वर आला.

( ३ ) पृष्ठ ३७:—संवत् १२४५ त चंपावतीच्या भोजराजाशीं लढाई, शक १११०.

( ४ ) पृष्ठ ३७:—संवत् १२६९, शक ११३४ त महीबिंब ६५ वर्षें राज्य करून वारला. केशवदेव राज्या वर आला.

( ५ ) पृष्ठ ३९:—संवत् १२८१, शक ११४६ भोजाचा पराभव.

( ६ ) पृष्ठ ४१:—संवत् १२९४, शक ११५९ त केशवदेव २५ वर्षें राज्य करून वारला. जनार्दन प्रधान राज्या वर आला.

( ७ ) पृष्ठ ४१:—संवत् १२९८, शक ११६३ पर्यंत जनार्दन प्रधानानें राज्य केलें. वर्षें ४ चार. घणदिव्याचा नागरशा संवत् १२९८, शक ११६३ माघशुद्ध ७ भौमे जनार्दन प्रधाना वर स्वारी करून कोंकणीं आला.

( ८ ) पृष्ठ ६१।६२:—संवत् १५०५, शक १३७० फाल्गुन वसंततुं केशवाचार्यानें वंशपद्धति रचिली.

( ९ ) पृष्ठ ७०:—संवत् १४५९ त बहादूरशहानें निवाडा सिंध्यांचें नावें केला.

(१०) पृष्ठ ८८:—संवत् ५७४ फाल्गुनशुद्ध ९ रविवारीं राम राणा झाला.

(११) पृष्ठ ८९:—शक १२१० त अलाउद्दीन पैठणास आला.

(१२) पृष्ठ ८९:—शक १२१६ त बिंबानें कोंकणा वर स्वारी केली. प्रतापपुरास राहिला.

(१३) पृष्ठ ८९:—शक १२२७ त बिंबानें माहिमास राजधानी नेली.
(१४) पृष्ठ ९१:—शक १२१५ त कोंकणांत पाठारे प्रभू आले.
(१५) पृष्ठ ९७:—शक १२२५ पर्यंत वर्षे ९ मास १ दिन १४ बिंबानें राज्य केलें. प्रतापशा राज्या वर आला.
(१६) पृष्ठ ९७:—शक १२२५ पासून शक १२५३ पर्यंत वर्षे २८ मास प्रतापशानें राज्य केलें.
(१७) पृष्ठ ९८:—शक १२५४ त नागरशानें राज्य घेतलें.
(१८) पृष्ठ ९८:—शक १२६९ पावेतों नागरशानें राज्य केलें.
(१९) पृष्ठ १०२:—शक १२७० त तुर्काण झालें.
(२०) पृष्ठ १०२:—मध्यें कुफराणा होऊन, मोंगल्यांनीं राज्य केलें वर्षें २०.
(२१) पृष्ठ १०२:—मध्यें मलिक अहमद यानें राज्य केलें वर्षे ३५.
(२२) पृष्ठ १०२:—मलिक अहमद शक १३१३ त वारला.
(२३) पृष्ठ १०३:—शक १४२२ त म्हणजे इ. स. १५०० त फिरंगी पोर्तुगालाहून आले.
(२४) पृष्ठ १०३:—शक १४३४ त म्हणजे इ. स. १५१२ त फिरंगी दवण-प्रांतास आले.
(२५) पृष्ठ १०५:—संवत् १५३५ म्हणजे शक १४००, चैत्रशुद्ध १ गुरुवार या दिवशीं वंशावळी ऊर्फ प्रकरण सहावें लिहिलें गेलें.
(२६) पृष्ठ १०६:—संवत् ११९५ त बिंबशा स्वामी कोंकणप्रांतास आले.
(२७) पृष्ठ १०८:—शक १७४१ प्रमाथी वैशाखशुद्ध प्रतिपदा रविवासरे बखरीची नक्कल झाली.

सूक्ष्म तपासणीच्या कार्यास लायक अश्या नोंदी ह्या तक्त्यांत १, ७, ८, १०, २५, २७, अश्या फक्त सह आहेत. कारण त्यांत महिना, पक्ष, तिथि, व वार अशा तपशिलाच्या दोन दोन, चार चार बाबी दिल्या आहेत. बाकीच्या एकवीस नोंदींत हा तपशील सबंध किंवा आंशिक, बिलकुल नाहीं. सत्तावीस नोंदीं पैकीं नोंद २७ खेरीज करून कोणत्याहि एका नोंदींत संवत्सराचें नांव दिलेलें नाहीं. तें हलगर्जीपणानें दिलें नाहीं, असाच केवळ ग्रह करून घ्यावयास न लगे. संवत्सराचें नांव न काढण्याचें कारण असें आहे कीं, बखरकार शक व संवत् असे दोन्ही आंकडे मनांत धरून वर्षगणना करण्यास शिकलेला होता. दोन किंवा अधिक मोजण्यांनीं वर्षगणना करण्याची ही संवय किंवा अपरिहार्यता परराज्याखालीं रखडणाऱ्या प्रजेस सहज प्राप्त होत असते. स्वराष्ट्रांतील जुन्या कालगणने बरोबर परकीय राजांनीं प्रचलित केलेली काळगणना सांगितल्याशिवाय वर्षगणना बिनचुक एकदम वाचकाच्या किंवा श्रोत्यांच्या ध्यानांत येण्यास विलंब लागेल, अश्या भीतीनें परराज्याच्या दडपणाखालीं खितपतणाऱ्या हलक्या लेखकांस स्वकालगणनेच्या गौण साक्षीला परकीयकालगणनेची प्रमुख साक्ष देणें सोईचें वाटतें. वंशपद्धति

ऊर्फ प्रकरण दुसरें हा प्रबंध रचणारा जो केशवाचार्य त्याला त्यानें आपला प्रबंध ज्या मूळ टिपणांवरून रचिला त्या टिपणांत गुजराथेंतील अन्हिलवाड पट्टणाहून आलेल्या परकीय बिंब राजांचा विक्रमसंवत् स्वकीय देशांत चालणाऱ्या शकाच्या जोडीला लावलेला आढळला. सबब, त्यानें शका बरोबर संवताचा हि आंकडा आपल्या लिखाणांत नमूद करून ठेविला. परराज्य आलें म्हणजे सरकारी दिवाणांतून, कचेऱ्यांतून, शाळांतून, जाहिरनाम्यांतून, वतनपत्रांतून, व सर्वत्र परकीय कालगणना व तिचा वर्ष, महिना, पक्ष, दिवस घटिका व पळें वगैरे तपशील सुद्धां येथून तेथून परकीय होऊन जातो व राष्ट्रांतील शेंकडा साडेनव्याण्णव जे पोटभरु लोक त्यांच्या डोक्यांत तो परकीय तपशील दोन तीन पिढ्यांत बेमालूम भिनून जातो आणि स्वकीय कालगणनेचा तपशील दैवदुर्विलसितानें परकीय वाटूं लागतो. परकीय कालगणनेच्या विषानें भारून गेलेल्या लोकांस विषमुक्त करण्याची हांव धरणाऱ्या केशवाचार्या सारख्या विद्वानास व नायकोरावा सारख्या क्षत्रियास हि ह्या पोटभरूंच्या पंक्तिस, मनांत नसतां, बसावें लागून, परकीय संवताचा प्रथम उच्चार करावयास लागला आणि नंतर स्वकीय शकाचा दुय्यम दर्जानें उल्लेख करण्यांत समाधान मानावें लागलें. कालगणना अशा या दोन तऱ्हांनीं करणें भाग पडल्या मुळें, संवत्सराचें नांव नमूद करणें सहज च, अशक्य जरी नव्हे तरी, श्रमाचें बनून गेलें. शकवर्षाचे संवत्सरनाम निराळें आणि विक्रमसंवताचें संवत्सरनाम निराळें. अश्या द्वैधीभावांत संवत्सरनाम मुदलांत च वगळून टाकण्याचा मार्ग बखरकारांना स्वल्पिष्ट श्रमाचा दिसला. संवत्सरनामाची ही जशी अडचण आली तशी अडचण तपशिलाच्या इतर कोणत्या हि बाबी संबंधानें आली नाहीं. शकगणनेंत व संवत्सरगणनेंत पक्षगणनेच्या बाबींत किंचित् वांधा यावयाचा आणि तो वद्यपक्षा संबंधानें यावयाचा. शकवर्षाच्या वर्तमानमहिन्याचा जो वद्य व दुसरा पक्ष तो विक्रमसंवताच्या आगमिष्यमाण महिन्याचा प्रथम पक्ष असतो. करतां, संवत् व शक ह्यांच्या आंकड्या बरोबर जर महिना आणि वद्यपक्ष दिला असेल, तर तो महिना व पक्ष शालिवाहनशकाचा कीं विक्रमसंवताचा तें गणित केल्याशिवाय ओळखतां येणें सुलभ नाहीं. प्रस्तुत बखरींत शालिवाहनशक व विक्रमसंवत् ह्यांचे आंकडे दिले असून, ह्य महिन्याचा वांधा अनुभवगोचर झाला नाहीं. त्याचें कारण असें आहे कीं, प्रस्तुत बखरींतलि कालगणनेच्या तपशिलांत कर्मधर्मसंयोगानें वद्यपक्षांतील तीथ एक सुद्धां आलेली नाहीं. आली असती तर संशोधकदृष्टीनें बरें होतें; मित्त्या तपासून घेण्याला वर्षांक, महिना, तीथ व वार या चार बाबींच्या जोडीला आणीक एक पांचवी बाब जास्त मिळाली असती व तपासणीची उतरणी जास्त सूक्ष्म झाली असती. शालिवाहनशक व विक्रमसंवत् ह्या दोन कालगणने प्रमाणें इसवीसनाचा —ज्याला बखरकार फिरंगी शक म्हणतो—हि उद्धार प्रस्तुत बखरींत, तत्कालीं त्या प्रांतांत फिरंग्यांचा अंमल असल्या मुळें, झाला आहे. शालिवाहनशक, विक्रमसंवत् व इसवीसन ह्यांचा उल्लेख ज्या प्रमाणें त्या त्या अमलाला अनुलक्षून ह्या बखरींत झालेला सांपडतो, त्या प्रमाणें—सकृद्दर्शनी आश्चर्याची गोष्ट वाटेल—मुसलमानी अंमल उत्तर

कोंकणांत तीन साडेतीन शें वर्षे चालल्या सारखा भासत असून हि हिजरीसनाचा किंवा फसलीचा आंकडा ह्या बखरींत एकदा देखील दिलेला नाहीं. हिजरीसन किंवा फसलीसन किंवा कोणता हि मुसल्मानी सन न उद्धरण्याचीं कारणें चार संभवतात. एक कारण असें कीं उत्तर कोंकणांत मुसल्मानी अंमल जितका स्थिर होऊन लोकांच्या संवयीचा व्हावा तितका कधीं च झाला नाहीं. दुसरें कारण असें कीं कोंकणच्या डोंगरी व रानवट झाडींतील रानटी प्रजेला मुसलमानी अंमलाचा स्पर्श बहुतेक न झाल्यासारखा होता. तिसरें कारण असें कीं केशवाचार्य, नायकोराव वगैरे मंडळीस म्लेच्छार्णवाचा मना पासून द्वेष वाटत होता. आणि चवथें व शेवटचें कारण असें कीं शक १४२२ च्या पश्चात् पोर्तुगीजांच्या हालचालीं पुढें मुसल्मानांचें तेज ह्या प्रांतांत फारसें टिकलें नाहीं. अश्या ह्या चार कारणांचा समवाय होऊन, मुसल्मानांच्या कालगणने कडे केशवाचार्यादि मंडळींनें अगदीं च दुर्लक्ष्य केलें. उत्तरकोंकणांत गांवगन्ना जर हिजरीसनाची किंवा फसलीची ओळख वरघाटच्या देशांतल्या प्रमाणें दाट असती, तर हे बखरकार हिजरीसनानें किंवा फसलीसनानें वाचकांचें कालज्ञान सवकारिल्या वांचून सहसा रहाते ना. तेव्हां हें च खरें कीं मुसल्मानी अमलाची पक्की मगरमिठी उत्तरकोंकणांतील झाडीला व रानांना जशी बसावी तशी बसली नव्हती. तशांत केशवाचार्यादिकांचा म्लेच्छद्वेष तर अत्यन्त जाज्वल्य. सबब, प्रस्तुत बखरींत मुसल्मानी कालगणनेचा उल्लेख हि नसावा हें युक्त च आहे.

१, ७, ८, १०, २५ व २७ ह्या नोंदीं पैकीं आठव्या नोंदींत तीथ व वार दिले नसल्या कारणानें तिज संबंधानें विचक्षणा करण्याचें कारण च रहात नाहीं. बाकी राहिलेल्या पांच नोंदीं पैकीं ( १ ) सत्ताविसाव्या नोंदींतील शक १७४१ च्या वैशाखशुद्धप्रतिपदेस मोडकांच्या जंत्री प्रमाणें रविवार पडतो व दीक्षितांच्या जंत्री प्रमाणें शनिवार पडतो. अशी एकदोन दिवसांची तफावत मोडकांच्या व दीक्षितांच्या जंत्र्यांतून वारंवार आढळते. मोडकांनीं आपली जंत्री जुन्या पंचांगां वरून रचिली व जुन्या पंचांगांतील गणित प्रायः स्थूल असे, त्या मुळें जुन्या पंचांगांच्या हून किंचित् सूक्ष्म गणित करणाऱ्या दीक्षितांच्या जंत्रींत तिथींचे वार वारंवार निराळे आढळतात. गणितदृष्ट्या दीक्षित यद्यपि बरोबर असले, तत्रापि साक्षात् जुन्या पंचांगांतून दिलेले तिथींचे वार इतिहासदृष्ट्या ज्यास्त प्रमाणिक समजणें इष्ट असतें. कारण इतिहासलेखक किंवा इतिहासलेखांच्या नकला करणारे सामान्य कारकून स्थूल पंचांगांचा च उपयोग करून काम भागवितात, सूक्ष्म गणित करीत बसत नाहींत आणि सूक्ष्म गणित करण्याची त्यांची लायकी हि नसते. सबब, सत्ताविसाव्या नोंदींतील वैशाखशुद्धप्रतिपदेला जो रविवार सांगितला आहे तो रास्त धरून, ह्या नोंदींतील कालगणनेचा तपशिल विश्वसनीय मानण्यास कोणती च हरकत नाहीं. ( २ ) पंचविसाव्या नोंदींतील संवत् १५३५ ऊर्फ शक १४०० च्या चैत्रशुद्धप्रतिपदेस गुरुवार दीक्षितांच्या जंत्रींत दिला आहे; तेव्हां ही नोंद विश्वसनीय आहे हें सांगावयाला नको. ( ३ ) दहाव्या नोंदींतील संवत् ५७४ ऊर्फ शक ४३९ च्या

फाल्गुनशुद्ध नवमीस रविवार पडतो, सबब ही हि नोंद प्रमाणिक आहे. ( ४ ) सातव्या नोंदीतील संवत् १२९८, शक ११६३ च्या माघशुद्ध सप्तमीस मंगळवार येत नाहीं, परंतु पंचमीस येतो. करतां, ह्या नोंदीतील " माघशुद्ध ७ भौमे " ह्या अक्षरां-बद्दल " माघशुद्ध ५ भौमे " असा पाठ घ्यावा लागतो. माघशुद्धपंचमीला भौमवार ऊर्फ मंगळवार पडतो. येथें नक्कलकारानें ५ बद्दल ७ वाचला हें उघड आहे. जुन्या '५ च्या आंकड्याच्या गांठीचें टोंक लेखणीच्या फटकाऱ्यानें किंचित् खालीं ओढलें न गेल्यामुळें चिन्ह साताच्या आंकड्या सारखें दिसूं लागलें आणि तें नक्कलकारानें सहजच सात म्हणून वाचलें. तात्पर्य, ह्या नोंदींत पांचाचा आंकडा सात म्हणून वांचला गेला. शक ११६३ माघशुद्ध ५ भौमे हा तीथवारांचा आंकडा विश्वसनीय आहे ह्यांत संशय नाहीं. ( ५ ) पहिल्या नोंदींत " शक १०६० माघशुद्ध ५ सोमवासरे " अशीं अक्षरें आहेत. अक्षरांच्या व आंकड्याच्या चुक्या नकलकारानें ह्या नोंदींत ज्या केल्या आहेत त्यांची दुरुस्ती दोन तऱ्हांनीं करतां येते. नोंदींत जितकीं पदें असतात तितक्या पदांतील अक्षरां ऐवजीं किंवा आंकड्या ऐवजीं निराळीं च अक्षरें किंवा आंकडे, जुनाट, पुसट वगैरे लेख नीट वाचतां येण्यास प्रतिबंध झाल्यामुळें, नकलकार गाळीत किंवा बदलीत असतांना वारंवार आढळतात. असा बदल प्रस्तुत नोंदींत दोन तऱ्हांनीं झाला अस-ल्याचा संशय सिद्ध करतां येतो. १०६० शकाच्या माघशुद्ध ५ स दीक्षितांच्या जंत्रींत सोमवार नाहीं, शनिवार आहे. त्या मुळें नकलकारानें ५ हा आंकडा दुसऱ्या कोणत्या तरी आंकड्या करितां लिहिला असावा हा एक संशय; किंवा सोमवासरे हीं अक्षरें दुसऱ्या कोणत्या तरी वाराच्या बद्दल लिहिलीं गेलीं असावीं, हा दुसरा संशय. माघ-शुद्ध ७ स सोमवार आहे. करतां, ७ च्या बद्दल नकलकारानें ५ हा आंकडा लिहिला असण्याचा संभव आहे. ७ च्या आकृतींतील गांठीचें टोंक मूळ जुनाट लेखांत लेख-णीच्या फटकाऱ्यानें जर किंचित् ओळीच्या खालीं ओढलें गेलें, तर साताचा आंकडा पांचा सारखा दिसण्याचा संभव आहे. माघशुद्ध पंचमीस शनिवार आहे. शनिवाराला सौरीवासर असें हि दुसरें नांव असे. सौरीवासरे हें जुनाट नांव परिचयाचें नसल्या मुळें व सौरीवासरे ह्या शब्दांतील सौ व री हीं अक्षरें पुसट झाल्या मुळें, परिचयाचा सोम-वासरे हा शब्द नकलकारानें लिहिला असण्याचा संभव आहे. म्हणजे ही नोंद " शक १०६० माघशुद्ध ५ सौरीवासरे " अशी, किंवा " १०६० माघशुद्ध ७ सोमवासरे " अशी, अश्या दोन तऱ्हां पैकीं कोणत्या तरी एका तऱ्हेनें मूळांत लिहिली असली पाहिजे. पैकीं अमुक च तऱ्हा मूळ टिपणांत स्वीकारिली होती हें निश्चयानें सांगण्यास साधन आहे. माघशुद्ध षष्ठी किंवा चतुर्थी किंवा अष्टमी म्हणजे ४, ६ किंवा ८ हे आंकडे मूळांत नव्हते, एवढें निश्चयानें सांगतां येतें. कारण, मोहिमेस मुहूर्ता वर निघाल्याचा खुलासा नोंदींत केला आहे. माघशुद्ध पंचमी म्हणजे सर्वप्रसिद्ध वसंतपंचमी आणि माघ शुद्ध सप्तमी म्हणजे तितकी च सर्वप्रसिद्ध रथसप्तमी. माघशुद्ध चतुर्थीस, षष्ठीस किंवा अष्टमीस असा कोणता हि सुमुहूर्त नसल्या मुळें, वसंतपंचमी व रथसप्तमी ह्या दोन

तिथींचे ५ व ७ हे दोन आंकडे शिल्लक रहातात. तसें च शनिवारा पेक्षां सोमवार हा दिवस गमनास सरस धरिला तर ७ च्या आंकड्यास प्राधान्य द्यावें लागतें; आणि मूळ जुनाट लेखांत " माघ शुद्ध ७ सोमवासरे " अशीं अक्षरें होतीं असा निश्चय करण्या कडे प्रवृत्ति होते. तात्पर्य, ह्या हि नोंदींतील तीथ व वार विश्वासपात्र आहेत. येणें प्रमाणें बखरींतील वर्ष, महिना, पक्ष, तीथ व वार असा सर्व तपशील मुळचा बरा-बर आहे. नक्कलकारानें आंकड्यांच्या व अक्षरांच्या वाचण्याच्या चुक्या केलेल्या आहेत. परंतु त्या बखरींची परीक्षा करण्याची संवय झालेल्या कोणा हि अभ्यासकास सहजासहजीं शुद्ध करून घेतां येण्या सारख्या आहेत.

८ बखरकारानें, अथवा खरें म्हटलें म्हणजे, प्रकरणकारांनीं शक ४३९ पासून शक १७४१ पर्यंतच्या ह्या सत्तावीस मित्या आणिल्या कोठून? शक १७४१ हा नकलेचा आंकडा गाळला, तर बाकीच्या सव्वीस मित्या बखरकारांनीं किंवा प्रकरणकारांनीं आणिल्या कोठून, हें पहाणें जरूर आहे. संवत् १५३५ व संवत् १५०५ हे आंकडे सहाव्या व दुसऱ्या प्रकरणांच्या समाप्तीचे लेखकांनीं स्वत: दिलेले असल्या मुळें त्यांच्या उगमा संबंधाचा प्रश्न च रहात नाहीं. बाकीच्या तेवीस मित्या प्रकरणकारांनीं आपल्या जवळ असलेल्या जुन्या टिपणांतून घेतल्या असल्या पाहिजेत. म्हणजे केशवाचार्यादि लेखकां जवळ जुनीं टिपणें होतीं असें झालें. संवत् ५७४ ऊर्फ शक ४३९ शकांतील नोंदीचें टिपण जवळ असणें म्हणजे प्रकरणकारा जवळ त्याच्या पूर्वींच्या एक हजार वर्षांचें जुनें टिपण होतें, असें कबूल करणें भाग पडतें. प्रकरणकार नुसते वर्षांचे आंकडे च तेवढे देऊन गप्प बसत नाहीं, तर तीथ, वार व महिना हि देतो. त्या वरून म्हणावें लागतें कीं प्रकरणकारां जवळ काळाचा बारीक तपशील देणारीं राजकीय बाबींचीं टिपणें होतीं. बिंबानें वर्षें ९ मास १ व दिन १४ राज्य केलें आणि प्रतापशानें वर्षें २८ मास ३ राज्य केलें, ह्या अर्थाच्या दोन नोंदी वरून तर असें दिसतें कीं प्रकरणकारां जवळ तत्प्रांतस्थ राजांचीं व राजवटींचीं तपशीलवार टिपणें होतीं. अशीं तपशीलवार टिपणें ठेवण्याचा प्रघात भारतवर्षांत फार पुरातन आहे. कित्येक पुराणांतून कित्येक राजांच्या राजवटींचीं वर्षें महिने व दिवस दिलेले सर्वांच्या ओळखीचे आहेत. कित्येक पुराणांतून अमूक राजानें एक हजार वर्षें, अमुक राजानें दोनशें वर्षें, अमुक राजानें पांच हजार वर्षें राज्य केलें, अशीं टिपणें सांपडतात. तेथें वर्ष म्हणजे दिवस असा अर्थ घेणें सयुक्तिक दिसतें. हजार दिवस म्हणजे सुमारें आपलीं सध्यांचीं अडीच तीन वर्षें होतात व वीस हजार दिवस म्हणजे आपलीं सध्यांचीं पन्नास साठ वर्षें होतात. साठ साठ वर्षें म्हणजे वीस-पंचवीस हजार दिवस राज्य करणारे राजे वर्तमान कालीं हि होऊन गेलेले आहेत. तेव्हां वीस पंचवीस हजार दिवसांच्या ऊर्फ पौराणिक वर्षांच्या आंकड्यानें भांबावून जाण्याचें कारण नाहीं. एखादा राजा शंभर वर्षें जगल्यास व त्यानें गर्भस्थ असल्या पासून राज्य केलें असल्यास त्यानें छत्तीस हजार वर्षें राज्य केलें असें पुराणांनीं म्हटलें असतां तें ही विश्वासार्ह होईल. परंतु, पुराणें जेव्हां अमुक राजानें शत कोटी वर्षें ऊर्फ

देवस राज्य केलें, अश्या सारखीं विधानें करतात, तेव्हां त्यांच्या वरील विश्वास सहज च डळमळतो. असलीं विश्वासानर्ह विधानें प्रस्तुत बखरींत नाहींत. कालसंबंधक सर्व विधानें ह्या बखरीच्या गद्य भागांत मानवी आटोक्यांतलीं असून, त्यांत अतिशयोक्तीचा किंवा अद्-भुताचा लवलेश हि नाहीं. कालाच्या तपशिला संबंधानें प्रस्तुत बखर बहुतेक पूर्णपणें विश्वसनीय समजावी.

९ स्थलसंबंधक माहिती ही ह्या बखरींत अशी च पूर्णपणें विश्वसनीय आहे. घण-दिवी पासून चेऊल पर्यंतच्या समुद्रकिनाऱ्याच्या लगतच्या गांवांचा जो निर्देश बखरींत केलेला आहे तो नकाशा वरून पडताळून पहातां त्यांत विसंगतता बिलकुल नाहीं. प्रस्तुत बखरींत वर्णिलेल्या हालचालींचा प्रांत पश्चिमसमुद्रकिनाऱ्या पासून पूर्वे कडे सुमारें पंधरा वीस मैल रुंदीच्या आंत बाहेरचा आहे. कांहीं प्रांतांचीं व गांवांचीं नांवें महाराष्ट्र व गुजराथ ह्या बाहेरच्या देशांतील असून, कांहीं गांवांचीं नांवें उत्तर हिंदुस्थानांतील आहेत. तप-शीलवार खुलाशा करितां गावांचीं, प्रांतांचीं, नद्यांचीं व किल्ल्यांचीं जीं नांवें बखरीच्या गद्य भागांत आलेलीं आहेत त्यांची याद अकारविल्यानें खालीं देतों:—

| | | |
|---|---|---|
| १ अकिसें | २ अगाशी | ३ अनिक |
| ४ अमदानगर ( किराट ) | *५ अमदाबाज | ६ अमलाद |
| ७ अलंदापुर पाटण | ८ अव्हेली | *९ आहिनलवाड पाटण |
| १० आगठी | ११ आगसें | १२ आगासी–मखें |
| १३ आंकुलवली | १४ आंवेरी | १५ आंबोली |
| १६ आरें | १७ आरुणी | १८ आसनपें |
| १९ आसेरी | २० आव्वाडी | *२१ उडंगण |
| २२ उतन | *२३ उत्तरपंथ | २४ उत्ळेश्वर |
| *२५ उदयपुर ( उद्गीर ) | २६ उंबरवडी | २७ उरण |
| २८ कडपें | *२९ कडे माणिकपुर | ३० कणेरी |
| ३१ कपासें | *३२ करवीर | ३३ कल्याण |
| ३४ कळवें | ३५ कानझुरें | ३६ कांधवळी |
| ३७ कान्हेरी | ३८ कापासें | ३९ काररडाह( कांदरडाह ) |
| ४० कावेसर | ४१ कालिगें | ४२ कावेसर |
| ४३ काशी | ४४ कासीमिरें | ४५ किन्होळ |
| ४६ कुन्हार | ४७ कुराळें | ४८ केझमरी |
| ४९ केतकवडी | ५० केतवली | ५१ केबळी |
| ५२ केशवपुर | ५३ कोंकण | *५४ कोची बंदर |
| ५५ कोंडिवटें ( कोंदिवटें ) | ५६ कोंपरी | ५७ कोंपरें |
| ५८ कोलभाट | ५९ कोलसेत | ६० कोसिंबें |
| ६१ कोळगांव | *६२ खंबैत | ६३ खरडी |

| | | |
|---|---|---|
| ६४ खराळें | ६५ खाख महादेवपुर | ६६ खाडी बागाची |
| ६७ खाडी पारबळ | ६८ खापणें | ६९ खारवाडी |
| ७० खारी—खार | ७१ खोटसर | ७२ खोपेश्वर |
| ७३ खोपेश्वराची वाडी | ७४ गगनमहाल | ७५ ० |
| ७६ गंगाळें | ७७ गव्हाण | ७८ गवळवंड |
| ७९ गार साहाणी | ८० गिराळी तटाक | *८१ गुजराथ |
| ८२ गुंडगांव | ८३ गुदगांव | ८४ गुंदवली |
| ८५ गोगरी | *८६ गोदापुर | *८७ गोदावरीपुर |
| *८८ गोपुर | *८९ गोमताचळ ( गोंवें ) | *९० गोरखगांव |
| *९१ गोरखपुर | *९२ गोरखी राज्य | ९३ गोरगांव |
| ९४ गोरदेव | ९५ गोराई | *९६ गोवें बंदर |
| ९७ गोहारी | ९८ घणदिवा | ९९ घांटलें |
| १०० घांटें | १०१ घारवडीपुरा | १०२ घोडगांव |
| १०३ घोडबंदर | १०४ घोडभाट ( वाडी ) | १०५ चउक |
| १०६ चंपावतीनगर | १०७ चन्हई | १०८ चन्हेगांव ( पैठणाजवळ ) |
| १०९ चाचाळें | ११० चांदवोळ | १११ चांदुळवाडी(तांदुळवाडी) |
| *११२ चांपानेर पाटण | ११३ चान्होळ | ११४ चाळें |
| ११५ चिखली | ११६ चिखली नवसारी | ११७ चिंचगांव |
| ११८ चिंचघर | ११९ चिचवली | १२० चिल्हाणें |
| १२१ चेउल | १२२ चेनें | १२३ चेंदणी |
| १२४ चेंदरली | १२५ चेंभूर | १२६ चेंभुरकें |
| १२७ चेन्हणें | १२८ जवार | १२९ जुहूं ( जूं ) |
| १३० टेंभ | १३१ ठाणें कोंकण | १३२ ठाणें माहीम |
| १३३ डिडोसी | १३४ डोंगरी | १३५ तटाका नदी |
| १३६ तबसी ( वाडी ) | १३७ तळवली | १३८ तळोजें महाल |
| १३९ तांदूळवाडी पैलदेची | १४० ताम्रतळें ( तटाक ) | १४१ तारवडी |
| १४२ ताराघर | १४३ तारापुर | १४४ तिरीदाद |
| १४५ त्रिपुर | *१४६ त्रिवेणीनगर | १४७ तुगवें ( तुंगवें ) |
| १४८ तुरफें | १४९ तुरभें | १५० तुरेर |
| *१५१ तुळजापुर | १५२ तुळशी | १५३ थेदखंड |
| १५४ दइस | १५५ दक्षणप्रांत | १५६ ददाडें |
| १५७ दवण | १५८ दहीसापुर | १५९ दळगांव |
| १६० दळघर | १६१ दांडें | १६२ दांडाळें तळें ( वसई |
| *१६३ दाबाजीपुर | १६४ दारवली | १६५ दाहिटें |

| | | |
|---|---|---|
| १६६ दिंडोसी | *१६७ दिल्ली | १६८ दीर्घापाळी |
| *१६९ दुर्गाडी ( पैठण ) | १७० देवगिरी | १७१ देवनरें |
| १७२ देववाडी | १७३ देवळाची वाडी | *१७४ देव्हेरी |
| *१७५ द्वारका | १७६ धार | १७७ धारापुर |
| *१७८ नंदनबारें | १७९ नरसापुर (नसरापुर) | १८० नवघर |
| १८१ नवजाळें | १८२ नवसारी | १८३ नाउर |
| १८४ नागावें | १८५ नागेश महातीर्थ ( वसई ) | १८६ नांदोळी सिद्धेश्वर |
| १८७ नारतळें | १८८ नाळें | *१८९ निळापुर |
| *१९० नेवाळय | १९१ पट्टा | १९२ पढ |
| *१९३ पंढरपुर | १९४ परतापुर (परजापुर परताबपुर, प्रदापुर ) | १९५ परनाळा |
| १९६ पर्वतगोळी | *१९७ पश्चमपंथ | १९८ पसपवली ( पस्पौली ) |
| १९९ पळसवली (पळसौली) | २०० पांचघर | २०१ पांचनदी महाल |
| २०२ पाचंबा देवी | २०३ पाटण | २०४ पाटळें |
| २०५ पाटाली | २०६ पाडळें | २०७ पाडेखळ |
| २०८ पाताळगंगा नदी | २०९ पापर्डी | २१० पायगांव |
| २११ पारडी | २१२ पाल ( पाळ ) | २१३ पाहाड |
| २१४ पाहुडी ( खाडी ) | *२१५ पुर्तुगाल | २१६ पूण |
| *२१७ पूर्वदेश | *२१८ पैठण | २१९ पोइसर |
| २२० पोमाळ | २२१ पोवै | २२२ प्रभावती |
| २२३ फोंजिवरें | *२२४ बद्रिकाश्रम | २२५ बनकें |
| २२६ बाणगंगा नदी | २२७ बांदवई | २२८ बांधोली |
| २२९ बापनळ | २३० बाहादूरपुरा(वसई) | २३१ बाहू उनवळ |
| २३२ बाळखंब | २३३ बेलिवड | २३४ बुराणपुर |
| २३५ बुलभाट | २३६ बेलवर्डी | २३७ बोरभाट |
| २३८ बोरलें | २३९ बोरवली | २४० बोरवाडी |
| २४१ ब्रह्मकुंड तडाग | २४२ भाइखळें | २४३ भाईंदर |
| *२४४ भागानगर | २४५ भांडुप | २४६ भिवणें |
| २४७ भिवंडी | *२४८ भीमाडीपुर | *२४९ भीमापुर |
| २५० भैस्यादुर्ग( भैसेदुर्ग ) | २५१ भोइंबें | २५२ भोगेत |
| २५३ मखें | २५४ मठ | २५५ मणोर ( मनोरी ) |
| २५६ मरोळ | २५७ मरोळ खापणें | २५८ मरोळी |
| २५९ महड | २६० माहिकावती (मही- | २६१ मागाठण ( माघठाण ) |

पुर, माहीम )

| | | |
|---|---|---|
| २६२ माघेरीं | २६३ माजगांव | २६४ माझिवडें |
| २६५ माडली | २६६ माडलें | *२६७ मांडवगड |
| २६८ मांडालें | २६९ मानमोटी | २७० मातापुर |
| २७१ मानी | २७२ मांदूळ | २७३ मांदेगांव |
| २७४ मायापुर | २७५ मालवण | २७६ मालवणी तटाक |
| २७७ मालाड | २७८ मालाड खापणें | २७९ माल्हजापुर (माहाळजापुर) |
| २८० मासवदा तळें | *२८१ माहादेवपुर | २८२ माहाळजा |
| २८३ माहीम | २८४ माहीम केळवें ( बिंबस्थान ) | २८५ माहीम बेट |
| २८६ माहुलीगड | २८७ माळवणी | २८८ मिरें |
| २८९ मुक्तेश्वर | २९० मुडधें | २९१ मुंबई |
| २९२ मुर्में | २९३ मुहिली | २९४ मुलुंद |
| २९५ मूळगांव | २९६ मेढाळगड | २९७ मोगरें |
| २९८ मोरवर्सा | २९९ मोरवें | ३०० मोरवोळ |
| ३०१ म्हाउल | ३०२ म्हारवड | ३०३ येकसर |
| ३०४ येडक मेढाळगड | ३०५ येरगण ( येरगळ ) | ३०६ येसावें |
| *३०७ रमिदेश रूमशाम | ३०८ राजण फरे | ३०९ राजवोळ |
| *३१० राठवड देश | ३११ रामनगर | *३१२ रामेश्वर |
| ३१३ रायभाट | ३१४ रायें | ३१५ रेपवडी |
| ३१६ लाजिवरें | ३१७ लाजुरलें | ३१८ लोढि |
| ३१९ वछापुरी | ३२० वड | ३२१ वडवोली ( वडवळी ) |
| *३२२ वडानगर | ३२३ वनेवाळ | ३२४ वरदाक्षिणी |
| ३२५ वरवसें | ३२६ वरसावें | *३२७ वरुणावती |
| ३२८ वरोळी | ३२९ वसई | ३३० वसारें |
| ३३१ वाडा | ३३२ वाडेवर्ला | ३३३ वादळी ( खार्डा ) |
| ३३४ वानठें | ३३५ वांदरें ( वानरें ) | ३३६ वाराढ |
| ३३७ वार्सा | ३३८ वार्सा रानफें | ३३९ वाहिनळें |
| ३४० वालुकेश्वर | ३४१ विखरौळी ( विखरवाळी ) | ३४२ विनायक तटाक (वसई ) |
| ३४३ विराळी | ३४४ विन्हार | ३४५ विसामागड |
| ३४६ वेउर | ३४७ वेडें | ३४८ वेसावें |
| ३४९ वेळप | ३५० वैंगणसर | ३५१ वोवळी ( खाडी ) |
| ३५२ वोंवळें | ३५३ वोळणें | ३५४ व्याड ( व्याडी ) |

| | | |
|---|---|---|
| *३५५ शहाबाज | *३५६ शिव चापाढोर | *३५७ श्यामक्षेत्र |
| *३५८ श्वेतबंध रामेश्वर | ३५९ सजणगांव | *३६० सप्तशृंगी |
| ३६१ संभुज | ३६२ ससुपोकळी | ३६३ सांखळी |
| ३६४ सांजें | ३६५ सांडोर पाखाडी | ३६६ सानप |
| ३६७ सानपें | ३६८ सानिवडें | ३६९ सायवन |
| ३७० सार | ३७१ सारवडी | *३७२ सालेरमोल्हेर |
| ३७३ सांवखेड | ३७४ सावरी | ३७५ साष्टी ( साशष्टी ) |
| ३७६ साहाजापुर | ३७७ साहार | ३७८ साही |
| *३७९ सितळेश्वर | *३८० सिन्धदेश | ३८१ सिवपुरी |
| ३८२ सिवार | *३८३ सिळापुर | *३८४ सीरगांव |
| ३८५ सीरसाळी खाडी | ३८६ सींव | ३८७ सेकनाड |
| ३८८ सेरी खाडी | ३८९ सैलान | ३९० सोपारें |
| *३९१ सौराष्ट्रदेश | ३९२ त्रिपुर | ३९३ हजवडी |
| ३९४ हरेळी हरयाळी | ३९५ हाटदळ | ३९६ हिरा डोंगर |

ह्या तीन शें शहाण्णव नांवां पैकीं नक्षत्रचिन्हांकित नांवें उत्तरकोंकणा बाहेरील गांवांचीं व देशांचीं आहेत. बाकीं राहिलेलीं ३३६ नांवें उत्तरकोंकणांतल्या माहिकावतीच्या राज्यांतील गांवें, नद्या, तळीं, तीर्थें व डोंगर यांचीं आहेत.

१० काल व स्थल हीं जीं ऐतिहासिक प्रसंगांच्या घटनेंतील दोन अंगें त्यांच्या विश्वसनीयत्वा संबंधानें विचक्षणा झाल्या वर, प्रसंगघटनेचें जें तिसरें अंग व्यक्ति तत्संबंधीं ग्राह्याग्राह्यतेच्या विचाराचा प्रांत लागतो. बखरीच्या गद्यभागांत ( १ ) बिंबराजांची व नागरशाची हकीकत, (२) यादवांची हकीकत, (३) नायत्या राजांची हकीकत, (४) अमदाबादेच्या मुसुल्मान पातशाहांची हकीकत, ( ५ ) पोर्तुगीजांची हकीकत, ( ६ ) रामनगरचा त्रोटक उल्लेख, ( ७ ) पट्टयाचा त्रोटक उल्लेख, ( ८ ) देसाई, चौधरी, पाटील वगैरे अधिकाऱ्यांच्या मानापमानांची हकीकत, ( ९ ) पाठारे ऊर्फ पातेणे प्रभूंची हकीकत, व (१०) मनोर व मालाड ह्या महालांच्या उत्पन्नाची वगत, अशा एकंदर दहा हकीकती दिल्या आहेत. त्यांत जीं व्यक्तिनामें आलीं आहेत, तीं सर्व उत्तर-कोंकणांत शक १०६० पासून शक १४२२ पर्यंत वावरणाऱ्या व्यक्तींचीं आहेत, त्यांत कल्पित कादंबरीवजा भाकडकथेंतील नांवा प्रमाणें काल्पनिक नांवें बिलकुल नाहींत. कथाभागाच्या ओघांत हीं नांवें जेथें जशीं यावीं तशीं च आलेलीं आहेत. त्या वरून खात्री होते कीं त्या त्या व्यक्ति त्या त्या कालीं व त्या त्या स्थलीं खरोखर च वावरत होत्या. निरनिराळ्या प्रसंगांच्या अनुरोधानें निरनिराळ्या काळीं निरनिराळीं चार प्रकरणें भिन्न भिन्न लेखकांनीं मूळांत लिहिलीं होतीं. तीं एकत्र करून व त्यांना दोन

पद्य उपोद्घात जोडून, भगवान् दत्त नामें करून कोण्या इसमानें ही सबंद बखर निर्माण केली. प्रस्तावनांत भगवान् दत्त याणें मूळच्या चार गद्य प्रकरणांना पौराणिक राजावलींच्या ज्या दोन पद्य प्रभावळी बसविल्या, त्यांतील पौराणिक कथाभागाशीं सध्यां आपणास कांहीं एक कर्तव्य नाहीं. त्यांतील ग्राह्याग्राह्यतेची चिकित्सा अवकाश सांपडल्यास पुढें करतां येईल. सध्यां एवढें च सांगावयाचें आहे कीं मूळच्या चार गद्य प्रकरणांत भगवान् दत्त याणें कोणत्या हि प्रकारची ढवळाढवळ केलेली नाहीं. जशीं प्रकरणें हातीं आलीं तशीं चीं तशीं तीं भगवान् दत्तानें संकलित गद्यपद्य बखरींत गोंवून दिलीं. काल, स्थल, व्यक्ति, व तपशिल ह्यांत फिरवाफिरव काडीची हि केली नाहीं. बिंब राजांची किंवा यादवांची किंवा देसायांची किंवा पाठाऱ्यांची तरफदारी करण्याचा अभिलाष भगवान् दत्त याला कोणता च असलेला दृष्टीस पडत नाहीं. उत्तरकोंकणांत सवितावंशीय, सोमवंशीय व शेषवंशीय कुळांची पूर्वपीठिका काय होती, ती जाणण्याचा धार्मिक व सामाजिक हव्यास भगवान् दत्त याला होता असें दिसतें. राजांचीं भांडणें व राज्यांच्या उलथापालथी सर्वत्र कश्या होतात व उत्तरकोंकणांत कश्या झाल्या, ह्या राजकीय बाबी कडे भगवान् दत्ताचें तितकें लक्ष्य नव्हतें. उत्तरकोंकणांतील जातीजातींत वरिष्ठ कोण, कनिष्ठ कोण, ही सामाजिक व धार्मिक बाब जाणण्याच्या इच्छेनें दत्तानें हा संकलनाचा उद्योग केला आहे. भगवान् दत्तानें आपल्या पद्य प्रस्तावनेला वंशविवेचनकथा असें अन्वर्थक अभिधान दिलेलें पाहिलें, म्हणजे प्रकरणांचें संकलन करण्यांत त्याचा मूळ, मुख्य व एक च एक हेतू कोणता होता तें स्पष्टपणें निःसंदिग्ध होतें. भगवान् दत्ताचा हेतू हा असा धार्मिक व सामाजिक असल्या मुळें, मूळच्या चार प्रकरणांतील काल, स्थल व राजकीय व्यक्ति ह्यांच्या मध्यें घोटाळा उडवून देण्याच्या मोहास भगवान् दत्त बळी पडला नाहीं. भगवान् दत्ता प्रमाणें च केशवाचार्यांचा हि हेतू धार्मिक व सामाजिक होता, राजकीय नव्हता. म्लेंच्छार्णव होऊन, ज्ञात, धर्म व आचार बुडून गेला, सबब नायकोरावाच्या साहाय्यानें केशवाचार्यानें उत्तरकोंकणांतील म्हणजे महिकावती प्रांतांतील अठरा खुम जातीस ज्ञात, धर्म व आचार यांचें निरूपण केलें व निरूपणाच्या भरांत शक १०६० पासून शक १३७० पर्यंतच्या ३१० वर्षांत राजकीय घडामोडीं बरोबर सामाजिक पडझड काय व कोणती झाली तें सांगितलें. बिंब राजे उत्तम, अमदाबादेचे मुसुल्मान पातशाहा अधम किंवा पोर्तुगीज लुच्चे, हा राजकीय इतिहास निवेदन करण्याचा केशवाचार्यांचा मुळीं च कटाक्ष नव्हता. भगवान् दत्त व केशवाचार्य ह्यांची दृष्टि ही अशी सामाजिक व धार्मिक असल्या कारणानें, राजकीय इतिहासकथेंत फेरबद्दल, अफरातफर, आवडानिवड किंवा वगळावगळ ह्या दोघांच्या हि हातून झाली नाहीं. बखरींच्या रचनेचा व संकलनाचा हा असा प्रकार असल्या मुळें, शक १०६० पासून शक १४२२ पर्यंतच्या कालांतील महिकावतीच्या राज्यांतील राजकीय ऐतिहासिक व्यक्तींच्या नांवांची लब्धि जितपत अकलुषित व्हावी तितपत होण्याची सोय आपणास सुदैवानें लाभली आहे. अमदाबादच्या पातशाहांच्या नांवांचे

अपभ्रंश बखरींत आढळतात, परंतु ते कोणत्या मूळ नांवांचे अपभ्रंश आहेत किंवा निव्वळ कालिते आहेत ते विशेष प्रयास न पडतां अंधुकपणें ओळखतां येतात. ह्या पलीकडे व्यक्तिनामांचा अपभ्रंश बखरींत फारसा आढळत नाहीं.

११ एणें प्रमाणें काल, स्थल व व्यक्ति एतत्संबंधक विश्वसनीयता निश्चित केल्या नंतर, बखरींच्या गद्यभागांत व्यक्तिकृत कार्यांचा जो तपशिल सांगितला आहे त्याचें संगतवार प्रदर्शन अर्वाचीन मराठी भाषेंत करण्याचा उपक्रम क्रमप्राप्त होतो. **आनर्त** देशांत म्हणजे सध्यांच्या **पालणपुर** संस्थानांत **सरस्वती**नदीच्या काठीं **अहिनल-वाडपाटण** ऊर्फ **अणहिलवाडपाटण** नावांचें शहर व प्रांत शक १०६० च्या सुमारास होता. संक्षेपतः **पट्टण** किंवा **पाटण** असें हि ह्या शहराला व प्रांताला म्हणत. तेथें **सोळंकी** नांवाचें राजे राज्य करीत. त्या प्रांतांतील **चंपानीवर** ऊर्फ **चांपानेर** पंच्यायशी महालांत **बिंब** ह्या आडनांवाचें एक क्षत्रिय कुल असे. सूर्यवंशी क्षत्रियांच्या ह्या **बिंबोपनामक** कुळाचें गोत्र भारद्वाज व शाखा कात्यायनी असून, प्रवर पांच असत व कुळदेवता प्रभावती असे. पंचप्रवरांचीं नांवें बखरींत दिलेलीं नाहींत. **ह्या बिंब** आडनांवाच्या क्षत्रियांचा संबंध **पैठण** येथें राज्य करणाऱ्या **भौम** आड-नांवाच्या क्षत्रियांशीं होता. ह्या वरून उघड च झालें कीं **बिंब** आडनांवाचे चांपानेरचे क्षत्रिय **भौम** आडनांवाच्या **पैठणच्या** क्षत्रियां प्रमाणें च महाराष्ट्रिय ऊर्फ मराठे होते. **पट्टणचें सोळंकी** ऊर्फ **चौलुक्य** हें मराठा कुळ जेव्हां **अणहिलपट्टणा** वर स्वारी करून राज्य करूं लागलें तेव्हां त्या कुळा बरोबर इतर जीं अनेक मराठा कुळें **पाटण**प्रांतीं गेलीं त्यांत बिंबांचें हि एक मराठा कुल त्या प्रांतीं जाऊन **चांपानेर** पंच्यायशींत लहानसे संस्थानिक किंवा **सरदार** म्हणून प्रस्थापित झालें. शक १०६० त **चांपानेर** पंचायशींतिल ह्या लहानश्या संस्थानांत **गोवर्धन बिंब** नामें करून संस्थानिक राज्य करीत होता. त्याचा धाकटा भाऊ जो **प्रताप बिंब** त्यानें दक्षिणे कडील **उत्तर-कोंकण** प्रांता वर मोहिम करण्याची परवानगी **गोवर्धन बिंबा** जवळ शक १०६० च्या सुमारास मागितली. शक १०६० च्या सुमारास म्हणजे शक १०६० च्या आधीं पांच दहा वर्षें **उत्तर कोंकणा** वर स्वारी करण्याचा बूट **चांपानेर** येथें निघाला असावा. **उत्तरकोंकणा** वर स्वारी करण्याचें कारण असें कीं त्या कालीं तो प्रांत बहुतेक अराजक अश्या स्थितींत होता. त्या प्रांतीं **उत्तरकोंकणीय शिलाहारांचें** राज्य नांवाला देखील होतें किंवा नव्हतें अशी स्थिती होती. वस्तुतः शक १०६० त किंवा शक १०६० च्या पूर्वीं पंचवीस तीस वर्षें तेथें **शिलाहारवंशीय** कोणी संस्थानिक राज्य करीत असल्याचा शिलालेखांतून किंवा ताम्रपटांतून दाखला मिळत नाहीं. शक १०१६ त **उत्तरकोंकणांत शिलाहारवंशीय अनंतपाल** राज्य करीत होता. तदनंतर शक १०६५ त **शिलाहारवंशीय मल्लिकार्जुन** गादी वर येई तों पर्यंतच्या पन्नास वर्षांत **उत्तरकोंकणांत** राजकीय गडबड चाललेली होती. ही गडबड कोणत्या स्वरूपाची होती तें विशद करण्या करितां तद्युगीन पाऊणशें शंभर

वर्षांचा **गुजराथ** व **महाराष्ट्र** या देशांतील राजांचा इतिहास विहंगमदृष्ट्या नजरे खालीं घालणें इष्ट आहे.

**१२** शक १००० पासून शक १०६५ पर्यंतच्या काळांत **गुजराथ, महाराष्ट्र** व **कोंकण** या प्रांतांत जे मुख्य राजे व उपराजे झाले व ज्यांचा संबंध प्रकृत इतिहास भागाशीं प्राधान्यानें येतो त्यांच्या राजांच्या नकाशाची स्थूल रूपरेषा खालील रेखाटणी-तल्या प्रमाणें होती.

**चौलुक्य** ऊर्फ **सोळंकी** ह्यांचें राज्य **सरस्वती**नदी पासून **लाटदेशा**पर्यंत पसरलेलें होतें. **चालुक्यांचें** बडें साम्राज्य **नर्मदे** पासून **कुमारी** पर्यंतचा विस्तीर्ण प्रदेश व्यापून राहिलेलें होतें. **शिलाहारांचें** मांडलिक राज्य **कऱ्हाड-कोल्हापुर** व **उत्तर कोंकण** ह्या दोन टापूं वर दोन शाखांनीं मंडित झालेलें होतें. आणि हाळशीचे **कदंब दक्षिण कोंकणांतील** शिलाहारांच्या **गोवेप्रांता** वर आपला अंमल नुकता च बसवून **उत्तरकोंकणा** कडे दृष्टि फेंकीत होते. शक १००० च्या सुमारास अशी राजकीय स्थिति **गुजराथ, महाराष्ट्र** व **कोंकण** ह्या प्रांतांत होती. ही राजकीय स्थिति कशी बनत आली तें पाहिल्या शिवाय शक १०६० त **प्रतापबिंबानें उत्तर-कोंकणा** वर स्वारी करण्याचा घाट कां घातला तें नीट उलगडणार नाहीं. **माल-खेडच्या राष्ट्रकूटांचें** राज्य शक ८९६ त जेव्हां **चालुक्यचक्रवर्ती नुर्मांडि-तैलानें** आक्रमण केलें, तेव्हां **राष्ट्रकूटांच्या** साम्राज्यांतील बहुतेक सर्व प्रांत यद्यपि त्याच्या अंकित झाले तथापि **गुजराथेंतील लाट** देश त्याच्या पंजा खालीं आला नाहीं. **राष्ट्रकूटांच्या** अंमला खालील **लाट** देश **अणहिलवाडच्या चौलु-क्यांनीं** ऊर्फ **सोळंकींनीं राष्ट्रकूटांच्या** हलाकीच्या दिवसांत आपल्या घशांत जो एकदा घातला तो **नुर्मांडि-तैलाच्या** कारकीर्दींत हि सोडला नाहीं. **चौलुक्यांचें** व **चालुक्यांचें** वैर उत्पन्न होण्यास व तें अक्षय्य टिकण्यास **लाटदेश** कायमचा कारण होऊन बसला होता. **चौलुक्यांच्या** हातांत राहो कीं **चालुक्यांच्या** हातीं जावो, कोणत्या तरी एका पक्षाच्या असंतोषाला त्याचें अस्तित्व सदा भरती आणी. ह्या सहज शत्रूं पैकीं **चालुक्यांच्या** बाजूला **कऱ्हाड, उत्तरकोंकण** व **दक्षिण-कोंकण** ह्या तीन प्रांतांतील शिलाहार राजे असत. **राष्ट्रकूटांचें** राज्य **नुर्मांडि-तैलानें** जें पादाक्रांत केलें त्यांत त्याला कऱ्हाडच्या **शिलाहारांचें** साहाय्य झालेलें होतें. तशांत **उत्तरकोंकणांतील शिलाहारांचा** प्रांत तर **लाट** देशाला अगदीं भिडून होता. सबब, प्रातिवेशिकधर्मानें **ठाण्याच्या शिलाहारांचें** व **अणहिलवाडच्या चौलु-क्यांचें** सहज वैर बनून गेलें होतें. असा बनाव बनून गेला असतां, **अणहिल-वाडच्या चौलुक्यांनीं कल्याणच्या चालुक्यांची** व **शिलाहारांची** जूट फोडण्याचा प्रयत्न केला. **कऱ्हाड, उत्तरकोंकण** व **दक्षिणकोंकण,** अशीं **शिलाहारांचीं** तीन संस्थानें होतीं. पैकीं **कऱ्हाडकर शिलाहार चालुक्यां-च्या** मैत्रीला सोडून जाणाऱ्या पैकीं नव्हते. **ठाणकर शिलाहार** शेजारपणा मुळें

**चौलुक्यांच्या** स्नेहाची अपेक्षा कधीं करतील ह्या संभव च नव्हता. राहिले **चंद्रपूरचे दक्षिणकोंकणांतील शिलाहार.** त्यांना **अणहिलवाड**करांनीं जुटींतून फोडिलें व आपल्या भाऊबंदांच्या व **चालुक्यांच्या** कुशींत एक पीडा उत्पन्न करून ठेविली. **चंद्रपूरकर** ऊर्फ **गोवेंकर शिलाहारांना** ह्या दुष्कर्माचें लवकरच प्रायश्चित्त मिळालें. शक ९३९ च्या सुमारास **ठाण्याच्या केशिदेव अरिकेसरी** नांवाच्या **शिलाहारानें गोव्याच्या रट्टराज शिलाहाराला** जिंकून त्याचें राज्य कायमचें खालसा केलें. ह्या कृत्यानें **उत्तरकोंकण** व **दक्षिणकोंकण** अशीं दोन्हीं कोंकणें शक ९३९ च्या सुमारास **उत्तरकोंकणीय शिलाहारांच्या** राज्यांत समाविष्ट झालीं व **अणहिलपट्टणच्या चौलुक्यांचा** एक स्नेही अजीबात नष्ट होऊन त्यांचें पारडें हलकें पडलें. **दक्षिण कोंकण ठाण्याच्या शिलाहारांच्या** ताब्यांत शक ९३९ च्या पुढें चाळीस पंचेचाळीस वर्षें राहिलें. त्या अवधींत **अणहिलवाडच्या चौलुक्यांनीं** हाळशीच्या **कदंबांचीं** उठावणी केली व त्यांच्या कडून **दक्षिण कोंकणावर** चाल करविली. **हाळशीच्या कदंबांत जयकेशी कदंब** या नामें करून एक मोठा शूर व साहसी पुरुष निर्माण झाला. त्याची मुलगी **मयाणल्लदेवी अणहिलवाडच्या कर्ण चौलुक्यानें** वरिली आणि **कदंब** व **चौलुक्य** ह्या दोन घराण्यांचा शरीरसंबंधानें दृढतर स्नेह जुळवून आणिला. मुख्यतः ह्या स्नेहाच्या पाठिंब्या वर व गौणतः स्वतःच्या जोरावर **जयकेशी कदंबानें** केवळ **दक्षिण कोंकण** च तेवढें जिंकलें असें नव्हें, तर **उत्तरकोंकण** ऊर्फ **कवडीद्वीप** चुरडून तेथील राजा जो **माम्वाणी शिलाहार** त्याचा जीव घेतला. हा प्रसंग शक ९९८ च्या सुमारास घडला. **जयकेशी कदंब** व **माम्वाणि शिलाहार** हे दोघे हि **कल्याणीच्या चालुक्यांचें** मांडलिक होते. तेव्हां ह्या मांडलिकांतील हा प्राणघेण्या बखेडा **चालुक्य** सम्राटांनीं निमूटपणें कसा चालूं दिला, अशी शंका येण्याचा संभव आहे. परंतु शक ९९८ त **चालुक्यांच्या** राज्यांत गादी करितां आपसांत भांडण उपस्थित झालें होतें. पहिल्या **सोमेश्वर चालुक्याचे सोमेश्वर** व **विक्रमादित्य** असे दोन मुलगे होते, वडील **सोमेश्वर** व धाकटा **विक्रमादित्य. सोमेश्वर** हा ऐदी, थंड व संशयी माणूस होता. **विक्रमादित्य** त्याच्या अगदीं उलट, स्वभावाचा म्हणजे साहसी, पराक्रमी व लोकप्रिय होता. **सोमेश्वराच्या** बाजूला **ठाण्याचा शिलाहार माम्वाणि** असून, **विक्रमादित्याची** साथ **जयकेशी कदंब** करीत असे. **विक्रमादित्याच्या सोमेश्वराशीं** ज्या शेवटच्या झटापटी झाल्या त्यांत **जयकेशी कदंबानें सोमेश्वराचे** भिड्र जे **राजेन्द्र चोल** व **माम्वाणि शिलाहार** त्यांचा पराभव करून, **माम्वाणि** शिलाहाराला ठार करून टाकिलें. अशा तऱ्हेनें **उत्तरकोंकण** ऊर्फ **कवडीद्वीप जयकेशी कदंबाच्या** ताब्यांत शक ९९८ च्या सुमारास गेलें. तें सुमारें पंचवीस वर्षें **कदंबांच्या** अंमला खालीं होतें. पुढें शक १०१६ च्या सुमारास **माम्वाणि शिलाहाराचा** पुतण्या व **नागार्जुन शिला-**

**हाराचा** मुलगा जो **अनंतपाल शिलाहार त्यानें जयकेशी कदंबाचा** पुत्र जो पहिला **विजयादित्य कदंब** त्याला हटवून **उत्तरकोंकणचें** म्हणजे **कवडीद्वीपाचें** आपलें राज्य परत घेतलें; परंतु, थोडया च अवधींत **कदंबांनीं कवडीद्वीपाचें** पुनः आक्रमण केलें ( शक १०४८ ). दहा पांच वर्षें उत्तरकोंकण कदंबांच्या ताब्यांत राहिल्या वर, अपरादित्य शिलाहारानें तें पुनः हिसकावून घेतलें; असा गोंधळ उत्तर कोंकणांत पन्नास वर्षें चालल्या मुळें, शिलाहारांची सत्ता अगदीं डळमळून गेली व देश सर्वस्वीं नागविला जाऊन केवळ अरण्यमय झाला. शिलाहारांच्या अश्या हलाकीच्या काळांत शक १०६० त चांपानेरच्या बिंबोपनामक क्षत्रियांनीं उत्तरकोंकणा वर स्वारी करण्याचा घाट घातला.

**१३** शक १०६०त **कल्याणी** येथें तिसरा **सोमेश्वर भूलोकमल्ल चालुक्य**- सर्व **दक्षिणापथाचें** साम्राज्य करीत होता. **मानसोल्लास** ऊर्फ **अभिलषितार्थचिंतामणि** नामक ग्रंथाचा कर्ता जो **सोमेश्वर चालुक्य** तो हा च. ह्याचा कल राज्यरक्षणा पेक्षां साहित्यशास्त्रसेवे कडे विशेष होता. ह्याच्या कारकीर्दी नंतर **चालुक्यांच्या** सद्दीला ओहोटी लागली, कलचुर्यांनीं कल्याणीचें राज्य बळकाविलें, **बसव लिंगायतानें** बखेडा केला व त्या बखेडयाच्या घालमेलींत कलचुर्यसत्ता संपुष्टांत आली. ह्या च अवधींत **अणहिलपट्टणास** प्रख्यात **सिद्धराज जयसिंह चौलुक्य** हा कर्ता पुरुष राज्य करीत होता व त्याचा प्रसिद्ध पुत्र **कुमारपाल चौलुक्य** पांच वर्षांनीं आपली विजयी कारकीर्द सुरू करणार होता. म्हणजे ह्या कालीं **कल्याणीच्या चालुक्यांची** सत्ता क्षीण होत जाण्याच्या मार्गास लागली होती आणि **अणहिलवाडच्या चौलुक्यांची** सत्ता ऐन विजयश्रीच्या भरांत होती. **अणहिलवाडच्या** अश्या भरभराटीच्या उमेदींत **चौलुक्यांचे** मांडलिक जे **चांपानेरचे बिंब** राजे त्यांनीं **उत्तरकोंकणा** वर चढाई करण्याचा मनोदय शक १०६० त केला. ह्या मनोदयानें चौलुक्यांचे मित्र जे गोव्याचे कदंब त्यांची हि बाजू उचलल्या सारखी झाली. युद्धयात्रेला मुहूर्त आश्विन–कार्तिकांतील न धरतां, मुद्दाम माघफाल्गुनांतील धरला. कारण, **उत्तरकोंकणांतील** सरदगर्मी व तापसराई माघ महिना उजाडे तंव वर निखालस संपत नाहीं. माघशुद्धांत दोन मुहूर्त होते; एक वसंतपंचमीचा व दुसरा रथसप्तमीचा. पैकीं पंचमीला मंदवार पडत असल्या मुळें, सप्तमीचा मुहूर्त पसंत ठरला. ह्या शुभ मुहूर्ता वर **चांपानेर** पंच्यायशी वर राज्य करणऱ्या **गोवर्धन बिंबानें** आपला धाकटा भाऊ **प्रताप बिंब** ह्याज समागमें दहा हजार घोडा देऊन स्वारी सिद्ध केली. दहा हजार घोडा या शब्दांनीं केवळ दहा हजार घोडेस्वार असा अर्थ घ्यावयाचा नाहीं. पाईक, बाजारी, बुणगे, वगैरे उपसाहित्याचे सर्व लोक मिळून, सैन्यसंख्या सुमारें दहा हजार होती, एवढा च अर्थ लक्षित आहे. खरे ऐन लढवय्ये घोडेस्वार सुमार पांच चार हजार असावे. स्वारीस निघण्याच्या संकल्पाचा ठराव गोवर्धन बिंबानें आपला मुख्य सेनापति नाईकराव व मुख्यमंत्री रघुनाथराव ह्यांच्या संमतीनें केला. प्रताप बिंबा

बरोबर पूर्वप्रघातानुरूप राजगुरु ऊर्फ राजपुरोहित हेमाडपंत चामरे ऊर्फ चावरे ह्यांस सल्लामसलती करितां दिलें होतें. पुरोहिता खेरीज आणीक अधिकारी प्रताप बिंबाला जे गोवर्धन बिंबानें नेमून दिले त्यांची नांवनिशी अशीः—

| | पदवी | नांव | वंश | जाति | गोत्र | देवता |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | सेनाध्यक्ष= | केशवराव | सोमवंशी= | मराठा= | वकदालभ्य= | पद्मावती |
| २ | सेनोपाध्यक्ष= | आनंदराव | शेषवंशी= | मराठा= | हारीत= | हीरबादेवी |
| ३ | सेनागणक= | गंभीरराव | सूर्यवंशी= | मराठा= | वशिष्ठ= | कालिका |
| ४ | गुल्माध्यक्ष= | पुरुषोत्तमराव | सोमवंशी= | मराठा= | गौतम= | नारायणी |
| ५ | कोशाध्यक्ष= | xxxxxx | सोमवंशी= | मराठा= | विश्वामित्र= | ललिता |
| ६ | कोटपाल= | गंगाजी | पट्टवर्धन= | मराठा= | रेणुक= | योगेश्वरी |
| ७ | मुख्यप्रधान= | बाळकृष्णराव | सोमवंशी= | मराठा= | कौंडण्य= | कुमारिका |

पुरोहिता सुद्धां हे आठ अधिकारी ऊर्फ प्रधान प्रताप बिंबा बरोबर होते. फक्त एकटा पुरोहित तेवढा ब्राह्मण, बाकीचे सात एकोनएक मराठे. ह्या साता हि मराठयांना गोत्रें होतीं व तंत्रागमानुरूप त्यांच्या निरनिराळ्या कुळदेवता होत्या. ह्या सर्व समुदायां (सैनिक, अधिकारी व बुणगे) सह प्रताप बिंब मोहिमेस निघाला, तो थेट लाट देशांतून उत्तरकोंकणांत शिरला नाहीं. कारण, लाट देश त्या कालीं अणहिलपट्टणच्या अंमला खालीं नसून, बारप्प चौलुक्याच्या स्वतःच्या व वंशजांच्या अंमला खालीं होता. हा बारप्प चौलुक्य अणहिलपुरकर चौलुक्यांच्या विरुद्ध असून कल्याणीच्या **तैल** चालुक्याच्या बाजूचा होता. सबब, लाटदेश उजवी कडेस टाकून, प्रताप बिंब नर्मदा उतरून व सातपुडा वलांडून बहुशः अजंठ्याच्या घाटानें पैठणास गेला. त्या कालीं नर्मदा, सातपुडा, अजंटा व पैठण ह्या प्रांतांत निरनिराळे संस्थानिक असून, हे संस्थानिक कल्याणींच्या चालुक्यांना विरोध करणाऱ्यां पैकीं होते. शिवाय, पैठणास त्या कालीं भौम आडनांवाचा जो संस्थानिक होता तो चांपानेरच्या बिंबांच्या स्नेहसंबंध्यांतला, बहुशः शरीरसंबंध्यांतला होता. पैठणच्या विक्रम भौमानें ( बखरींत भोम अशीं अक्षरें आहेत ) प्रताप बिंबाला त्याच्या परिवारा सह, म्हणजे त्याच्या दहा हजार सैन्या सह, दोन वर्षें स्वतः जवळ ठेऊन घेतलें. प्रताप बिंबाला हि पैठणास तळ देऊन पाहुणचार खाण्यां शिवाय गत्यन्तर नव्हतें. कारण, त्याची पैशाची टंचाई होती. दोन वर्षांत मुख्य प्रधान बाळकृष्णराव सोमवंशी यानें पैशाची व्यवस्था लावून, शक १०६२ त पैठणाहून दक्षिणेस चाल केली. प्रताप बिंबाला उत्तर कोंकणांत म्हणजे सध्यांच्या रामनगर, जव्हार, कल्याण, ठाणें व मुंबई या टापूंत शिरावयाचें होतें. तेव्हां पैठणाहून देवगिरी, अंकाई-टंकाई, बागलाण ह्या रस्त्यानें नवसारी प्रांतांत न उतरतां, प्रताप बिंब पैठण, नेवासें, जुन्नर ह्या रस्त्यानें दवणप्रांतांत उतरला. पैठणाहून हरबाजी देशमुख ऊर्फ देसला प्रताप बिंबाला, कोणाच्या सांगीशिफारसीनें नव्हे तर स्वतःच्या ईर्ष्येनें, येऊन मिळाला; आणि विक्रम भौमाच्या शिफारसी वरून युद्धांत प्रखर म्हणून नांवाजलेला बाळाजी शिंदा दोन

हजार घोड्या निशी प्रताप बिंबाच्या साह्यास सिद्ध झाला. एकूण बारा हजार घोड्या निशी प्रताप बिंबानें दवण प्रांता वर झडप घातली. कल्याण, ठाणें, माहुल ह्या दक्षिणेकडील महालांत न उतरतां, दमण प्रांतांत च सह्याद्रीच्या रानांतून शिरण्याचें कारण असें कीं उत्तरकोंकणची राजधानी जें ठाणें शहर तेथें शिलाहारांचें ऐश्वर्यानें जरी नव्हे तरी वास्तव्यानें अस्तित्व होतें. उत्तरकोंकणस्थ शिलाहारांत प्रतापानें प्रखर असा कोणी हि पुरुष यद्यपि त्या कालीं नव्हता, तत्रापि शिलाहारवंशांतील अपरादित्य, यशवंतराव वगैरे कित्येक राजन्यक ठाणेप्रांतांत व शहरांत रहात असत. करतां, त्यांच्याशीं त्यांच्या मुख्य शहरांत जाऊन टक्कर घेण्या पेक्षां, उत्तरे कडील दमण प्रांतांत भोंक पाडून, तेथून रागरंग पाहून उत्तरकोंकणचें राज्य आक्रमण करण्याचा सोपा मार्ग प्रताप बिंबानें स्वीकारिला; खुद्द ठाणें शहरा वर हल्ला केला असतां, परमप्रतापी जो कऱ्हाडचा विजयादित्य शिलाहार त्याच्याशीं प्रसंग पडेल व प्रथमग्रासीं च मक्षिकापात घडेल, या भीतीनें प्रताप बिंबानें दूरच्या दमण महाला वर चाल केली. दमणास त्या काळीं काळोजी सीरण्या नामें करून कोणी पुंड राजा म्हणून मिरवत होता. ठाणेकर शिलाहारांच्या पडत्या काळांत ठिकठिकाणचे जे अनेक नाइकवडे स्वतंत्र बनले त्यां पैकीं काळोजी सीरण्या हा दमणप्रांतांत राजा बनला होता. तो प्रताप बिंबास दर्शनमात्रें च शरण आला. तेणें करून दमण पासून चिखली पर्यंतचा प्रांत प्रताप बिंबाच्या हवाली झाला. दमण शहर व प्रांत स्वभावत: च बहुत रम्य आणि तेथील समुद्रतीर तर केवल नयनमनोहर! तें रम्य स्थळ काळोजी सीरण्याच्या रानटी धबडग्या खालीं उद्ध्वस्त व वैराण होऊन गेलें होतें. त्या स्थळाची ऊर्जा करण्या करितां तेथें प्रताप बिंबानें कायस्थ हरबाजी कुळकरणी अधिकारी ठेविला. तेथून चाल करीत तारापुरा वरून प्रताप बिंब महिकावतीस ऊर्फ माहिमास प्रविष्ट झाला. माहिमास त्या काळीं विनाजी घोडेल राज्य करीत होता. केवळ आगमनें करून त्या घोडेलाला प्रताप बिंबानें दूर केलें आणि कांहीं काल माहिमास राहून देशाची स्थिती अवलोकन केली. सर्व देश वैराण व उद्ध्वस्त झालेला दिसला. घोडेल वगैरे अतिशूद्रांच्या हातांत राज्ययंत्र जाऊन, ढुंगणाला दश्र देखील नाहीं अश्या नीच लोकांच्या कचाटींत रम्य समुद्रतीर सांपडलेलें आढळलें. शिलाहारां सारख्या सुसंस्कृत मराठ्यांच्या अंमलांत सुपीकतेचें बाळसें जें देशाला चढलें होतें तें पार ओसरून जाऊन, देश पावरी, घोडेल, कोळी व ठाकर वगैरे वन्य लोकांच्या बदअंमला खालीं पोरक्या पोरा प्रमाणें अन्नान्न दशे प्रत पोहोचलेला दिसला. तेव्हां प्रताप बिंबाच्या मनांत स्वदेशाहून भले भले मराठे व ब्राह्मण लोक आणून देशाची वसाहत करण्याचा विचार आला. माहिमाहून मुख्य प्रधान जो बाळकृष्णराव सोमवंशी त्यास प्रताप बिंबानें वाळुकेश्वरा पर्यंतचा सर्व मुलूख कबजातींत आणण्या करितां पाठविलें. मध्यें ठाणेकोंकणचा राजा कोणी यशवंतराव शिलाहार होता, त्याच्याशीं युद्ध होऊन तो मारला गेला. अपरादित्य शिलाहाराला बाजूला सारून, ह्या यशवंतरावानें शक १०६२ च्या सुमारास ठाण्याची गादी उपटली असावी असें दिसतें. हा यशवंतराव शिलाहार इतका

क्षुद्र होता कीं ह्याच्या लहानश्या कारकीर्दींतील एक हि शिलालेख किंवा ताम्रपट वगैरे लेख बिलकुल उपलब्ध नाहींत. ह्याच्या हयातींत उत्तरकोंकणचा दक्षिणे कडील बराच भाग गोव्याच्या कदंबांच्या हातीं गेला होता आणि हा ठाणें जिल्ह्यांतील दहा पांच गांवांत कसा तरी जीव धरून होता. ह्याची व प्रताप बिंबाचा मुख्य प्रधान बाळकृष्ण-राव सोमवंशी याची गांठ पडून, बाळकृष्णरावाच्या तरवारीला हा बळी पडला. यशवंत-राव शिलाहाराला मारून बाळकृष्णराव कळव्यास आला. तेथें कोकाव्या नांवाच्या क्षुद्र मराठ्याचा अमल होता. लढाई बिढाई न होता, तो निमूटपणें शरण आला. तेथून सोमवंशी मठास किंवा मढास समुद्रतीरीं पोहोचला. मठ येथील ब्रह्मकुंड, हिरबादेवी व मुक्तेश्वरदेव बघून बाळकृष्णराव येसावें, जुहूं, वाहिनळें, राजणफर, ह्या गांवा वरून थेट वाळुकेश्वरीं गेला. तेथील बाणगंगा तीर्थ व हनुमंताची प्रतिमा देखून, मुख्य प्रधानानें पांच दिवस समुद्रकांठीं मुक्काम केला. बरोबर सैन्य होतें, सबब बाळकृष्ण-रावाचा तळ बाणगंगेच्या काठीं सध्यां जेथें गव्हर्नमेंट हाउस आहे तेथें उघड्या जागेंत पडला असावा. केळवेंमाहीम हा मध्य बिंदू धरून दमण पासून वाळुकेश्वरा पर्यंत एकंदर लांबी पक्के २८ कोस म्हणजे सध्याचे ८४ मैल होते, असें बाळकृष्णराव प्रधानाच्या मोजणींत आलें. सर्व देश केवळ रान होऊन गेला आहे, आपण एकदा स्वतः येऊन पहावा, अश्या अर्थाचें पत्र प्रधानानें राजा प्रतापबिंबास माहिमास पाठविलें. त्या प्रमाणें स्वत: येऊन व देशाची दुरवस्था पाहून, तेथें नवीन वसाहत करण्याचा निश्चय प्रताप बिंबानें केला.

**१४** असें दिसतें कीं दमण पासून वाळुकेश्वर पर्यंतचा मुलूख काबीज करण्यास प्रताप बिंबाला सुमारें दोन महिन्यां हून जास्त काळ लागला नसावा. काळोजी सीरण्या, विनाजी घोडेल, यशवंतराव शेलार व कोकाव्या ह्या चार क्षुद्र राजांशीं लढाया किंवा साम करण्यास ह्या हून जास्त वेळ लागण्याचें कारण नव्हतें. शिवाय, सर्व देश वैराण झालेला होता. त्या मुळें रस्त्यांत इतर अडथळे होण्याचा संभव नव्हता. सैन्याला दाणवैरण पुरविण्यांत जो कालातिपात झाला असेल तो जर वगळला, तर ही मोहीम सुमारें वीस पंचवीस दिवसांत खलास झाली असावी. देशाला अरण्याची अवस्था प्राप्त झाली होती, असें बखरकार लिहितो. त्या वरून अनुमान होतें कीं अनंतपाल शिला-हाराच्या नंतर जीं पन्नास वर्षे गेलीं त्या पन्नास वर्षांत गोव्याच्या कदंबांना उत्तरकोंकणांत सुखानें राज्याराम घेतां आला नाहीं. शिलाहारवंशीय व्यक्तींनीं व शिलाहारांच्या अधिका-ऱ्यांनीं कदंबांना इतकें भंडावून सोडिलें असावें कीं शक १०१६ पासून शक १०६० पर्यंत देशांत झुंझें, छापे व जाळपोळ ह्यांचा सुळसुळाट होऊन, शेती, उदीम, व्यापार-धंदा, ग्रामसंस्था व आमदरफ्त अगदीं बंद झाली व दमण पासून वाळुकेश्वर पर्यंतचा मुलूख बेचिराख अरण्य बनलें. अश्या दुरवस्थेंतून देश सुखरूप बाहेर पडावयाचा म्हणजे पूर्वींच्या राजांचा अंमल देशा वर पुन: स्थिर झाला पाहिजे किंवा नवीन बाहेरच्या राजांनीं येऊन तेथें स्थिरस्थावरता उत्पन्न केली पाहिजे. आणि शक १०६० च्या नंतर

उत्तरकोंकणांत हे दोन्ही प्रकार सुरू झाले. बाहेरचा बिंबवंशीय राजा येऊन त्यानें उत्तरकोंकणचा समुद्रतीरा लगतचा पश्चिमेकडील प्रांत आक्रमिला; आणि ठाणेंकोंकणच्या मल्लिकार्जुन शिलाहारानें कऱ्हाडकर शिलाहारांच्या साहाय्यानें उत्तरकोंकणच्या पूर्वेकडील प्रांता वर पुनः राज्य स्थापिण्याचा संकल्प केला. प्रताप बिंबानें केळवेंमाहीम हें राजधानीचें गांव नवीन निर्मिलें. कल्याणा जवळील ठाणें ही शिलाहारांची पूर्वीची राजधानी होती च. शक १०६२ त बिंबोपनामक प्रतापानें दमण पासून वाळुकेश्वर पर्यंतच्या समुद्रीय प्रांतांत एक नवीन राज्य कसें स्थापिलें त्याचा हा असा वृत्तान्त आहे. हें नवीन राज्य शक १०६२ पासून शक ११६३ पर्यंत सुमारें शंभर वर्षे टिकलें. ह्या शंभर वर्षांत ज्या राजकीय, सामाजिक, आर्थिक व भौमिक उलाढाली झाल्या त्यांचें वर्णन बखरीच्या अनुरोधानें पुढें करितों.

१५ प्रताप बिंबाच्या नवीन राज्याला महिकावतीचें राज्य ऊर्फ माहीमदेशचें राज्य म्हटलें असतां तें याथार्थ्याला सोडून नाहीं. देश हस्तगत झाल्या वर प्रताप बिंबानें पैठणास विक्रम भौमास व चांपानेरास गोवर्धन बिंबास देशाची वसाहत करण्या करितां रयत पंचायत पाठविण्या विषयीं व आपला पुत्र मही बिंब यास धाडून देण्या विषयीं पत्रें लिहिलीं. तदनुरूप मही बिंब चांपानेरा हून ६६ कुळें घेऊन ठाणें माहीमास आला. सासष्ट कुळां खेरीज आणीक हि बरींच कुळें मही बिंबा बरोबर आलीं, परंतु मुख्य नावाणिक अशीं कुळें सासष्ट होती. त्यांत २७ सोमवंशी कुळें, १२ सूर्यवंशी कुळें व ९ शेषवंशी कुळें होतीं. देश उजाड झाला होता व गांवें ओस पडलीं होतीं, सबब, वाणी, उदमी, वगैरेंचीं हि बरींच कुळें आणावीं लागलीं. लाड, दसालाड, विसा लाड, गुजर वैश्य, पंचाळ, मनुभाया, सलींक, त्राटक, दैवज्ञ, धोंडेल, मोड, दसामोड, विसा मोड, वगैरे कुळें चांपानेराहून आलीं. पैठणाहून मही बिंबानें कांहीं ब्राह्मणकुळें आणिलीं, त्यांत शास्त्री, वैदिक, पंडित, आचार्य, उपाध्ये, ज्योतिषी, पुरोहित, व नाईक वगैरेंचीं कुळें होतीं तात्पर्य, व्यापार, उदीम, शास्त्र व संस्कृति ह्यांची स्थापना ह्या उजाड अरण्यमय देशांत प्रताप बिंबाला सर्वतो प्रकारांनीं करावी लागली. इतकी विलक्षण हलाकी पन्नास वर्षांच्या अराजकानें देशाला प्राप्त झाली होती ! शिलाहारांच्या ऐन भरभराटीच्या वेळच्या संस्कृतीचा केवळ नायनाट होऊन गेलेला होता. मिळविलेल्या नवीन राज्याचा प्राणप्रतिष्ठासमारंभ यथाशास्त्र उरकण्यास योग्य ब्राह्मण हि मिळण्याची पंचाईत पडली. पैठणाहून शास्त्री, पंडित व पुरोहित वगैरे मंडळी जेव्हां आली तेव्हां हा राज्यप्रतिष्ठासमारंभ यथासांग साजरा झाला. राज्यारोहणसमारंभ वाळुकेश्वरा नजीक ठाण्यास झाला. ठाण्यास म्हणजे प्रताप बिंबाच्या लष्करांत ऊर्फ कटकांत. त्या काळीं कटकाला स्थानक ऊर्फ ठाणें म्हणत. प्रताप बिंबाच्या ह्या ठाण्या हून शिलाहारांचें ठाणें शहर निराळें. शिलाहारांनीं प्रथम जेव्हां उत्तरकोंकणांत राज्य स्थापिलें, तेव्हां त्यांच्या सैन्याचें जें मुख्य कटक ऊर्फ स्थानक तें च पुढें वाढून मोठें राजधानीचें शहर झालें व ठाणें या प्राकृत नांवानें सर्व पृथ्वी भर गाजलें. शिला-

ह्यारांच्या त्या जगप्रसिद्ध व इतिहासप्रसिद्ध ठाण्याशीं प्रताप बिंबाच्या वाळुकेश्वरच्या नवीन तात्पुरत्या लष्करवजा ठाण्याचा कांहीं एक संबंध नाहीं. ठाण्यास वैदिक, शास्त्री, पुरोहित, सेनाध्यक्ष, वैश्य, वगैरे समुदाय जमून, त्या पैकीं ब्राह्मणांनीं प्रताप बिंबाला आशिर्वाद दिला व ब्राह्मणेतरांनीं जोहार म्हणजे जयकार केला. ह्या वेळीं पैठणाहून जी ब्राह्मणमंडळी आली त्यांची याद बखरकार जी देतो ती अशी:—

( १ ) गंगाधर नाईक सांवखेडकर—शेषवंशिकांचे कुळगुरू
( २ ) विश्वनाथपंत कांबळे—राजपुरोहित
( ३ ) भास्कर पंडित चामरे
( ४ ) गोवर्धनाचार्य देवधर—प्रधान
( ५ ) अनंत नायक छत्रे
( ६ ) केशव राम घोडे
( ७ ) मोगरे
( ८ ) जाधवे
( ९ ) हेमटे

इत्यादि यजुर्वेदी देशस्थ माध्यंदिन मंडळी पैकीं गंगाधर नाईक सांवखेडकरांस पसपवली गांव व विश्वनाथपंत कांबळ्यांस पाहाड गांव प्रताप बिंबानें वंशपरंपरा इनाम दिला. इतर हि गांवीं ब्राह्मणांस वृत्त्या राजहस्तें मिळाल्या. राजा स्वत: वाहिनळे राजणफर येथें राहिला. मरोळी खापण्यांत महाळजापुर व मालाड खापण्यांत नरसापुर येथें वसाहत करविली. काळभैरवी जोगेश्वरीचें ठिकाण जें कान्हेरी तेथील सिद्धाश्रम पाहून व पुरातन कालीं तेथें राजधाम होतें हें जाणून प्रताप बिंब कांहीं काल लेण्यांत राहिला. सूर्यवंशी मराठ्यांची स्थापना राज्यधाम जें माहीम तेथें केली. शेषवंशियांस चौगुलेपद दिलें. गुजर बकाल यांज करवीं गांवोगांवीं दुकानें मांडविलीं. तीन वर्षें उदमीं सुकडा ( शुल्क= सुंक ) नाहीं व व्यापारीं जकात नाहीं, असा बंदोबस्त केला. शिलाहारांच्या राजवटींतील जुने वृत्तिवंत फारसे कोणी राहिले नव्हते. फक्त पटवर्धन नामें करून कोणी ब्राह्मण माहीमचें स्थळगुरुत्व संपादणारा राहिला होता, त्याची वृत्ति प्रताप बिंबानें त्याच्या कडे पूर्ववत् कायम केली. वृत्तिवंतांची एणें प्रमाणें गांवगन्ना व्यवस्था लावून, प्रताप बिंबानें निरनिराळ्या माहालां वर जे हवालदार नेमिले त्यांची यादी अशी:—

| नांव | महाल | गांवें | खोतीची रकम |
|---|---|---|---|
| १ रखमाजीराव सोमवंशी देसला | मरोळ | २२ गांवें | ९००० सजगाण्या |
| २ गंगाधरराव देसला | मालाड | २२ गांवें | १०००० सजगाण्या |

महाल १

स्वंशी उतन हवाला २

बंदरकी पांच गांवें

इनाम तीन हजार

स्वारांच्या खर्चास

मसाला १७ गांवें

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ४ | गंभीरराव सूर्यवंशी पद पुरी | | वरोळी गांव इनाम | |
| ५ | विठोबा सोमवंशी सरफौजदार ताबीस राऊत ५०० | | पांच पाखाड्या | ४००० सजगाण्या |
| ६ | धर्मोजी शिंदा शेषवंशी | | चार गांवें इनाम | ३००० सजगाण्या |
| ७ | हरबाजी तोरणा | | तेरा गांवें | ६००० सजगाण्या |
| ८ | देवनरे | | बारा गांवें | १२००० सजगाण्या |
| ९ | हरबाजी कायस्थ कुळकरणी | घोडबंदर | तेहतीस गांवें | ४०००० सजगाण्या |
| १० | आनंदराव सरसबनीस शेषवंशी | ( हवाल्याचा तपशील दिला नाहीं ) | | |

वरील यादी वरून दिसेल कीं दहा हि हवालदारांच्या हवाल्यांतील सर्व गांवें वसईच्या खाडीच्या दक्षिणेस घोडबंदरा पासून मुंबईवाळुकेश्वर पर्यंतच्या टापूंतील आहेत, वसईच्या खाडीच्या उत्तरे कडील दमण पर्यंतच्या टापूंतील एक हि गांव नाहीं. ह्याचा अर्थ असा होतो कीं प्रतापबिंब वसईच्या खाडीच्या दक्षिणेस उतरल्या वर, अपरादित्य शिलाहारानें किंवा शिलाहारवंशांतील दुसऱ्या राजन्यकांनीं वसईच्या खाडीच्या उत्तरे कडील प्रांता वर स्वारी केली आणि प्रताप बिंबाला व मही बिंबाला साष्टीच्या बेटांत कोंडून टाकिलें. त्या मुळें वसई, सोपारा, केळवेमाहीम, तारापूर, डाहाणू व दमण ह्या उत्तरे कडील टापूंशीं प्रताप बिंबाचा बिलकुल संबंध सुटला. अर्थात्, वसईच्या खाडीच्या उत्तरे कडील प्रांतांत हवालदार व महालकरी नेमण्याचें प्रयोजन च राहिलें नाहीं. असा कोंडमारा झाल्या मुळें, साष्टी बेटांत मोठ्या सावधगिरीनें स्वतःचें व स्वतःच्या सैनिकादि लोकांचें संरक्षण करणें ओघास आलें. वसईच्या उत्तरे कडील केळवेमाहीम हातचें गेलें, तर प्रताप बिंबानें दुसरें नवीन एक माहीम वांद्र्याच्या दक्षिणेस निर्माण केलें व तेथें आपली कायमची राजधानी केली. शिलाहारांची राजधानी जें कल्याणठाणें तें राजपुत्र मही बिंब यानें हस्तगत करून, तेथें सैन्या सह दुसरें ठाणें दिलें. साष्टि बेटांतील निरनिराळ्या हवाल्यांत व महालांत सरदारांच्या हाता खालीं

ठिकठिकाणीं राउतांचे गुल्म होते व. अश्या तऱ्हेनें साष्टी बेटांत कडेकोट तयारीनें प्रताप बिंब व महीं बिंब राहूं लागले. साष्टी बेटांतून शिलाहारांची कायमची हकालपट्टी झाली. शक १०६२ नंतर म्हणजे अपरादित्या नंतर हरिपालदेव, मल्लिकार्जुन, अपरादित्य, केशिदेव व सोमेश्वर असे पांच शिलाहार राजे शक ११८२ पर्यंतच्या शंभर सवा शे वर्षांच्या अवधींत होऊन गेले. ते आपल्याला ठाणे कोंकणचे अधिपति म्हणवीत. कधींकधीं ठाणें शहरा भोंवतालील प्रांत त्यांच्या ताब्यांत हि जाई, परंतु त्यांचा स्थायिक अंमल त्या प्रांतांतून प्रताप बिंबाच्या कालीं जो एकदा उठला तो पुनः नीटसा असा कधीं बसला नाहीं. वसई व सोपारा ह्या दोन बेटां वर वैतरणा नदीच्या दक्षिणेस व वसईच्या खाडीच्या उत्तरेस मात्र त्यांचा अंमल शक ११८२ पर्यंतच्या सवा शे वर्षांच्या अवधींत निरंतर चालला. साष्टींत बिंबराजांचा अंमल व शूर्पारक देशांत शिलाहारांचा अंमल, असा मनू शक १०६२ पासून उत्तरकोंकणांत प्रचलित झाला.

१६ माहीम ऊर्फ बिंबस्थान म्हणजे बिंबराजांच्या सैन्याच्या छावणीचें स्थान येथें प्रताप बिंबानें एकंदर नऊ वर्षे राज्य केले. त्या काळच्या रूढी प्रमाणें त्याची राणी त्याच्या बरोबर सती निघाली. नंतर मही बिंब गादी वर आला. त्यानें शक १०६९ पासून शक ११३४ पर्यंत ६५ वर्षे गादीचा उपभोग घेतला. त्याच्या अमदानींत संवत् १२४५ त म्हणजे शक १११० त चंपावतीच्या म्हणजे चेऊलच्या भोजराजानें बिंबांच्या राज्या वर चाल केली. उरणापासून शहाबाज परगणा मारीत थेट ठाण्याजवळील कळव्या पर्यंत भोजाचें सैन्य येऊन पोहोचलें. मही बिंबा जवळ ८००० आठ हजार दळ होतें. खाडी उतरून, कळव्यास दोन्हीं दळांचें थोर युद्ध झालें. त्यांत भोज राजा प्राणास मुकला. तेव्हां भोजाचा प्रधान मही बिंबाच्या आड आला. त्याचा वध शेषवंशी केशवराव यानें केला. हा दुसरा पराभव पाहून, भोजराजाचा पाळकपुत्र युद्धास सज्ज झाला. त्याला मरोळच्या हंबीररावानें यमसदनास पाठविलें. तेव्हां नामोहरम होऊन भोजाचें राहिलेंसाहिलें सैन्य पळोन गेलें, महीबिंबाला मोठा जय मिळाला. युद्धांत ज्यांनीं पराक्रम केले त्यांना राजानें पदव्या व पारितोषकें दिलीं. देसायांना वृत्या दिल्या, शेषवंशी केशवरावाला गळ्यांतील पदक देऊन चौधरीपणा अर्पण केला. देवनरच्या पाइकानें थोर नामोष केला, सबब त्याला ठाकूर पद दिलें. मरोळकर देसायाला कहाळांच्या दोन श्रुती वाजविण्याचा मान मिळाला. गंगाधर नाईक सांवखेडकर यांना पराक्रमा बद्दल वाद्यें, विराणें व वीरगांठ प्राप्त झाली. रघुनाथपंताच्या पदरांत सरदेशकी पडली. उतनचे बारा राऊत पडले त्यांच्या कुळास राऊत पद वंशपरंपरा झालें, कांधवळीच्या दहा पाइकांच्या वंशजांस चौगुलकी मिळाली. साहारकर, कोंडिवटेकर, देवनरकर, चेंभूरकर, नरसापुरकर, वगैरे शेलके वीर, कडीं, तोडे, सांखळ्या, वीरगांठी, वगैरे त्यां त्यां योग्य अशीं बक्षिसें पावले. एणें प्रमाणें आसपासच्या बरोबरीच्या संस्थानिकांना वचकांत ठेवून मही बिंबानें ६५ वर्षे सुखानें राज्य करून शक ११३४ त देह ठेविला. त्या वेळीं त्याचा पुत्र केशवदेव याचें वय

पांच वर्षांचें होतें. त्याची आई कामाई इजकडे राज्य चालविण्याची जोखीम आली. महीं बिंबाच्या उतार वयांतील ही त्याची शेवटची बायको वयानें तरुण व रूपानें सुंदर होती. तिच्या विषयीं प्रधानाला पापवासना उत्पन्न झाली. कामाई आपल्या मनीं बहुत खिन्न झाली. तिनें माहीमच्या हरद पुरोस प्रधानाची ही दुष्ट वासना निवेदिली. हरद पुरो म्हणाला, तू आम्हा सर्वांची माता, तुज पाहे ऐसा कोण आहे ? असें म्हणून हरद पुरोनें देशांतील कित्येक विश्वासाचे राऊत मिळविले आणि कुसुंबा भांग चढवून रात्रीस प्रधानाच्या महालास वेढा दिला. तेथें जंगी झटापट होऊन हांहां म्हणता हरद पुरोनें प्रधानाचा शिरच्छेद केला आणि तें शीर नेऊन कामाईच्या पुढें टाकिलें. कामाई प्रसन्न झाली व ज्यांनीं ज्यांनीं ह्या कामीं मेहनत केली त्या सर्वांना सरफराज केलें. नंतर हरद पुरोनें पळसवलीकर, पहाडकर व वनेवाळकर ब्राह्मणां करवीं शुभमुहुर्तावर केशवदेवास राज्यीं अभिषेकिलें व त्याच्या गळां राज्यसिक्के घातले. त्या समई केशवदेवानें कामाईच्या अनुमतें देसायांना वाणें दिलीं त्याचा तपशील:—

| | | |
|---|---|---|
| ( १ ) | मरोळकर माधवजी देसला... ... | ...९०० नउशें फ.यांची वृत्ति |
| ( २ ) | चौगुल्यांस... ... ... ... | ...५०० पांचशें फ.यांची वृत्ति |
| ( ३ ) | म्हातरे ... ... ... ... | ...४०० फ.यांची वृत्ति |
| ( ४ ) | साहाणे ... ... ... ... | ...३०० फयांची वृत्ति |
| ( ५ ) | कामाजीराव मालाडखापण्याचा देसला | ...१००० एक हजार फ.यांची वृत्ति |
| ( ६ ) | चौगुल्यांस ... ... ... | ...६०० फयांची वृत्ति |
| ( ७ ) | म्हातरे ... ... ... ... | ...६०० फयांची वृत्ति |
| ( ८ ) | साहाणे ... ... ... ... | ...३०० फ.यांची वृत्ति |
| ( ९ ) | पोम राऊत एकसरकर ... ... | ...९०० फ.यांची वृत्ति |
| (१०) | सिंधा एरंगळकर ... ... ... | ...५००फ.यांची वृत्ति व पाटिलकी ब. |
| (११) | ठाणेकराला ... ... ... ... | + + + + वृत्ति बक्षीस |
| (१२) | उतवेश्वरकर ... ... ... ... | ...टेम बक्षीस |

अश्या देणग्या केशवदेवानें दिल्या. केशवदेवानें मोठ्या ऐश्वर्यानें बारा वर्षें राज्य केलें. त्यानें राजपितामह, म्हणजे आसपासच्या सर्व लहान सहान संस्थानिकांचा आजा, ही पदवी धारण केली व त्या अर्थाचे वडेजावीचे गद्यपद्य पोवाडे रचिले. ते पोवाडे केशवदेवाचा भाट संस्थानिकांच्या राजधान्यांतून जाऊन गाऊं लागला. त्याचा राग संस्थानिकांना सहजच आला. तत्कालीन पोवाडे म्हणजे काय प्रकरण असे त्याचें स्पष्टीकरण केलें म्हणजे आसपासच्या संस्थानिकांना राग कां आला तें उलगडेल. सध्यां जे पोवाडे शालिग्राम वगैरे मंडळीनें छापिले आहेत ते सर्व पद्य आहेत, त्यांत गद्याची एक हि ओळ नाहीं. केशवदेवाच्या काळचे म्हणजे शक ११००।१२०० च्या सुमा-

ंचे पोवाडे, तसेच शहाजीशिवाजींच्या वेळचे पोवाडे व पेशवेशिंदेहोळकर यांच्या वेळचे हि सर्व पोवाडे पद्य असून शिवाय गद्य हि असत. पोवाडा म्हटला म्हणजे तो गद्यपद्य असा दुरंगी असावयाचा. ज्याला संस्कृतांत चंपूकाव्य म्हणतात त्या काव्यांच्या सदरांत पोवाडा पडतो, एवढें सांगितलें म्हणजे पोवाडा हें काव्य गद्यपद्य असतें, केवळ गद्य किंवा केवळ पद्य नसतें, हें सांगण्याची जरूर नाहीं. शालिग्रामानें जे पोवाडे गोळा केले ते, पोवाड्यांचें खरें सबंद रूप काय असतें त्याचा नीट बोध त्याला न झाल्या मुळें, एथून तेथून सर्व अर्धवट गोळा केले. भराडी व गोंधळी डफा वर जेवढें गाणें म्हणतात तेवढा गाण्याचा जो पद्यमय भाग तो च फक्त पोवाडा, अशी समजूत शालिग्रामाची झाली. पद्यभागाला जोडून प्रत्येक कडव्याच्या प्रारंभाला, मध्यें व शेवटीं भराडी व गोंधळी जो गद्य भाग म्हणत असतात तो भाग पोवाडा नव्हे, अशी समजूत शालिग्रामाची झाली. त्या मुळें शालिग्रामानें छापिलेला प्रत्येक पोवाडा अपूर्ण राहिला. प्रत्येक पोवाड्याच्या प्रत्येक कडव्याच्या आदीं, मध्यें व अंतीं शाहीर जो गद्य भाग स्पष्टीकरणार्थ म्हणतो तो संप्रदायशुद्ध पद्धतीनें म्हणणाऱ्या जाणत्या पटाईत शाहिराच्या तोंडून जसा चा तसा उतरून घेऊन गद्यसंवलित पद्य शालिग्रामानें छापिलें असतें म्हणजे त्यानें सबंद व संपूर्ण पोवाडा छापिला असें म्हणतां आलें असतें. पोवाडा हें केवळ श्राव्य काव्य नव्हे. हें दृश्य काव्य हि आहे. पोवाडा हें एकप्रकारचें नाटक आहे. त्यांत अनेक पात्रें असतात. मुख्य शाहीर व त्याचा साथीदार हे दोघे पोवाड्यांतील व्यक्तींच्या सोंगांची बतावणी करतात. कडव्यांत वर्णिलेल्या प्रसंगांतील मुख्य पात्राची बतावणी मुख्य शाहीर करतो व गौण किंवा प्रतिस्पर्धी पात्राची बतावणी साथीदार करतो. मुख्य पात्राची बतावणी मुख्य शाहीर किंवा गोंधळी तर करतो च. परंतु त्या हून हि आणीक एक काम शाहीर करीत असतो. नाटकांत ज्याला सूत्रधार म्हणतात व ज्याचें काम नाटकांतील संविधानाचें सूत्र अथ पासून इति पर्यंत सबंध ठेवावयाचें व उकलावयाचें असतें त्या सूत्रधाराचें तिऱ्हाईतपणाचें हि काम शाहीर करीत असतो. बतावणीचें व कथानकाचा धागा शाबूत ठेवून कथेचें तात्पर्य तिऱ्हाईतपणें सांगण्याचें काम शाहीर ऊर्फ सूत्रधार कांहीं गद्यांत करतो व वीरश्रीचा अतिरेक झाला असतां एकदम पद्याच्या वातावरणांत उड्डाण मारतो. वीरश्रीचा संचार होऊन जे वृत्तमय बोल शाहीराच्या मुखांतून प्रतिभेच्या विकसनानें अनिवारपणें प्रस्रवूं लागतात ते बोल पोवाडानामक चंपूकाव्यांतील पद्य होत. वीरश्रीच्या आगीनें धगधगणारें व रसरसणारें तें पद्य सहजच तुटक असून, कथानकाचा बराच मोठा भाग अध्याहृत ठेवितें. तो अध्याहार शाहीर योग्य अभिनयानें गद्य भाषेनें पुरा करून दाखवितो. कोणी समजेल कीं हें गद्य भाषण कुचकामाचें असेल. तर तसा भाग नाहीं. शब्दांची ठेवण, म्हणण्याचा ठसका, विकारांचा हुंदका, वगैरे काव्याचे जे जे कांहीं ढंग पद्याच्या ऊर्मीत आविष्कृत करण्यास सवड सांपडत नाहीं ते ते सर्व नखरे शाहीराच्या जिव्हे वर नाचणारी सरस्वती वैशिष्ट्यें करून गद्य भागांत च दाखविण्याची हौस बाळगिते. त्या करितां, सबंद पोवाडा

ज्यांस ऐकावयाचा व पहावयाचा असेल, त्यानें ह्या गद्य भागाला काट देण्यांत मतलब नाहीं. असले हे गद्यपद्यमय पोवाडे माहिकावतीच्या केशवदेवाचे महिकावतीच्या आसपासच्या प्रांतांतील संस्थानिकांच्या ऐकण्यांत व पहाण्यांत येऊन, कित्येकांना राजपितामह या आढ्यतेच्या शब्दांची चीड आली. त्यांतील धारचंपावतीच्या भोजराजाला तर अतिशय क्रोध आला. हें कालचें पोर स्वतःला सर्व राजांचा पितामह म्हणवितें, असे उद्गार काढून, भोजानें आपल्या दळवइयाला पाचारण केलें व ठाणेंकोंकणा वर हल्ला करण्याचा हुकूम केला. भोजाचें सैन्य कळव्यास येऊन ठेपलें. "परदळ देखतां केशवदेवानें देसायांना हंकारा केला. देसाय देसाय देश मिळाला. सिंध्याचा जमाव थोर झाला. नगाऱ्या घाव घातला. कर्णे, बांके, शिंगें, डफ, काहाळा, विराणीं वाजलीं. पाइकापाईक झालीं. कळव्या युद्ध थोर जालें. देवनरचे विनायक म्हातऱ्यानें राया भोजाच्या छत्रीची खीळ एक्या बाणें विंधोन पाडिली. दुसऱ्या बाणें भोजाच्या शिरींचा गंगाळटोप पाडिला. ऐसें युद्ध थोर जालें. राजा भोज अपेशी जाला. नंतर भोजाचा सार्थादार जो भैंसेदुर्गाचा म्हणजे म्हसगडचा संस्थानिक तो युद्धा मिसळला. त्या वर एकसरकर पाईक उठला. त्याला सिंध्यानें मागें ओढिलें आणि म्हटलें कीं, मज असतां त्वां म्हाताऱ्यानें युद्धास प्रवर्तावें हा न्याय नव्हे. असें म्हणून शिंद्यांनीं युद्ध सुरू केलें. महामारी पेटले. दळ भोजाचें भंगिलें. भैंसेदुर्गाचा राव जिवंत धरिला. मग केशवदेवासि भेटले. बंद हवाले केला. या रीतीं केशवदेव येशवंत जाला". भोजराजाचा हा पराभव शक ११४६ त झाला. ह्या वेळीं कल्याण येथील चालुक्यांचें साम्राज्य समाप्त होऊन व देवगिरीच्या यादवांचें साम्राज्य सुरू होऊन सुमारें तीस पसतीस वर्षे लोटलीं होतीं. चक्रवर्ती सिंघण यादवाची कारकीर्द चालू होती. आणि बिंब वंशांतील राजांचा अंमल ठाणेंकोंकणांतील साष्टी बेटा वर चालू होऊन ८६ वर्षे गेलीं होतीं. राजाधिराज जे सम्राट् ते यद्यपि बदलले तत्रापि लहानलहान संस्थानिक आपापलीं राज्यें निर्वेधपणें चालवीत असत, आणि संस्थानिका संस्थानिकांत आपसांत लढाया झाल्या तत्रापि वरिष्ठ सम्राटांचा त्यांना विशेष प्रतिबंध नसे. अगदीं च प्रतिबंध नसे, असा च केवळ प्रकार नसे. सम्राट्सत्तेला विरोध नसला, म्हणजे लहान संस्थानिक एकमेकांशीं भांडले, तंडले, मेले किंवा नष्ट झाले, तत्रापि तसे होऊं देण्याला सम्राटांचा प्रतिबंध नसे. आपापल्या वैरांचें निर्यातन करण्याची मांडलिक संस्थानिकांना मुभा असे किंवा हक्क असे. त्यांतला च प्रकार चेऊलचे भोज राजे व ठाण्याचे बिंब राजे यांच्या मधील तंट्यांचा होता. शक ११४६ तील युद्ध संपल्या वर चेऊलकर भोजाचा व केशवदेवाचा तह होऊन मित्रभाव उत्पन्न झाला. मित्रत्वाच्या नात्यानें भोजराजानें केशवदेवाला भेट म्हणून आंब्यांची फर्मास पाठविली. ती आंब्यांची डाली मध्यें रस्त्यांत भैंसेदुर्गाचा राजा जो जसवद्या ऊर्फ जसवंतदेव त्यानें जप्त केली. शक ११४६ तील युद्धांत हा जसवद्या केशवदेवाच्या हातीं जिवंत सांपडला होता. त्याला केशवदेवानें जीवदान देऊन त्या वेळीं सोडून दिलें. ह्या नंतर जसवद्या सिंघण यादवाला

भेरून देवगिरीकर यादवांचा मांडलिक बनला. केशवदेव अनहिलवाडकर चौलुक्यांचा म्हही पडला. सबब सम्राट् जो सिंघण यादव त्याचें व केशवदेव याचें सहज वैर उद्भवलें. सिंघण यादव आपल्या हाता खालील मांडलिकांचा तोरा चालवून घेणाऱ्या पैकीं नव्हता. सर्व उंचवटे खणून पाडून मैदान सपाट करणाऱ्यां पैकीं होता. अश्या पराक्रमी व वचकबाज सम्राटाची बगलबच्चेगिरी करणाऱ्या जश्वद्यानें केशवदेवाला पाठविलेले आंबे मध्यें च उर्मटपणें खाऊन टाकिले. केशवदेवाची हि या कालीं वाढती कमान होती. त्यानें चेऊलच्या भोजाला पराभूत करून, शिलाहारसत्ता तर अगदीं च संपुष्टांत आणून ठेविली होती. अश्या त्या केशवदेवाला आंब्यांची अफरातफर झालेली रित्या वेठ्यांच्या मुखजबानीनें कळली. केशवदेवानें जश्वद्या कडे भाट सांगून पाठविला कीं तुमच्या सारख्या भल्या लोकांनीं चोऱ्या कराव्या हें युक्त नव्हे, तो निरोप ऐकून जश्वद्यानें उलट निरोप पाठविला कीं, मगदूर असेल तर आमच्या गडाला येऊन, किल्ल्याकुलपें फोडून आपले आंबे परत घेऊन जावे. निरोप ऐकून केशवदेव कोपला. जश्वद्या वर स्वारी करण्या करितां देशाला हंकारा केला. नगाऱ्या घाव घातला. शेषवंशी, सूर्यवंशी व सोमवंशी, असे सर्व योद्धे मिळाले. भैसेदुर्गा वर चालले. वेढा घातला. बारा वर्षें वेढा पडला. परंतु किल्ला हातीं आला नाहीं ! चिंचांचें चिंचवणी खाऊन त्याच्या चिंचोऱ्या ज्या पडल्या त्या रुजून त्यांचे वृक्ष होऊन त्यांच्या चिंचा केशवदेवाच्या सैनिकांनीं खादल्या. पण गड हातीं येता दिसे ना. तेव्हां भेद केला. अंधेरीचा कोणी म्हातारा होता. त्याची वृत्त तेथील देसायानें काढिली होती. तो पळून जाऊन जश्वद्याच्या आश्रयानें भैसेदुर्गा वर पाइकी करून पोट भरी. त्याला स्वदेशाची फार खंत उत्पन्न होऊन, किल्याचे दरवाजे चोरून खोलण्याची कामगिरी आपण करूं अशी इच्छा त्यानें केशवदेवाला कळविली, आणि त्या प्रमाणें तें नीच कृत्य त्या अधमानें बजाविलें. किल्ला केशवदेवाच्या हातीं पडला. जश्वद्या पुनः जिवंत सांपडला. भैसेदुर्ग आपल्या राज्यास जोडून, केशवदेवानें नवसारीचा राजा गोदराव म्हणून एक मदोन्मत्त नाईक होता त्याला नरम केलें. नंतर आपल्या सर्व सरदारांना यथायोग्य वाणें देऊन. केशवदेवानें ठाण्याचें राज्य पुढें पांच वर्षें केलें. उपरान्त एकाएकीं मरण पावला. त्याला दुर्दैवानें पुत्रसंतान नव्हतें. राज्य करावयास कोणी राजवंश्य नाहीं, सबब सर्व देसाई मिळोन, जनार्दन प्रधान यास गादी वर बसविलें. केशवदेवानें दिलेल्या सर्व वृत्त्या आपण अव्याहत चालवूं असें आश्वासन जनार्दन प्रधानानें दिलें. तें मान्य करून देसाई आपल्या घरोघर गेले. हा प्रकार शक ११५९ त घडला. जनार्दन प्रधान ठाण्याचें राज्य चार वर्षें जों चालवितो तों शक ११६३ त घणदिवीचा वैश्य राजा नागरशा ठाणेकोंकणा वर चाल करून आला. माध्यंदिनशाखी देवदत्त पुरोहित, रखमाजी कायस्थ कुळकरणिक, गंगाजी नाईक सरजमातदार, यशवंतराव सरसबनीस, हे चार अधिकारी बरोबर घेऊन तो दळभारा सह ठाण्यास प्रगट झाला. जनार्दनासि युद्ध झालें. जिंकला. मग त्या जनार्दनास च आपला प्रधान करून बिंबांचें सर्व

राज्य नागरशानें काबीज केलें. नागरशा माहिमास राजमहालीं राहिला. तेथें देसाइ, चौगुले, चौधरी, म्हातरे, साहाणे, पाटील, हवालदार, महालदार, हाट बकाल, ब्राह्मण वगैरें सर्व मुख्य मुख्य जमवून. त्यांचे कागदपट नागरशानें तपासले, देसायांना देशाच आदाय विचारिला. चौदा परगणे, चौदा महाल, दोन खापणे असा चौफेर हिसाब रायासि रुजू झाला. उपज एकंदर १४ लक्ष सजगाण्या भरला. ज्यांच्या खतपत्रांवर

बकदालभ्यं यदा गोत्रं प्रभावती कुलदेवता
ठाणे स्थाने कृतं राज्यं मम मुद्रा विराजते

हा केशवदेवाचा शिक्का होता त्यांच्या वृत्त्या त्यांज कडे पूर्ववत् चालवून नागरशानें आपली कारकीर्द शक ११६३ त सुरू केली. देशाच्या संरक्षणार्थ नागरशानें ठिकठिकाणीं सैन्य ठेविलें त्याचा तपशील:—

| | | |
|---|---|---|
| चेऊल... ... ... | घोडे २००० | हत्ती १ |
| सजणगांव... ... ... | घोडे ९०० | हत्ती ६ |
| सैलान... ... ... | घोडे २०० | हत्ती ५ |
| चिखलीनवसारी ... ... | घोडे ५०० | हत्ती + + + |
| परतापूर ... ... | घोड २०० | हत्ती १ |
| मूळगांव ... ... | घोडे १०० | हत्ती + + + |
| ठाणे... ... ... ... | घोडे १००० | हत्ती ५ |
| | ४९०० | ३० |

देशाचा असा कडेकोट बंदोबस्त करीत असतां नागरशास त्रिपुरकुमरनामक पुत्र झाला. तो वयांत आल्या वर, बापाच्या बरोबरीनें राज्यकारभार पाहूं लागला. नागरशानें जेव्हां कोंकणा वर प्रथम स्वारी केली तेव्हां त्याच्या दिमतीला त्याचे तीन मेहुणे होते. त्रिपुरकुमर वयांत आलेला पाहून, आपण आपली कांहीं तरी स्वतंत्र व्यवस्था पाहिली पाहिजे असें ह्या तिघा मेव्हण्यांना वाटूं लागलें. करतां, नागरशाशीं त्यांनीं असें बोलणें लावलें कीं राजानें आपणास ठाणे, मालाड व मरोळ हीं तीन गांवें बक्षीस द्यावीं. मागणी नागरशानें नाकारिली, मेव्हणे नाखुष झाले व देवगिरीच्या रामदेवराव जाधवाच्या आश्रयास गेले. रामदेवराव जाधव नुकता च शक ११९३ त सम्राट्पदा वर आरूढ झाला होता, नागरशाला ठाण्याचें राज्य करूं लागून तीस वर्षे झालीं होतीं, व त्रिपुरकुमराचें वय ह्या वेळीं ऐन तिशीच्या भरांत आलें होतें. नागरशाच्या मेव्हण्यांनीं रामदेवराव जाधवाला सांगितलें कीं नागरशानें आमच्या बळा वर ठाणेकोंकणचें राज्य मिळविलें आणि आम्हांस स्वास्थ्या करितां बोट भर देखील जमीन देत नाहीं, सबब

त्याचा सूड उगविण्याच्या हेतूनें आम्हीं तुज कडे आलों आहों, नागरशाचें राज्य तूं खालसा कर. हा बूट रामदेवरावास मान्य झाला व तो आपल्या दळा समवेत खुद्द ठाण्या वर येऊन ठेपला. चेंदणीकर पाटलानें रामदेवरावाला ठाण्या हून खाडी पलीकडे कळव्यास पिटाळून लाविलें. तों इतक्यांत नागरशाचा पुत्र त्रिपुरकुमर येऊन युद्धांत सामील झाला. कळव्यास मोठें घनघोर युद्ध झालें. तेथून रामदेवरावाचें सैन्य माहुली किल्ल्याच्या आश्रयास गेलें. तेथें हि त्रिपुरकुमर पावला. माहुलीस युद्ध होऊन रामदेवरावाचा प्रधान हेमाडपंडित त्याचा पराभव झाला. नागरशाचे मेव्हणे—नानोजी, विकोजी व बाळकोजी—हे हि हरले. अश्या प्रकारें या युद्धांत रामदेवरावाचा पूर्ण पराजय झाला. ही हकीकत शक ११९३ नंतर थोड्या च काळांत घडली. या युद्धांत माहीमकर म्हातरा दादपुरी थोर झुंझला, म्हणोन रानवटकर पद राणे पावला. रानवट म्हणजे रणवाट ऊर्फ युद्धभूमि व राणे म्हणजे राजन्यक ऊर्फ राणक. पाटेकरांना नवअर्बुदे ही पदवी मिळाली. दुसरे बहू झुंझले त्यांस अनेक पदांचीं नांवें बहाल केलीं. साष्टीचा देसला आपले दळें बहुत झुंजला, त्यास सरचौक अधिकारी पद जालें. गोहारीकर पाइकाला विराण दिलें. नाऊरकराला नेजाकाहाळा बक्षीस दिली. कांधवळकराला घोडा दिला. साहारकराला पाटवृंदें दिलीं. अश्या नाना देणग्या व पदव्या नागरश्यानें दिल्या.

१७ ठाणेंकोंकणच्या नागरशाचें प्रस्थ ह्या विजयानें अतोनात माजलें. रामदेवराव जाधव म्हणजे सर्व दक्षिणापथाचा सम्राट्. त्याचा पराभव करणें कांहीं लहानसहान गोष्ट नव्हती. नागरशाला जास्त पुंडाई करतां येऊं नये ह्या करितां रामदेवरावानें ह्या पुढें दुसरी एक योजना तयार केली. ती अमलांत आणण्यास त्याला इतर महत्वाच्या भानगडी मुळें पंधरा वीस वर्षें लागलीं. तों पर्यंत नागरशा व त्रिपुरकुमर ठाणेंकोंकणचें राज्य निर्वेधपणें करीत होते. शिलाहारांचें आतां कोणी उत्तरकोंकणांत राहिलें नव्हतें. यादव सम्राटांचे सामान्य अधिकारी उत्तरकोंकणचा कारभार करीत. परंतु त्रिपुरकुमर वगैरे तत्रस्थ संस्थानिक आपापल्या संस्थानांतून बहुतेक स्वतंत्रपणें राज्य चालवीत. सम्राट्सत्ता रामचंद्र यादवाच्या कारकीर्दींत बहुत हलक होऊन गेली होती. त्यांच्या अधिकाऱ्यांची सत्ता केवळ नाममात्र असे. संस्थानिक त्यांना विशेष जुमानीत नसत करतां, खास राजपुत्राची स्थापना ठाणेंकोंकणांत करण्याची योजना रामदेवराव जाधवानें नक्की केली. रामदेवरावाचे शंकरदेव, केशवदेव, बिंबदेव, प्रतापशा वगैरे अनेक पुत्र होते. पैकीं शंकरदेवाला त्यानें आपल्या जवळ खास ठेवून घेतलें. केशवदेवाची स्थापना देवगिरीस केली. बिंबराजास उदयगिरि ऊर्फ उदगीर हा प्रांत दिला. प्रतापशास अलंदापुरपाटणीं स्थापिलें. आणि आपण स्वतः कधीं देवगिरीस व कधीं पैठणास राहूं लागला. रामदेव हा लढवय्या पुरुष नव्हता. सातारच्या शाहूराजा सारखा सुखोपभोगी, सैल व मृदु माणूस होता. हरिदासांच्या कथा, शास्त्र्यांच्या संभावना, मानभावांचे संवाद, हेमाद्रीचीं व्रतेंउद्यापनें, इत्यादि पारमार्थिक बाबींत त्याचा सर्व वेळ खर्चिला जाऊन, सैन्य

व राज्य ह्यांच्या तयारी कडे त्याचें बिलकुल लक्ष्य नव्हतें. राजपुरुषाला सर्वथा अयोग्य अशा ह्या वर्तनाचे दुष्परिणाम बरेच होऊन चुकले होते; परंतु ते उत्कटत्वानें दृश्यमान होण्यास शक १२१६ तील अल्लाउद्दीनाची स्वारी विशेष कारण झाली. अल्लाउद्दीनाची धाड येण्या पूर्वी कर्नाटक, कोंकण, इत्यादि बहुतेक सर्व प्रांतांतून मांडलिक राजे बेलगाम होऊन सम्राट्सत्ता नांवाला मात्र राहिली होती. रामदेवराव जाधव, शाहूराजा, बाजीराव रघुनाथ, इत्यादि दुर्बल राजपुरुषांच्या मनाची रचना च अशी विघटित असते कीं दुर्दैवानें आंगावर पडलेल्या सम्राट्सत्तेचा भार त्यांना सहन होत नाहीं, कारभाराचा व्याप आकलन करण्याचा मगदूर त्यांच्या ठाईं जन्मतःच गैरहजर असतो आणि राज्यलक्ष्मीचा संसार थाटानें व शिताफीनें चालविण्याच्या करामतीची उणीव त्यांच्यांत निसर्गसिद्ध व परिस्थितिसिद्ध असते. अशा दुर्बल राजाला शक १२१६ त अल्लाउद्दिनानें चार घटकेंत ( बखरींतील शब्द ) चूप केलें यांत मोठेंसें नवल नाहीं ! राज्ययंत्र पटकाविण्याची सामान्य तयारी केलेला कोणी हि इसम हें कृत्य ह्या हून हि थोड्या अवधींत करता. त्रिपुरकुमर ह्या ठाणेंकोंकणच्या सामान्य संस्थानिकानें रामदेवरावाला दटावण्याचा व पिटाळण्याचा हा क्षुद्र चमत्कार वीस वर्षां पूर्वीं शक ११९६ त कसा केला तें मागें सांगितलें च आहे. अल्लाउद्दीनानें शक १२१६ देवगिरी वर प्रथम स्वारी केली म्हणून म्लेच्छ तवारिखकार लिहितात. परंतु, त्या सालाच्या अगोदर चार वर्षें म्हणजे शके १२१० त अल्लाउद्दीनानें पैठणा वर स्वारी केली होती असें प्रस्तुत बखर म्हणते ( पृष्ठ ८९ ). ह्या शक १२१० च्या स्वारींत रामदेवराव व त्याचे पातेणे प्रभु सरदार यांचा पराभव झाला. ह्या पराभवा नंतर असें दिसतें कीं विशेष भानगडींत न पडतां, अल्लाउद्दीन परत कन्हामाणिकपुरास गेला. देवगिरीस केशवदेव किल्ला बळकावून म्हणजे बळकट करून राहिला. हा केशवदेव पुढें थोड्या च काळांत मरण पावला व त्याचा पुत्र धाकटा रामदेवराव देवगिरी वर अंमल करूं लागला. प्रतापशा राजगुरू हेमाडपंता सह अव्हंदापुरपाटण येथें जसा चा तसा च होता. बिंबदेव उदगीरीस होता. त्यानें गुजराथेच्या बाजूनें स्वारी करून सालेरमोलेर, नंदनबारे म्हणजे सध्यांचे नंदूरबार, दाहिटें, केशवपुर, वडानगर पावेतों चाल करून शक १२१६ त ठाणेंकोंकणांत प्रवेश केला. शक १२१६ त अल्लाउद्दीनानें देवगिरी वर चाल केली त्या च सुमारास बिंबदेव यादवानें गुजराथे वर स्वारी करून कोंकणांत प्रवेश केला. गुजराथे वर स्वारी करण्याचें कारण उघड आहे. देवगिरी वर चालून आलेल्या अल्लाउद्दीनाला गुजराथेंतून जाऊन माळव्याच्या बाजूनें पायबंद देण्याचा बिंबदेवाचा उघडउघड हेतू दिसतो. बिंबदेवाचा हा डाव ओळखून व रामदेवरावाशीं झटपट तह करण्याचा फार्स लगबग उरकून अल्लाउद्दीन परत कन्हामाणीकपुरास गेला. त्या मुळें बिंबदेवानें देऊं घातलेला पायबंदाचा शह त्याच्या मागचा चुकला. हा डाव फसल्या वर व अल्लाउद्दीनाची धाड परत गेल्या वर, बिंबदेवानें गुजराथेंतून माळव्या कडे जाण्याचा रोख बदलून गुजराथेच्या दक्षिणे कडील नागरशा व त्रिपुरकुमर वगैरे लहान सहान नाइकांच्या म्हणजे राजकांच्या ठाणें-

कोंकण प्रदेशा कडे आपला मोर्चा शक १२१६ त वळविला. ह्या वेळीं नागरशाचा पुत्र जो त्रिपुरकुमर त्याच्या हातीं ठाणेंकोंकणची सर्व सत्ता गेली होती. ठाणेंकोंकणच्या भोंवतालील इतर लहानसहान संस्थानिकां हून त्याचें सामर्थ्य यद्यपि मोठें होतें, तत्रापि बिंबदेव जाधवा सारख्या सम्राट्पुत्राच्या बड्या सैन्याशीं बरोबरीच्या नात्यानें वर्षोनवर्ष टक्कर देत बसण्याची त्याची ऐपत नव्हती. बिंबदेव ठाणेंकोंकणांत शिरून परतापुर येथें सैन्या सह मुक्काम करून राहिला आणि माहीम बेटांत आपल्या सूर्यवंशी सोमवंशी व शेषवंशी सरदारांची वसाहत करून कायमचा बसला. याचा अर्थ असा झाला कीं माहीम प्रांत त्रिपुरकुमराच्या हातचा जाऊन, चेऊल, उरण, पनवेल, पेण वगैरे दक्षिणे कडील प्रांतांचा त्याला आश्रय करावा लागला. शक १२१६ पासून शक १२२५ पर्यंतच्या नऊ दहा वर्षांत घेतलेल्या प्रांतांची स्थिरस्थावरता करून, बिंबदेवानें बरोबर आणिलेल्या सरदारांची स्थापना माहीम बेटांत कायमची केली. सरदारांची यादी बखरकार जी देतो ती अशी:—

| | राजा | राणी | गोत्र | उपनाम |
|---|---|---|---|---|
| १ | काशिश्वर | सावित्री | काश्यप | बनकेकर |
| २ | मधुसूदन | लक्ष्मी | गर्ग | मानकर |
| ३ | विद्रुमसेन | गोदावरी | वशिष्ट | वाराढकर |
| ४ | विक्रमाकृति | रखुमावती | भारद्वाज | राणे |
| ५ | सैन्याजित् | सुलजा | गौतम | ग्रामसमंध |
| ६ | सहस्रसेन | भागिरथी | पौलास्ति | धृतपृत |
| ७ | पौंडरीक | भानुतनया | जमदग्नि | मोळकर |
| ८ | अनंतकीर्ति | संध्यावळी | च्यवनभार्गव | भांडारिक |
| ९ | वासुदेव | गौतमी | अगस्ति | वरोळीकर ( धाकटी ) |
| १० | सुमंत | सुलक्षणा | कर्दम | वैद्य |
| ११ | मांधाता | विख्याति | कौशिक | वरोळीकर ( मोठी ) |
| १२ | देवदत्त | कामाक्षा | हरित | वानेटकर |

हे बारा सरदार नामांकित घराण्यां पैकीं होते. ह्यां खेरीज इतर पुरी जे देशोदेशीचे आले त्यांचीं नांवें एणे प्रमाणें:—

## सूर्यवंशी

| | नांव | देश | गोत्र |
|---|---|---|---|
| १३ | सुरदास पुरी | दुर्गदेश | वृद्धविष्णु |

| | | |
|---|---|---|
| १४ भारद्वाज | सिंध्रदेश | पौतमाक्ष |
| १५ भीमराज | भिमाडीपूर | पौतमाक्ष |
| १६ शिवराज | सिळापुर | मांडव्य |
| १७ भीमराज | मायापूर | कौंडण्य |
| १८ शिवदास प्रभु | सौराष्ट्रदेश | मांडव्य |
| १९ गोरखिराज | गोदापुर | विश्वामित्र |
| २० श्रीपतराम ( व ) | साहाजापुर | हारीत |
| २१ देवप्रभु | पैठण | कौंडण्य |
| २२ शामराज | श्यामक्षेत्र | पौतमाक्ष |
| २३ शिवराज | साहाज्यापुर | शौनल्य |
| २४ त्रिंबकराज | मायापुर | मांडव्य |
| २५ त्रिंबकप्रभु | त्रिवेणीनगर | वृद्धविष्णु |
| २६ केशवराज | त्रिवेणीनगर | वृद्धविष्णु |
| २७ गणेशराज | गोदावरीपुर | ब्रह्मजनार्दन |
| २८ सिवरामदामोदरप्रभु | द्वारका | विश्वामित्र |
| २९ केशवराव | पैठण | वशिष्ठ |
| ३० दामोदरप्रभु | त्रिवेणीनगर | वृद्धविष्णु |
| ३१ गणेशप्रभु. | नेवाळें | ब्रह्मजनार्दन |
| ३२ विष्णुप्रभु | पूर्वदेश | भारद्वाज |
| ३३ नारायणप्रभु | पैठण | वशिष्ठ |
| ३४ केशवराज | पैठण | वशिष्ठ |
| ३५ त्रिंबकराव | पैठण | ब्रह्मजनार्दन |
| ३६ श्रीपतराव | पैठण | पौतमाक्ष |
| ३७ परशराम | पैठण | हारीत |
| ३८ गोपाळप्रभु | गोपुर | वशिष्ठ |
| ३९ कृष्णनाथप्रभु | पैठण | वशिष्ठ |
| ४० चंद्रप्रभु | चिंचगांव | काश्यप |
| ४१ दामोदरप्रभु | दाबाजीपुरी | अंगिरस्य |
| ४२ श्रीपद्मराव | श्रीपुर | वशिष्ठ |

हे राजे सवितासूर्यवंशी शके १२१५ त म्हणजे बिंबदेव जाधवाच्या पूर्वी एक वर्ष कोंकणांत आले. ह्या ४२ सरदारांना एक वर्ष अगोदर ठाणेंकोंकणा वर स्वारी करण्यास पाठवून, नंतर शक १२१६ त बिंबराजा स्वतः ठाणेंकोंकण काबीज करण्यास उद्युक्त झाला. या उपर म्हणजे शक १२१६ नंतर कांहीं सोमवंशी सरदार आले त्यांची यादीः—

## सोमवंशी

| | नांव | देश | गोत्र |
|---|---|---|---|
| ४३ | शिवदासराव | पैठण | वशिष्ठ |
| ४४ | × × × × × × | गोदापुर | गौतम |
| ४५ | नारायण बिंबल प्रभु | × × × | नानाभ्य |
| ४६ | भूरदासपुत्र सुरदास प्रभु | भीमापुर | नारायण |
| ४७ | त्रिंबकप्रभु | त्रिपुर | कुश |
| ४८ | भीमराजप्रभु | × × × × | क्षवण |
| ४९ | कृष्णराज | × × × × | पारश्वत |
| ५० | भीमराज | निळापुर | गौतम |
| ५१ | भोजगुण दाता | भीमापुर | पारश्वत |
| ५२ | त्रिपाळराजा | × × × × | हारीत |
| ५३ | भूरदासप्रभु | चिंचगांव | पारश्वत |
| ५४ | रायेणप्रभु | × × × × | वशिष्ठ |

" या खेरीज दालिबंद म्हणजे सशस्त्र प्रभु सवितासोमवंशी बहुत कोंकणीं आले " त्यांचीं नामाभिधानें सांगतां ग्रंथ वाढेल म्हणोन मुख्य जे कांहीं ते सांगितले. वरील यादींत जीं चौपन्न नांवें सरदारांचीं आलीं आहेत तीं सर्व ज्यांना पातेणे उर्फ पाताणे ऊर्फ पाठारे प्रभु म्हणतात त्यांचीं आहेत. हे सर्व बिंबदेव जाधवाच्या अनुषंगानें शक १२१५ व १२१६ नंतर ठाणेंकोंकणांत आले. शक १०६० त प्रताप बिंबाच्या बरोबर जीं ६६ खुमें व कुळें सूर्यसोमवंशी सरदारांचीं व इतरांचीं आलीं तीं शक १२१५ त आलेल्या पातेण्या प्रभूंच्या कुळांहून अगदीं निराळीं हें सांगावयास नको च. तसेंच, प्रताप बिंब, मही बिंब, केशव बिंब, ह्या नांवांत जो बिंब शब्द आला आहे तो व बिंबदेव जाधव ह्या नांवांत जो बिंब शब्द आला आहे तो परस्परा हून अगदीं भिन्न अर्थाचे वाचक आहेत हें हि सांगावयाला नको च. शक १०६० त आलेल्या प्रताप बिंबाच्या नांवांतील बिंब शब्द आडनांव-वाचक आहे व शक १२१६ त आलेल्या बिंबदेव जाधवाच्या नांवांतिल बिंब शब्द व्यक्तिनामवाचक आहे, हें आतापर्यंतच्या कथानका वरून वाचकांनीं ताडलें च असेल. व्यक्तिवाचक बिंबशब्द व आडनांववाचक बिंबशब्द या मधील अर्थाची भिन्नता लक्ष्यांत न आल्या मुळें, कित्येक ग्रंथकारांच्या व लेखकांच्या लेखांत घोटाळ्याचीं अनेक विधानें आलेलीं दृष्टीस पडतात. त्यांचा परामर्श घेऊन कालक्षेप करण्यांत किंचिन्मात्र हि फायदा नसल्यानें, त्यांच्या कडे दुर्लक्ष्य करणें उचित दिसतें—

१८ बिंबदेव जाधवानें ठाणेंकोंकणपैकीं जो प्रांत ताब्यांत आला त्याचे १५ महाल केले व तेथें देशसंरक्षणार्थ खालील प्रमाणें सैन्य ठेविलें.

| महाल | गांवें | गज | अश्व |
|---|---|---|---|
| १ मालाड | ५७ | २ | १२०२ |
| २ मरोळ | ६६ | २ | १५०० |
| ३ टाणें | १७ | | |
| ४ पांचनदी | ६७ | ४ | २७०० |
| ५ तळोजें | १४ | | |
| ६ पुणें | २८ | | |
| ७ सायवन | २९ | २ | २७०० |
| ८ मणोर | ३९ | ३ | १००० |
| ९ अशेरी | २४ | २ | १००० |
| १० केळवेमाहिम | २४ | १ | ९०० |
| ११ तारापूर | १८ | १ | ५०० |
| १२ कल्याण | १४ | ५ | २००० |
| १३ चेंभुरकें | ८ | ० | ५०० |
| १४ सांजें | १४ | १ | ५०० |
| १५ माहीम बिंबस्थान | ९ | | |

(३ टाणें ते ६ पुणें — कंसाने एकत्र दाखविलेले)

"एवं ग्रामसंख्या ४४४" म्हणून बखरींत म्हटलें आहे. परंतु वर दिलेल्या गांवांची संख्या ४३४ भरते तेव्हां गावांच्या ह्या आंकड्यांत दशं चा एकाचा आंकडा नकलकारानें कोठें तरी खाल्ला हें उघड आहे. पृष्ठ ४२ वर नागरशाच्या सैन्याची संख्या दिली आहे, तिच्याशीं बिंबदेव जाधवाच्या सैन्याच्या संख्येशीं तुलना केली असतां, असें दिसतें कीं नागरशाच्या सैन्याच्या तिप्पट चौपट सैन्य बिंबदेव जाधवा पाशीं होतें. ह्या चौपट सैन्याच्या जोरा वर बिंबदेव जाधवानें नागरशा व त्रिपुरकुमर ह्यांच्या सैन्याला नामोहरम केलें, त्रिपुरकुमराला चेऊल प्रांताच्या दक्षिणेस हाकून दिलें व मुंबई, माहीम, साष्टी, सुपारें, इत्यादि उत्तर कडील सर्व प्रांत काबीज करून तेथें आपले हस्तक व सरदार जे पातेणे प्रभू त्यांची स्थापना केली. सरदार व सैन्य यांची व्यवस्था लावल्या वर बिंबदेव जाधवानें आक्रमण केलेल्या प्रांताची उपज म्हणजे उत्पन्न ऊर्फ महसूल ठरवून टाकिला. उपजाच्या दृष्टीनें प्रांतांतील गांवांचे दोन वर्ग होत. सरदारांना सैन्याच्या खर्चा करितां दिलेले मोकासे गांवाचा पहिला वर्ग आणि सरकारांत ठेविलेल्या गांवांचा दुसरा वर्ग. मोकासे गांवाचें उत्पन्न मोकासदारानें आपल्या हाता खालील सैन्याच्या खर्चा पुरतें घेऊन, राहिलेली बाकी राजाला म्हणजे सरकाराला मसाला द्यावी लागे. मोकासगांवांना खोतीगांव असें दुसरें नांव आहे. दोन्हीं नांवें मुसुलमानी आहेत. मुसुलमानी अमला पूर्वी मोकासगांवांना किंवा खोतीगांवांना अधिकारीभोगग्राम ही संज्ञा असे. भोगग्राम दोन प्रकारचे. वृक्ष, काष्ट, तृण, उदक, निधिनिक्षेप, गिरि, नदनदी, ह्यांच्या

मुद्दां व चाट, भट; कर, शुल्क, इत्यादि सर्व उपद्रवां पासून मुक्त असें जें दान त्याला धारादत्त भोगग्राम म्हणत. ह्या धारादत्त ग्रामदानाला मुसुल्मानी अमलांत इनामगांव ही संज्ञा मिळाली. सैन्याच्या किंवा इतर पेशाच्या पोषणार्थ जमिनीचें व करांचें उत्पन्न भोजकानें घेऊन, बाकीचें शिल्लक उत्पन्न सरकारांत ज्या गांवांचें भरावें लागे त्यांना अधिकारीभोगग्राम म्हणत. धारादत्त भोगग्रामांवर राजाचा कोणता हि हक्क नसे व ते आचंद्रार्क चालावयाचे असत. अधिकारी भोगग्रामां वर राजाची पूर्ण सत्ता असून, ते राजाच्या खुषी वर नियमितकालपर्यंत त्या त्या अधिकाऱ्या कडे चालत. दत्त ग्रामां व्यतिरिक्त जे ग्राम ते खुद्द सरकाराच्या अंमला खालीं असत. सरकारी गावांचें उत्पन्न दोन तऱ्हेचें असे, ( १ ) लागवडी खालील क्षेत्रांचें उत्पन्न व ( २ ) जलतरुतृणपाषाणादिकांचें उत्पन्न. हीं दोन्हीं उत्पन्नें मिळून गावांची वार्षिक संपत्ति होई. ह्या संपत्तीच्या दोन वाटण्या होत, ( १ ) एक ग्रामस्थांची वाटणी व ( २ ) दुसरी सरकारची वाटणी. ग्रामस्थांच्या वाटणीला वृत्ति म्हणत व सरकारच्या ऊर्फ राजाच्या वाटणीला राजभाग म्हणत. ग्रामस्थ म्हणजे गावांतील संपत्युत्पादक कृषीवल व कारू. कृषीवल जमीनीची लागवड करून धान्यसंपत्ति निर्माण करीत आणि कारू सुतारकी, लोहारकी इत्यादि धंदे करून शिल्पसंपत्ति कमावीत. कृषीवलांना कारूंची जरूर पडे व कारूंना कृषीवलांची जरूर पडे. सबब कारूंना कृषीवल धान्याचें बलुतें देत व कारू कृषीवलांना आपल्या शिल्पांची मदत करीत. कारुकृषीवलांच्या ह्या देवघेवीत राजाचा बिलकुल हात नसे. ही देवघेव अनादिसिद्ध समजत, कोण्या राजानें निर्माण केलेली समजत नसत. ही देवघेव ग्रामसंस्थास्थापने बरोबर स्वयंसिद्ध असल्या मुळें शेतकरी, सुतार, लोहार, न्हावी, परीट, भट, इत्यादि वृत्तिवंताच्या वृत्त्या, अनादिसिद्ध स्वयंभू समजल्या जात. अर्थात् राजाचीं राजपत्रें किंवा पातशाहांच्या सनदा वृत्तिवंतांच्या वृत्तिसंबंधानें निघण्याची शक्यता च नसे. सर्व वृत्तिवंत मिळून गांवची पंचाईत बने. ती गांवचा उत्पन्न, विनिमय, न्याय, युद्ध, इत्यादि—सर्व कारभार स्वयंभू अनादिसिद्ध पहात असे. पंचाइतीच्या निकाला वर तपासणी, मंजुरी, किंवा फिरवाफिरव एतत्संबंधीं अधिकार दुसऱ्या कोणत्या हि सत्तेचा नसे. कां कीं, ग्रामपंचाइति हून वरिष्ठ सत्ता मूळारंभीं म्हणजे ग्रामसंस्थास्थापनारंभीं मुदलांत च दुसरी कोणती हि नव्हती. कालान्तरानें उत्पन्नाच्या उत्पादना संबंधानें व वांटणी संबंधानें, न्यायाच्या न्याय्यान्याय्यत्वा संबंधानें आणि बलिष्ठ शत्रूंशीं झगडण्याच्या सामर्थ्यासामर्थ्या संबंधानें, ग्रामस्थांत भांडणें, तंटे वगैरे असंतोष उद्भवून किंवा बलिष्ठ असे परचक्र येऊन, ग्रामसंस्थाबाह्य अशा परकीय वरिष्ठ सत्तेचा स्पर्श व पगडा निर्माण झाला आणि त्या बलिष्ठ सत्तेला ऊर्फ बलिष्ठ राजाला गांवच्या कृषीवल व कारू यांनीं निर्मिलेल्या संपत्तींतून वांटा देणें आवश्यक झालें. राजदाय ऊर्फ सरकारदेणें म्हणून एक नवीन बाब उत्पन्न झाली. प्रस्तुत बखरींत ( पृष्ठ ९२।९३।९४।९५।९६ ) ह्या सरकारदेण्याचे चार भाग सांगितले आहेत; ( १ ) खुद्द राजभाग, ( २ ) धर्म, ( ३ ) सीळोत्तर व ( ४ ) नगद. पैकीं पहिले तीन भाग सरकारभाताच्या पोटांत समविष्ट होत.

उदाहरणार्थ, ९२ व्या पृष्ठा वरील दहावें गांव जें पोवै त्याच्या उपजेची रक्कम अशा मांडिली आहे:—पोवै सरकारभात मुडे ६८ राजभाग मुडे ५६ धर्म ४ सळोत्तर ८ नगद दाम ३००. ह्यांतील राजभाग ५६ + धर्म ४ + सळोत्तर ८ मिळून सरकारभात एकंदर मुडे ६८ होतें. ६८ मुडे भात पोवै गांवांतून सरकाराला मिळे. पैकीं ४ मुडे धर्म व ८ मुडे सळोत्तर वजा जातां राजांच्या वांट्याला ऐन भात मुडे ५६ रहात. नगद दाम ३०० हे कारू वरील सरकारदेण्याचें एकंदर द्रव्य होय. राजा हा दंडाधिकारी व राज्याचा प्रधान अंश, सबब तत्पोषणार्थी कडे राजभागांचा विनियोग होई. तडीतापसी, अतीथअभ्यागत, शास्त्रीपंडित, भटभिक्षुक, ग्रामदेवपूजक, इत्यादींच्या निर्वाहा कडे धर्म ह्या सदरा खालीं पडणाऱ्या दायाचा विनियोग होई. जननमरण इत्यादि संस्कारांची वासलात लावणारा जो ग्रामजोशी तो गांवचा वृत्तिवंत असे, म्हणजे ग्रामस्थां बरोबर ग्रामस्थापनेच्या वेळीं स्वयंभू अवतरलेला असे. त्याचा निर्वाह ग्रामस्थांच्या द्वारा होई, राजद्वारा होत नसे. तडीतापसी, शास्त्रीपंडित इत्यादि योगी, विद्वान् वगैरे उच्च संस्कृतीचे जे प्रतिनिधि त्यांचा चरितार्थ राजद्वारा सरकारी उत्पन्नांतून होई. ठाणेंकोंकणांतील समुद्रकांठचे जे गांव तेथील खाजणांतून पावसाचें व समुद्राचें खारेंगोडें पाणी आंत घेण्यास किंवा बाहेर काढून लावण्यास चर करावे लागतात, बांध घालून दरवाजे ठेवावे लागतात व ते दरवाजे दगडांनीं बंद करावे लागतात किंवा दगड काढून मोकळे करावे लागतात. ह्या कृत्याला शिलोत्तार ही प्राचीन संज्ञा असे. शिलोत्तार ह्या शब्दाचा मराठी अपभ्रंश शीळोत्तर. शीळोत्तराचें काम करणारा जो माणूस तो शिळोत्तरा पाटील. हा पाटील ग्रामनिर्मित नसे, राजनिर्मित असे व ह्याचा निर्वाह सरकारांतून होई. निर्वाहाच्या दायाला शीळोत्तर ही संज्ञा असे. शिळोत्र असा हि उच्चार प्रचारांत आहे. शिलोत्तार म्हणजे बांधाच्या दरवाज्यांतील शिळा बसविण्या बद्दल किंवा काढण्या बद्दल जें उत्तार म्हणजे उतरण्याचें शुल्क म्हणजे कर तो. नगद दाम ह्या शब्दांतील दाम म्हणजे सजगाणी व सजगाणी म्हणजे फद्या. दाम, सजगाणी व फद्या हीं नाण्यांचीं तीन नांवें ह्या बखरींत येतात. चाळीस दामांचा एक रुपाया. रुपायाचे त्या कालीं ८० पैसे धरीत. अर्थात् दाम दोन पैश्यांचा होई. सजगाणी व फद्या हीं दोन्हीं नाणीं त्या कालीं दोन पैश्यांचीं असत. हीं तिन्हीं नाणीं शुद्ध तांब्याचीं किंवा प्रायः मिश्र धातूंचीं असत. मुडा त्या कालीं त्या प्रांतांत २५ मणांचा असे. सध्यां कोळंबा भाताचा मुडा पेणपनवेलप्रांतीं २५ मणांचा धरतात. पोवै गांव त्या कालीं ९०० दाम राजाला कारू वरील कर म्हणून देई, रुपयांत बोलावयाचें म्हणजे २२½ साडे बावीस रुपये देई. पोवै गांव सरकारांत ६८ मुडे भात भरी. सरकार जमीनीच्या एकंदर उत्पन्नाचा षष्ठांश घेई. तेव्हां पोवै गांवाचे त्या कालीं भाताचें एकंदर उत्पन्न ४०८ मुडे म्हणजे सध्यांच्या वसिमणी ५९० खंडी असे. प्रस्तुत बखरींत एकंदर १२५ गांवांच्या उपजेची वगत दिली आहे. तींत सरकारभाताचे जे राजभाग, धर्म व शळोत्तर असे तीन वांटे दिले आहेत त्यांचे आंकडे बरेच ठिकाणीं चुकलेले आहेत. बिंबाख्यानाची एक लेखी प्रत मज जवळ आहे ती वरून खरे आंकडे

सत्ताविसाव्या रकान्यांत देण्याचा थोडाबहुत प्रयत्न केला आहे. परंतु, बखरीच्या आणीक कित्येक गांवांच्या वहिवाटदारांचीं नांवें बखरींत नमूद आहेत, बऱ्याच गांवांचीं नाहींत. हा हि तपशील बखरीच्या आणीक प्रती हातीं आल्या खेरीज पुरा करतां येणार नाहीं.

१९. एणे प्रकारें मुलख आबादान करोन बिंबदेव जाधवानें राज्याची बंदिस्ती केली व माहीम जागा उत्तम रम्य स्थळ देखोन तेथें राजधाम स्थापिलें. बिंबदेवास दोन स्त्रिया. प्रथम राणीचें नांव नागरसिद्धि. द्वितीय राणीचें नांव गिरिजा. दोन पुत्र. वडिल पुत्राचें नांव प्रतापशा. धाकट्या पुत्राचें नांव पुरशा. शक १२१७ त माहिमास बिंबदेवानें राजधानी स्थापिली. बखरींत ( पृष्ट ८९ ) राजधानी स्थापण्याचा शक १२२७ दिला आहे तो चुकला आहे, तेथें शक १२१७ पाहिजे. कारण, बिंबदेव शक १२१६ पासून ९ वर्षे १ मास व १४ दिवस राज्य करून शक १२२५ त शांत झाला. ह्या च बिंबदेवाचें नांव मुसुलमानी तवारिखांत भीमदेव म्हणून लिहिलें असल्याचा भास त्या तवारिखा वाचणाऱ्या आधुनिक इंग्रज लेखकांस झाला. कारण बिंब ह्या शब्दाचें फारसींत ज्या अक्षरांनीं अवतरण केलें जातें त्या अक्षरांचें वाचन बिंब, बींम्ब, बीम, भीम, असें चार सहा प्रकारांनीं होण्याचा संभव आहे. शक १२२५ त बिंबदेव वारल्या उपर, त्याचा ज्येष्ठ पुत्र प्रतापशा गादी वर आला. प्रतापशा गादी वर आला तेव्हां वृद्ध रामदेवराव जाधव दक्षिणापथाचा नामधारी सम्राट् होता. चेऊल ऊर्फ चंपावती येथें रामदेवरावाहून हि वृद्धतर असा नागरशा सत्तर ऐंशीच्या घरांत गेलेला असून त्याचा पुत्र त्रिपुरकुमर यानें पन्नाशीचा उंबरठा नुकता च वलांडला होता. नागरशाचा दुसरा पुत्र केशवदेव त्रिपुरकुमरा हून चार पांच वर्षांनीं लहान असून, त्याचा नागरशा नामें करून पुत्र वयांत आलेला असावा. वृद्ध नागरशानें आपली एक मुलगी स्नेहवृद्धि स्तव प्रतापशास दिली होती. तथापि ह्या शरीरसंबंधानें चंपावतीकराचा व माहीमकर प्रतापशाचा वैरभाव शांत न होतां, तो जास्त च दुणावत चालला होता. वर्धमान वैरभावाचें कारण असें होतें कीं प्रतापशाचा आजा जो रामदेवराव जाधव त्याचा नूर अल्लाउद्दीनानें इतका कांहीं उतरला होता कीं तो अल्लाउद्दीनाचा करभार देणारा क्षुद्र मांडलिक बनला होता. अर्थात् संकटसमयीं कोंकणच्या प्रतापशाला साहाय्य करण्याची ताकत त्याच्या ठाईं फार च अल्प होती. पारडें असें फिरल्या मुळें नागरशा व त्रिपुरकुमर यांनीं एक कुरापत काढिली. येडक-मेढालगड नांवाचा प्रतापशाचा एक डोंगरी किल्ला त्रिपुरकुमरानें व केशवदेवानें आपला मेव्हणा जो प्रतापशा त्या जवळ मागितला. प्रतापशानें ही मागणी फेटाळून लाविली. लढाईला हें कारण बस्स होऊन त्रिपुरकुमरानें प्रतापशाच्या प्रांता वर स्वारी करण्याची जंगी तयारी केली. प्रतापशाची ह्या वेळीं लढाईची जशी साधनासिद्धि असावी तशी नव्हती. सबब रामदेवराव जाधवा कडे त्यानें मदत मागितली. रामदेवराव जाधवानें जीवननाईक सांवखेडकर व हेमपंडित यांना प्रतापशाच्या मदतीस कोंकणांत पाठविलें. त्यांचा पुरा मोड त्रिपुरकुमरानें माहुलीच्या मैदानीं केला. ह्या वर प्रतापशा व रामदेवराव जाधव यांनीं पुनः सैन्याची

दिन चार जुनाट प्रती जेव्हां सांपडतील तेव्हां खरे आंकडे कोणते तें निश्चित सांगतां येईल. जमवाजमव चालविली. द्वादश प्रभू नावाणिक पाचारून त्यांना त्यांच्या समुदाया सह प्रतापशानें युद्धार्थ सजविले. परंतु सजवणूक मना जोगती न झाल्या मुळें, प्रतापशा सैन्या सह सायवनांतील जो गड गगनमहाल त्याच्या आश्रयास गेला. नागरशा पुढें प्रतापशानें कच खादिली. इतक्यांत रामदेवराव अणहिलपट्टणच्या जयसिंगास मदतीस घेऊन आला. जयसिंग ह्या नांवा संबंधीं एक बाब येथें लक्ष्यांत ठेविली पाहिजे. अण-हिलवाडचा प्रख्यात राजा जो सिद्धराज त्याचें एक बिरुद जयसिंह हें होतें. हें बिरुद प्रस्तुत बखरकार अणहिलवाडच्या प्रत्येक राजाला लावितो. सम्राट् रामदेवराव, अण-हिलपट्टणचा जयशिंग व प्रतापशा, ह्या तिघांचें सैन्य नागरशा व त्रिपुरकुमर यांच्या वर चढाई करून आलें. तें विसामागड मणोरमहालीं पैलदेंच्या तांदूळवाडीस येऊन ठेंपलें. तेथून त्या सैन्यानें प्रतापपुर काबीज केलें. शेवटीं आंधेरीच्या रानांत दोहीं कडील सैन्याची टक्कर झाली. मोठें तुंबळ युद्ध उद्भवलें व रामदेवराव जयसिंग व प्रता-पशा ह्यांचा पूर्ण पराजय होऊन नागरशा व त्रिपुरकुमर यांनीं थोर विजय संपादिला. हा प्रसंग शक १२३२ च्या आधीं केव्हां तरी घडला. पुढें थोड्या च वर्षांनीं म्हणजे शक १२३२ च्या सुमारास रामदेवराव जाधव मृत्यू पावला. त्या मुळें प्रतापशाचा एक मोठा आधार गेला. ह्या च सुमारास चेऊल ऊर्फ चंपावतीचा नागरशा व त्याचे पुत्र त्रिपुरकुमर व केशवदेव वारून, दुसरा नागरशा चेऊलच्या गादी वर आला. दुसऱ्या नागरशानें माहीमच्या प्रतापशास रेटींत रेटींत अगदीं रडकुंडीस आणून आस्त-आस्ते केवळ धुळीस मिळविलें. शेवटीं नागरशानें प्रतापशाच्या प्रजेंत भेद पाडिला. बिंबदेव जाधव व प्रतापशा जाधव यांनीं आपल्या बरोबर जे पातेणे प्रभु सरदार आणिले त्यांना राज्यांतील मोठमोठे सर्व अधिकार देऊन टाकिले. तशांत, जातिशुद्धतेकरितां देस-ल्यांचीं यज्ञोपवीतें प्रतापशानें छेदिलीं होतीं, त्या मुळें पूर्वीचे देसाई, देसले, पाटील, पाटल्हारे केवळ निर्माल्यवत् बनले. ह्या असंतुष्ट देसल्यांना व पाटल्हाऱ्यांना नागरशानें फितवून आपल्या कच्छपीं लाविलें. देसले व पाटील ह्यांच्या द्वारा देशाचा वसूल येत ना सा होऊन, प्रतापशा व त्याचे प्रभु सरदार अन्नाला मोताद झाले. अश्या विपन्न स्थितीस पोहोंचलेल्या प्रतापशाचें राज्य अखेरीस शक १२५४ त नागरशानें कायमचें खालसा केलें. शक १२४० त देवगिरिच्या जाधवांचें राज्य मुबारिक खिलजीनें रसातळास पोहोंचविलें होतें च. तदनंतर १४ वर्षांनीं प्रतापशा जाधवाचें माहीमचें राज्य चेऊलच्या नागरशानें स्वतःच्या राज्यास जोडिलें. " या प्रकारें नागरशानें प्रतापशाचें राज्य विना कष्टीं स्वहस्तगत केलें." राज्यभ्रंशा नंतर प्रतापशाला देसल्यांनीं आपलीं जानवीं तोडून टाकिलीं म्हणून ठार केलें.

२० राज्यभ्रंशा नंतर व प्राणहरणा नंतर प्रतापशाचें नांव हि काढण्याचें कारण बखरकाराला राहिलें नाहीं. त्याच्या पातेणे सरदारांचें हि नांव ह्या नंतर बखरींत कोठें आलेलें नाहीं. त्या वरून दिसतें कीं, हे पातेणे प्रभू कसे तरी माहीम बेटांत जीव-

केंळून कालक्रमणा करीत असावे. शक १२१६ पासून शक १२५४ पर्यंतचीं ३८ वर्षें पातेणे प्रभू माहीम बेटांत मोठ्या ऐश्वर्यानें नांदले. तदनंतर ते जे काय-मचे खालावले त्यांतून त्यांनीं पुढें आजपर्यंत राजकीय दृष्ट्या वर डोकें म्हणून कधीं च काढिलें नाहीं. सरदारकी सोडून अथवा सरदारकी सुटून कायमचें कारकूनमत व कारकूनवृत्ति त्यांनीं स्वीकारिली, असा विलाप केशवाचार्यानें केलेला बखरींत नमूद आहे. पातेणे ऊर्फ पातेणे प्रभू शक १२१५ त उत्तरकोंकणांत बिंबदेव जाधवाच्या अनु-षंगानें आले ही बाब निश्चित असल्या मुळें, कायस्थ प्रभूंच्या उत्तरकोंकणांतील आगमन-काला प्रमाणें पातेणे प्रभूंच्या आगमनकाला संबंधानें कोणत्या हि प्रकारची अनिश्चितता नाहीं. शक १२१५ पूर्वीं कोणी हि पातेणा प्रभु उत्तरकोंकणांत नव्हता. इतर जातींचे प्रभू होते, परंतु पातेणे प्रभू नव्हते. प्रभू म्हणजे काय तें येथें सांगितलें पाहिजे. प्रभु म्हणजे गांवचा इजारदार, जमीदार किंवा मोकासदार. हा प्रभु नांवाचा अमलदार राजानें नेमिलेला असे. ग्रामाधिकारी जो ग्रामस्थापनारंभींचा ग्रामकूट ऊर्फ गाउंडा तो स्वयंभू असून, त्याची वृत्ति वंशपरंपरा चालणारी असे, राजदत्त नसे, इतकेंच नव्हे तर लोकदत्त हि नसे. प्रभुपणा राजदत्त असल्या मुळें, त्याची शाश्वती राजाच्या मर्जी वर राही. राजा दुर्बल झाला असतां किंवा राजक्रांति झाली असतां, प्रभु वंशपरंपरात्वाचा हक्क सांगण्या कडे प्रवृत्ति दाखवी. परंतु ती प्रवृत्ति नवा राजा ताबडतोब खोडून काढी. तत्रापि कित्येक इजारदार व त्याचे वंशज वैशिष्ट्या करितां किंवा बडेजावी करितां, प्रभु-पणाचा अधिकार हातून गेला असतां हि, आपल्या नांवा पुढें प्रभू हें उपपद आडनांवा दाखल जोडीत व त्या जोडीच्या आड कोणी फारसा येत नसे. सध्यां पारशांत, ब्राह्म-णांत व इतर जातींत घराण्याच्या मूळ संस्थापकाच्या धंद्याचें नांव—बाटलीवाला, कूपर, देशपांडे, पंडित, पुराणिक—ज्या प्रमाणें आडनांवा दाखल व्यक्तिनांवा पुढें जोडतात; त्या प्रमाणें च पूर्वीं मूळपुरुषानें कधींकाळीं केलेल्या प्रभुपणाचा दर्शक जो प्रभु शब्द तो आपल्या नांवा पुढें कित्येक घराणीं माहीम प्रांतांत लावतात. ही घराणीं बिंबदेव जाध-वाच्या काळीं सर्व पातेण्यांचीं होतीं, सबब सर्व पातेणे आपणास प्रभु म्हणवितात आणि वैशिष्ट्या करितां पातेणे प्रभू ही संज्ञा धारण करतात. कारण जवळच्या पेण, पनवेल व महाड प्रांतांत प्रभू हें उपपद चांद्रसेनीय कायस्थ हि आपल्या जातीला लावतात. पातेणे हे ज्या प्रमाणें माहीमप्रांतीं गांवांचे प्रभू शक १२१५ नंतर बिंबदेव जाधवाच्या कार-कीर्दीत झाले, त्या प्रमाणें पेणपनवेलमहाडप्रांतांत कायस्थ हे केव्हां तरी तत्रस्थ गांवांचे प्रभू झाले. एणे प्रमाणें उत्तरकोंकणांत दोन प्रकारचे प्रभू अस्तित्वांत आले; पातेणे प्रभू व कायस्थ प्रभू. पातेणे प्रभू म्हणजे पातेणे जातीचे प्रभू व कायस्थ प्रभू म्हणजे कायस्थ जातीचे प्रभू. राजापूरप्रांतीं कित्येक कऱ्हाडे ब्राह्मण प्रभु उपपद धारण करणारे आहेत; परंतु तें उपपद देसाई या आडनावांच्या पाठीं मागें जोडलें जातें, स्वतंत्रपणें आडनांव म्हणून किंवा जातिनाम म्हणून योजिलें जात नाहीं. प्रभुदेसाई हें आडनांव कऱ्हाड्यांत आहे. गांवचा प्रभुपणाचा अधिकार ज्या देसायांच्या पूर्वजांनीं कधींकाळीं भोगिला त्यांचे

वंशज आपणांला प्रभुदेसाई म्हणवितात. सर्व कऱ्हाड्या ब्राह्मणांना प्रभुपणाचा अधिकार केव्हां हि मिळाला नसल्या मुळें, प्रभु हें उपपद कऱ्हाड्यांत जातिवाचक झालेलें नाहीं. परंतु मूळचे कोंकणांत आलेले सर्व पातेणे व सर्व कायस्थ कोंकणांतील गांवांचे एके काळीं प्रभू झाल्या मुळें, प्रभू व पातेणे आणि प्रभू व कायस्थ ह्या शब्दांचें सामानाधिकरण्य झालें. प्रभु हें नांव ज्या प्रमाणें अधिकाराचें वाचक होतें त्या च प्रमाणें कायस्थ हें हि नांव एका कनिष्ठ अधिकाराचें वाचक होतें. काय म्हणजे गांवचा वसूल. काया वर स्थापिलेला जो अधिकारी तो कायस्थ. कायस्थ प्राचीन कालीं ब्राह्मण वगैरे वाटेल त्या साक्षर जातीचे असत. शक ११०९ च्या परळ येथील दुसऱ्या अपरादित्याच्या शिलालेखांत वालिग पंडित नांवाच्या ब्राह्मणाला कायस्थ हें विशेषण लाविलेलें आहे. तात्पर्य कायस्थ म्हणजे कुळकरणी ऊर्फ कुलकरणिक. इतर जातींच्या कायस्थां पासून स्वतःस विशे-षिण्याची अपेक्षा जेव्हां प्रभु कायस्थांस भासूं लागली, तेव्हां त्यानीं आपल्या नांवा पाठी मागें दुसरें एक विशेषण जोडलें. तें विशेषण चांद्रसेनीय हें होय. चांद्रसेनीय ह्या संस्कृत शब्दाचा अर्थ चांद्रसेनिसंबंधक जो तो. चंद्रसेनस्य अपत्यं चांद्रसेनिः असा चांद्रसेनि या शब्दाचा अर्थ होतो. चंद्रसेन नामें कोणी राजा. त्याचा पुत्र चांद्रसेनि. तत्संबंधक जो तो चांद्रसेनीय. चांद्रसेनीय कायस्थ म्हणजे चंद्रसेन राजाचा पुत्र जो चांद्रसेनि त्याचे कायस्थ म्हणजे कुळकरणी. हा चंद्रसेन राजा कोण ? उत्तरकोंकणीय शिलाहारांच्या वंशांत अगदीं शेवटलें नांव सोमेश्वर शिलाहाराचें येतें. हा सोमेश्वर शिलाहार शक ११७१ व शक ११८१ त हयात होता. ह्याचा प्राण व राज्य यादव-चक्रवर्ती जो देवगिरीचा महादेव ( शक ११८२–शक ११९३ ) त्यानें घेतलें. सोम म्हणजे चंद्र व सोमेश्वर म्हणजे चंद्रसेन. सोम, चंद्र, इंदु, शशांक, हे एका च नांवाचे व अर्थाचे प्रतिशब्द ग्रंथकार व कवि सररहा योजीत. असें दिसतें कीं सोमेश्वर ऊर्फ चंद्रसेन शिलाहारानें आपल्या पुत्राच्या अधिकारा खालीं, इतर सर्व आधार सुटल्या वर, कायस्थां करवीं आपला राज्यशकट चालविण्याचा उपक्रम केला. सोमेश्वर शिलाहाराचे सर्व अधिकारी कायस्थ जातींतील व्यक्ती झाले. कायस्थांच्या साहाय्यानें सोमेश्वर शिलाहार राज्य करीत असतां, त्याचा प्राणान्तक पराभव महादेव यादवानें केला. त्या वेळीं सोमेश्वराच्या ताब्यांत पेण, पनवेल, महाड इत्यादि कोंकणप्रांत राहिला होता. माहीम वगैरे उत्तरे कडील प्रांत नागरशा कडे होते. सोमेश्वराच्या पेण, पनवेल, महाड या प्रांतांत कायस्थ जे एकदा स्थापित झाले ते अद्याप पर्यंत त्या प्रांतांत बाहुल्यानें वसती करून आहेत. महादेव यादवानें सोमेश्वर शिलाहाराचें राज्य खालसा केल्या नंतर, रामचंद्र यादवाच्या कारकीर्दीत बिंबदेव यादव आपल्या पातेणे सरदारांस घेऊन माहीम प्रांत आक्रमून राहिला व कायस्थांची जागा पातेण्यांनीं भरून काढिता झाला. सोमेश्वर शिलाहाराच्या कारकीर्दीत कायस्थ लोक गांवोगांवचे दहा पंधरा वर्षें प्रभू म्हणजे इजारदार व मोकाशी झाले होते. त्यांच्या जागीं बिंबदेवाचे पातेणे सरदार तीस चाळीस वर्षें प्रभू झाले. ठाणे, पेण, चौक व महाड या च लहानश्या टापूंत चांद्रसेनीय ऊर्फ

सोमेश्वरीय कायस्थ प्रभू कां सांपडतात व माहीम प्रांतांत च तेवढे पातेणे प्रभू कां सांपडतात, ह्या बाबींचा खुलासा हा असा आहे. कायस्थांचें व पातेण्यांचें दिव्याभोंपळ्या एवढें सख्य कां त्याचा हि उलगडा वरील तपशिला वरून उत्तम होतो. कायस्थांचें पातेण्यांनीं उच्चाटण केल्या मुळें, पातेण्यांच्या संबंधाच्या लिखाणांत कायस्थां संबंधानें किंचित् उल्लेख करणें प्रसंगप्राप्त झालें. कायस्थांना येथें च सोडून, पातेण्यांच्या प्राचीन इतिहासाचा धागा पुन: धरूं. पातेणे प्रभू पैठण, चांपानेर वगैरे प्रांतांतून कोंकणांत आले ही हकीकत बखरींत आली च आहे. प्रभू हें पद पातेण्यांना केव्हां व कसें प्राप्त झालें हें हि बखरींच्या अनुरोधानें आपणास कळून चुकलें. आतां पातेणा व पाठारा हीं दोन विशेषणें ह्या लोकांच्या नांवा मागें कां लागतात त्याचा शोध करूं. सध्यां पाताणा असा उच्चार प्रचारांत बाहुल्यानें आढळतो. परंतु हा अपभ्रंश अर्वाचीन आहे. प्राचीन उच्चार पातेणा होता. पाताणा हा उच्चार खरा व प्राचीन धरून, पातानप्रस्थ ह्या ग्रामनामा वरून पाताणा व पाठारा हे शब्द व्युत्पादण्या कडे माझी प्रवृत्ति पूर्वी झाली होती. परंतु, प्राचीन उच्चार पातेणा असा एकारयुक्त आहे, हें जेव्हां तोंडी व लेखी पुराव्यानें माझ्या ध्यानांत आलें तेव्हां पातानप्रस्थ ह्या ग्रामनामा वरून व्युत्पत्ति सिद्ध करण्यानें काम भागणार नाहीं हें स्पष्ट होऊन चुकलें. बृहदारण्यकोपनिषदाच्या चवथ्या अध्यायाच्या तृतीय ब्राह्मणाच्या परिसमाप्तीस खालील दोन कंडिका आहेत:—

" तद् यथा राजानं आयान्तं उग्रा: प्रत्येनस: सूतग्रामण्य:<br>
अन्नै: पानै: आवसथै: प्रतिकल्पन्ते अयं आयाति अयं<br>
आगच्छति इति; एवं ह एवंविदं सर्वाणि भूतानि<br>
प्रतिकल्पन्ते इदं ब्रह्म आयाति इदं आगच्छति इति ।। ३७ ।।<br>
तद् यथा राजानं प्रयियासन्तं उग्रा: प्रत्येनस: सूतग्रामण्य:<br>
अभिसमायन्ति; एवं एव इमं आत्मानं अंतकाले सर्वे प्राणा:<br>
अभिसमायन्ति यत्र एतद् ऊर्ध्वोच्छ्वासी भवति ।। ३८ ।। "

**अर्थ**

ज्याप्रमाणें येणार येणार म्हणून येणाऱ्या राजा करितां अन्न, पाणी व तंबू यांची तयारी उग्र, प्रत्येनस्, सूत व ग्रामणी करतात; त्या प्रमाणें हें ब्रह्म येत आहे, हें आलें, असें म्हणून सर्व भूतें एवंविदा करितां तयारी करून असतात ।। ३७ ।।

ज्या प्रमाणें जाणाऱ्या राजा पुढें उग्र, प्रत्येनस्, सूत व ग्रामणी एकत्र गोळा होतात; त्या प्रमाणें, अंतकालीं प्राणी उर्ध्वश्वासी होतो तेव्हां आत्म्या पुढें सर्व प्राण गोळा होतात० ।। ३८ ।।

ह्या दोन कंडिकांत उग्र, प्रत्येनस्, सूत व ग्रामणी, ह्या चार कामदारांचा निर्देश केलेला आहे. ग्रामणी म्हणजे गांवाचा गावुंडा, मुख्य पुढारी इत्यादि. सूत म्हणजे रथकार, भाट. उग्र म्हणजे लढाऊ शिपाई. आणि प्रत्येनस् म्हणजे चोराचिलटांचा

बंदोबस्त करणारा पोलिस. शंकराचार्य ह्या शब्दांचा असा अर्थ देतातः--उग्राः जातिविशेषाः क्रूरकर्माणो वा । प्रत्येनसः प्रति प्रति एनासि पापकर्माणि नियुक्ताः प्रत्येनसः तस्करादिदंडनादौ नियुक्ताः । सूताः च ग्रामण्यः च सूतग्रामण्यः । सूताः वर्णसंकरजातिविशेषाः। ग्रामण्यः ग्रामनेतारः । ग्रामणी अन्नपाण्याचा पुरवठा करी; सूत तंबू, रथ वगैरेंच्या दुरुस्तीच्या कामीं उपयोगी पडे; उग्र रखवालदारांचें कार्य संपादी; आणि प्रत्येनस् चोराचिलटां पासूनचें भय निवारी. उग्राः, प्रत्येनसः, सूताः, ग्रामण्यः हे सर्व शब्द अनेकवचनी आहेत. तेव्हां उघड च झालें कीं, शिपाई, गांवचे पुढारी, दागदुजी करणारे रथकार व पोलीस हे राजाची सरबराई करणारे लोक अनेक असत. ब्रहदारण्यकोपनिषद्रचनाकालीं ग्रामणी व प्रत्येनस् ह्या कामदारांच्या जाती बनल्या नव्हत्या. त्या कालीं सूत व उग्र ह्यांच्या देखील जाती बनल्या होत्या किंवा नाहीं, हें निश्चयानें सांगवत नाहीं; बहुशः जाती बनल्या नसाव्या. शंकराचार्य सूत व उग्र हे संकरजातिवाचक शब्द आहेत म्हणून म्हणतात. परंतु स्वकालीन अर्थ उपनिषत्कालीन शब्दांना लाविण्याची ते चुकी करीत आहेत, हें उघड दिसतें. ग्रामणी, सूत, उग्र व प्रत्येनस् ह्या चार शब्दां पैकीं प्रत्येनस् ह्या शब्दाशीं सध्यां आपणास कर्तव्य आहे. प्रत्येनाः ह्या शब्दाचा मराठींत अपभ्रंश पातेणा असा झाला आहे. असा त्य चा ते प्रांतिक, अशिष्ट व प्राचीन मराठींत होतो. प्रत्येक=प्रतेक, अत्यन्त=अतेन्त, सत्य=सते, इत्यादि अपभ्रंश स्टेफेन्स च्या खिस्तपुराणांत हवे तितके सांपडतील आणि अशिष्ट लोकांत तर अद्याप हि ऐकूं येतात. तात्पर्य, पातेणा हा शब्द प्रत्येनस्—प्रत्येनाः ह्या जुनाट संस्कृत व वैदिक शब्दाचा अपभ्रंश आहे. प्रत्येनस् म्हणजे पोलिस शिपाई. पातेणे ह्या शब्दाच्या जोडीचा च पाठारा हा शब्द आहे. हा शब्द प्रतीहारः या संस्कृत शब्दाचा अपभ्रंश आहे. प्रतीहारः=पडीहारा=पाठारा. प्रतीहार म्हणजे दारवठेकार, द्वाररक्षक, पाहारेकरी. पातेणे पोलिसाचें जसें काम करीत तसा च पाहारेकऱ्याचा हि धंदा करीत. सबब, हे लोक आपणाला पातेणे जसे म्हणवीत तसे च पाठारे हि म्हणवीत. पोलिसाचा व पहारेकऱ्याचा धंदा करणारे हे लोक आयुधजीविसंघां पैकीं असत. लढवय्ये लोक पाहारेकऱ्याचा धंदा, लढण्याचा धंदा न मिळाल्यास, करतांना कालोकालीं दृष्टीस पडतात. उदाहरणार्थ, मालोजी व बाबाजी भोसले. हे प्रथम दारवठेकाराचा धंदा करीत, हें सुप्रसिद्ध आहे. तात्पर्य, पातेणे ऊर्फ पाठारे प्रभू हे मूळचे लढवय्ये लोक होते व हे पोलिसाचा व पाहारेकऱ्याचा धंदा करीत असत. बिंबदेव जाधवानें ह्या लोकांना देवगिरी प्रांतांत असतांना आपल्या तैनातींत खास रक्षणा करितां ठेविले व कोंकाणा वर स्वारी करण्याच्या प्रसंगीं कोंकणांत आणिले. कोंकणांत आल्या वर गांवोंगांवचे हे प्रभू झाले. हें प्रभूपण त्यांनीं फक्त ३८ वर्षे भोगिलें आणि उच्च मुत्सद्दीगिरी किंवा उच्च शिपायगिरी करण्याचें कौशल्य आंगीं असावें तसें नसल्या मुळें किंवा उत्कट प्रतिबंध आडवे आल्या मुळें, हे उत्तरोत्तर अगदीं खालावत गेले. कायस्थ प्रभूंची हि अशी च दुर्दशा झाली. सोमेश्वर शिलाहाराच्या दहा पंधरा वर्षांच्या अमदानींत उदयास येऊन हे पेणपनवेलमहाड

प्रातांत गांवगन्ना प्रभू झाले व दहा पंधरा वर्षे प्रभूपण भोगिल्या वर जे खालावले व इतिहासांतून अदृश्य झाले ते पुनः मराठेशाहींत किंचित् उदयास आले. ह्या दोघां हि प्रभूंचा उत्कर्षकाल अनुक्रमें पंधरा व अडतीस वर्षांचा अल्पावधिक असल्या कारणानें त्यांना धुरंधर, जैवन्त, रणदिवे, चौबळ, धराधर, समर्थ, इत्यादि भपकेबाज उपपदें कशीं व कधीं मिळालीं ह्या बाबीची आठवण हि बुजून गेली आणि प्रस्तुत बखरीचा टेंकू जर न मिळता तर हे कोण व कोठील ह्या बाबीचा पत्ता हि न लागता. भरतखंडांतर्गत सह्याद्रिखंडा-तील समुद्रतीराच्या पन्नास शंभर मैलाच्या टापूंत धूमकेतुवत् किंचित्काल चमकून काला-च्या व अनितिहासाच्या काळोख्यांत त्यांची आदि जी शेकडों वर्षे लपाली ती प्रस्तुत बखरीच्या व केशवाचार्यादींच्या कृपाप्रसादानें पुनः आधुनिक इतिहासादर्शांत प्रतिबिंबाय-मान होत आहे.

२१ शक १२५४ त प्रतापशा जाधवाचा पेणपनवेलादि प्रांत नागरश्यानें आपल्या राज्यास जेव्हां जोडला, तेव्हां भोंवतालील परिस्थिति एणे प्रमाणें होती. देवगिरीचें यादवांचें साम्राज्य शक १२४० त मुसुलमानांच्या हातीं जाऊन १४ वर्षे लोटलीं होतीं. अणहिलपाटणचें वाघेल्यांचें राज्य शक १२२० त मुसुलमानांच्या कबज्यांत जाऊन ३४ वर्षे झालीं होतीं. सोमेश्वर शिलाहाराचा वध महादेव यादवाच्या हस्तें होऊन व शिलाहारसत्ता शक ११९० च्या सुमारास कायमची नष्ट होऊन साठा वर कांहीं वर्षे गेलीं होतीं. गोव्याच्या कदंबांची रियासत शक ११९० च्या सुमारास च नष्ट झाली. उत्तरकोंकणांत माहीम, ठाणे व चेऊल येथें राज्य करणारा नागरशा तेवढा देशी संस्थानिकां पैकीं किंवा आतां स्वतंत्र राजां पैकीं शिल्लक राहिला. खालतीं दाक्षि-णेस तुंगभद्रेच्या तीरीं विजयानगरास संगम राज्य स्थापण्यास लागून दहा पांच ष झालीं असतील नसतील. असें सर्वत्र तुर्काण प्रवर्तमान झालें असतां, शक १२५४ त नागरशा ठाणेंकोंकणांत राज्य करूं लागला. प्रतापशा जाधवाशीं लढतांना ज्या सरदा-रांनीं कष्टमेहनत बहुत सोशिली व पराक्रम विशेषात्कारें केला त्यांना नागरशानें बहुता प्रकारें गौरविलें. आंधेरीकराला छत्री दिधली. वारणें व वांद्रे नांवाजिले. साहारकर व पालवणकर हे हातसांखळ्या ( सोन्याचीं कडीं ) पावले. जैतचुरी नांवाचा राजाचा पाळकपुत्र होता, त्यानें गेल्या युद्धांत पराकाष्ठेची बहादूरकी गाजविली, सबब यास दळाची नाइकी दिली व येसाव्या भोंवतील चौफेर बंदरकीचा मामला सूपूर्द केला. का-लान्तरानें हा जैतचुरी इतका फुशारून गेला कीं, येसावें तो आपल्या च मतें प्रवर्तवूं लागला व नागरशाला विचारीत ना सा झाला. जैतचुरीचा पुत्र भागडचुरी नामें होता. तो तर बापाहून हि कांकणभर जास्त चढेल निपजला. “ दालिवंद नाय कवडा यश-वंत होता. वहुता युद्धां मध्यें जयो पावला. म्हणोन रायानें सेनाधिपति केला. तेणें कितीएक कार्यें रायाचीं बहुते प्रकारें उत्तमान्वयें यथापुरुषार्थीं सिद्धि पाविलीं. एसें जाणोन राया नागरशानें त्यास साष्टीचा कारभार दिधला. त्यानें जमीनींची मोजणी केली. सात हातांची काठी व बारा काठ्यांचा बिघा भागडचुरीनें चालू केला. चार

फऱ्यांचा एक हारा दर दोन बिघ्यास राजभाग ठरविला. एक शें अठ्ठावीस बिघ्यांचा एक चावर केला.'' या प्रकारें जुनी तऱ्हा मोडून नवीन तऱ्हेनें कमाविस करूं लागला. दादाजी कोंडदेव, चतुर साबाजी, इत्यादींचीं नांवें प्रख्यात मोजणीदार म्हणून महाराष्ट्रांत सर्वतोमुखीं आहेत. त्या नांवांत भागडचुरीचें नांव हि घेण्या सारखें आहे. आपल्या नवीन मोजणीनें भागडचुरीनें बिघ्यांची संख्या वाढविली आणि दोन फऱ्यांच्या ऐवजीं चार फऱ्यांचा हारा करून, सरकारी उत्पन्न निदान तिप्पट तरी चढविलें. स्वामिकार्यी तत्पर व हितार्थी म्हणून नागरशानें भागडचुरीची प्रतिष्ठा परा कोटी प्रत नेली. ते समयीं, ईश्वरी इच्छा, ऐश्वर्याचा माद चढून भागडचुरीची बुद्धि फिरली. जमीनींचा सारा बेसुमार वाढविल्या मुळें भागडचुरी आधीं च लोकद्विष्ट झाला होता. तशांत अलीकडे तो स्त्रीव्यसनीं पडला. भल्याभल्यांच्या स्त्रियां वर बलात्कार करूं लागला. कित्येकां पासून अनीतीनें द्रव्य उकळण्याचा त्यानें सपाटा चालविला. गाऱ्हाणीं राया पाशीं पोहोचलीं. परंतु राजाची हि क्षति भागडचुरी बाळगीत नासा झाला. शिक्षा लावावी, तर जीवास उदार म्हणून राजा हि मनीं दचके. होतां होतां भागडचुरी इतका बेफाम झाला कीं मालाडचा लोकप्रिय देसला जो सोम त्याच्या भावाच्या लावण्यसंपन्न स्त्री वर त्याची नजर गेली. तिला बलात्कारानें हरण करण्याचा घाट भागडचुरीनें घातला. सोमदेसला, त्याचा बंधू व घरांतील सर्व पुरुष त्यानें बंदखानीं कोंडिले आणि त्या स्त्रीस काढून आणण्यास शिपाई धाडिले. इतक्यांत ही बातमी कळून, सोमदेसल्याच्या आप्तेष्टांनीं त्या स्त्रीस कुऱ्हारास रातोरात नेली. हा प्रकार ऐकून भागडचुऱ्यानें त्या स्त्रीच्य भ्रतारास रागानें ठार मारिलें व कुऱ्हारास शिपाई पाठविले. तेथून ती स्त्री भाइंदरास माहेरीं गेली. चार महिन्याची गरोदर होती. भागडचुरीच्या भयानें मातृपक्षीयांनीं तिला आपल्या मामाच्या घरीं भिवंडीस पाठविली. तेथें ती प्रसूत होऊन पुत्र झाला. तो बारा वर्षांचा झाल्या वर, त्यास आपल्या पित्याच्या वधाची व भागडचुरीच्या अधमपणाची हकीकत मातृमुखें कळली. तेव्हां भाऊबिरादरांचा जमाव करून त्या मुलानें भागडचुरीला ठार मारतों म्हणून नागरशास कळविलें. नागरशास तें च हवें होतें. भागडचुरीची वासलात कोणी लाविल्यास त्याला ती हवी च होती. सोमवारच्या दिवशीं महडदेवीची यात्रा होती. देवींदर्शनास भागडचुरी जिव्हाळ्याचे बारा स्वार घेऊन गेला. त्याच्या वर त्या मुलानें व त्याच्या साथीदारांनीं हल्ला केला. दोन स्वार जागच्या जागीं च ठार झाले. राहिलेले भागडचुरी सह जे पळाले ते पायउतारा होऊन खाडींत पोहोंत चालले. खाडींत होड्या होत्या त्यां वरील एका तांडेलास मुलानें हटकिलें कीं, जर तो भागडचुरी मारशील तर मागशील तें देईन. तांडेल बोलता झाला कीं, मला आपल्या जातींत घ्याल तर भागडचुरीस ठार करतों. प्रसंग तसा च जाणोन मुलानें तांडेलाची अट कबूल केली. तेव्हां तांडेलानें पालकोयती हाणोन भागडचुरी यमसदनास पाठविला. तांडेलानें भागडचुरीचें शीर कापून त्या मुलास दिलें. तें घेऊन सर्व लोक मुक्तेश्वरीं आले. खुशाली करों आदरिली. कांहींक धर्म केला. जातिभोजन घातलें.

सूर्यवंशी व सोमवंशी पाना वर बसले. तों तो तांडेल सोंवळे नेसान तेथें आला व म्हणों लागला कीं, भाष उत्तीर्ण करणें. मंडळींत कुजबुज सुरू झाली कीं कैवर्तकास जातींत कसा घ्यावा व पंक्तीस बसूं कसा द्यावा ? हो ना करतां करतां मंडळींनीं त्या कैवर्तकास पंक्तीस घेतलें व जातींत सरता केलें. नंतर मंडळी राजदर्शनास गेली. भागडचुरी मारिला म्हणून राजानें त्या मुलाचा बहुत सन्मान केला. परंतु तांडेलाशीं पंक्तिव्यवहार केला इतकें च नव्हे तर त्यास जातींत सरता केला, हें ऐकून नागरशानें मंडळींस दोष दिला व कैवर्तकाच्या पंक्तीस बसणाऱ्या व त्याला जातींत घेणाऱ्या सर्व लोकांचीं यज्ञोपवीतें काढून टाकविलीं. ही हकीकत शक १२६७ च्या सुमारास घडली.

२२ तांडेलानें भागडचुरी मारून त्याचें शिर कापिलें म्हणून वरील कलमांत जें निरूपण आलें आहे तें खरें नव्हतें. भागडचुरी कांहीं एक दुखापत न होतां जो निसटला तो लपूनछपून कांहीं दिवस होता. नंतर त्यानें कारस्थान आरंभिलें. नाथराव शिंदा नांवाचा नागरशाचा एकांगवीर असा जमातदार होता. त्याचा व ठाकूर नांवाचा दुसरा एक सरदार होता त्याचा कथळा पडला. वाद मानपाना संबंधीचा होता. नाथराव म्हणे कीं ठाकूर तिसऱ्या मानाचा नसून चवथ्या मानाचा आहे. ठाकूर म्हणे कीं आपण तिसऱ्या मानाचे आहोंत. तिसऱ्या मानाच्या सरदारास चवथ्या मानाच्या सरदारा च्या आधीं टिळा विडा इत्यादि देणग्या देण्याची वहीवाट लौकिक समारंभांच्या प्रसंगीं त्या काळीं असे व त्या मानपानाचा अभिलाष सरदारमंडळी मोठ्या औत्सुक्यानें धरीत. नाथराव शिंद्याचें व ठाकुराचें हें मानापमानाचें भांडण इतक्या विकोपास पोहोंचलें कीं नाथरावानें आपल्या जमातदारीच्या अधिकारांत ठाकुराचा तिसरा मान काढून टाकिला. ह्या कृत्या बद्दल नागरशानें नाथरावाचा धिःकार केला. त्या मुळें असंतुष्ट होऊन नागरशाचें व नाथरावाचें वैमनस्य पडलें. ह्या वैमनस्याचा फायदा भागडचुरीनें घेतला. भागडचुरीनें वडनगरच्या मलिकाशीं अगोदर च संधान बांधिलें होतें. त्या कडे त्यानें नाथरावाला फितवा घेऊन जाण्याची सल्ला दिली. नाथराव कागाळी घेऊन वडनगरास गेला. वडनगरच्या मलिकानें नागरशा कडे नाथरावाचा कैवार घेणारा एक भाट पाठविला. वडनगरचा मलिक म्हणजे दिल्लीचा पातशाहा जो महमद तुघलघ त्याचा हस्तक. भाट कोंकणांत नागरशाच्या दरबारीं आला व पातशाहाच्या बिरुदांची नामावळी म्हणता जाला. म्लेच्छ राजाची ती नामावळी त्या देशाभिमानशून्य व धर्माभिमानशून्य भाटाच्या तोंडची ऐकतां च नागरशाचा पुत्र जो त्रिपुरकुमर त्याच्या पायाची आग मस्तकास पोहोंचली. पहिल्या नागरशाच्या पुत्राचें नांव जसें त्रिपुरकुमर होतें तसें ह्या दुसऱ्या नागरशाच्या पुत्राचें नांव हि त्रिपुरकुमर च होतें. त्रिपुरकुमरानें त्या भिकार भाटाचें नाक कापून त्याला गांवा बाहेर हाकून दिलें. भाट दिल्लीस गेला. पातशाहास सर्व वृत्तान्त कळला. त्यानें निका मलिक नामें सरदाराला बारा शें घोड्यां निशीं नागरशा वर पाठविलें. रात्रिच्या थंड समयीं चालावें व दिवसा दबा धरून

बसावें, असें करीत करीत, पायगांवचे मोरिया वरून नौकांनीं संभुजे वर मलिक उतरला. तेथून बारा खाड्या वलांडून निका मलिक कान्हेरीस आला. तेथें युद्ध होऊन, नागरशाच्या फौजेचा पराभव झाला. तेथून ठाणें काबीज केलें. शिवां वर उतरला. माहिमास गेला. तेथें नागरशाची राणी होती. तिशीं दहा घटिका युद्ध होऊन, निका मलिकानें राणी मारिली. राजा नागरशा वाळुकेश्वरीं होता. त्याची व मलिकाची गांठ भायखळ्यास पडली. थोर युद्ध झालें. नागरशा मारिला गेला. एणें प्रमाणें निका मलिकानें ठाणेंकोंकणचें राज्य घेतलें. शक १२७० त ठाणें कोंकणांत तुर्काण झालें.

२३ नागरशाचें ठाणेंकोंकणचें राज्य मुसुल्मानांनीं काबीज केल्या वर, गुजराथ व महाराष्ट्र ह्या देशांत शक १२७० नंतर नांव घेण्यासारिखें प्रतिष्ठित असें स्वतंत्र हिंदू राज्य एक हि राहिलें नाहीं. हिंदू राज्यें नष्ट होण्याचें कारण बखरकार देतो तें मासलेवाईक आहे. बखरकार म्हणतो, कलियुगांत असा प्रकार होणार अशी भाक लक्ष्मीनारायणानें कलीस दिली होती. ती भाक १२७० शकांत पूर्णपणें खरी ठरली. हरिहर गुप्त झाले. ऋषि बद्रिकाश्रमास गेले. वसिष्ठ राजगुरु कांहीं काळ मागें राहिले होते त्यानीं हि पाठ फिरविली. त्या मुळें सूर्यवंशी व सोमवंशी यांची शस्त्रविद्या लुप्त होऊन म्लेंच्छांचा व कलीचा जय झाला !

२४ म्लेंच्छांचें राज्य झालें तेव्हां निरुपाय होऊन ठाणेंकोंकणांतील सूर्यवंशी व सोमवंशी कौल घेऊन सामान्य रयत बनून राहिले. नागरशा राज्यभ्रष्ट झालेला देखून, त्याचा शत्रू जो भागडचुरी त्याचा आनंद गगनांत मावे ना. तो निका मलिकास येऊन भेटला. त्यास देशाची जमी सांगितली. महाल, परगणे, खापण, गावें, वोळी, हवाले, मसाले, हाट, बकाल, आदाय, खर्च, इत्यादींचा सर्व तपशील भागडचुरीनें निका मलिकास समजाऊन दिला. मलिक मेहेरबान होऊन त्यानें भागडचुरीला हुजूरमजलीसीपदस्थ केलें. सर्व कारभार भागडचुरीच्या सल्ल्यानें चाले. मग भागडचुरीनें पूर्वीचीं वैरें उकरून काढिलीं. त्यानें भाइंदरकर पाटलां वर कुभांड रचिलें कीं सरकारपैक्या पैकीं ह्यांनीं ३२००० बत्तीस हजार सजगाणीची अफरातफर केली. मलिकानें पाटलास बंदीखानीं घातलें. तेव्हां ज्याच्या भावाच्या स्त्री वर जुलूम करण्याच्या आरोपा वरून भागडचुरीला पलायन करावें लागलें होतें त्या सोमदेसल्यानें पाटलांच्या वतीनें दिवाणांत पैसा भरला व पाटलांस बंधमुक्त केलें. हा पहिला डाव फसलासा पाहून, भागडचुरीनें निका मलिकाचे कान भरिले कीं, हा सोमदेसला फार लुच्चा व चढेल माणूस आहे, त्यास दस्त करावा. निका मलिकानें सोम ठाकुराला नाहक सोळा हजार दाम दंड ठोठाविला. तो सोम देसला कांहीं केल्या देई ना. सबब, निका मलिकानें त्याची देसलकी अमानत करून ती भागडचुरीस देऊं केली. परंतु सोम ठाकूर व त्याचा भाऊ पायरुत हे पुरातन देसले जीवंत असतां, देसलकीला हात लाविण्याची भागडचुरीची प्राज्ञा नव्हती. तेव्हां भागडचुरीनें मलिकास कळविलें कीं सोम ठाकूर व

पायरुत यांस जीवें मारिल्या बिगर, देसलकीचा कारभार सुरक्षित चालणार नाहीं. निका मलिकानें दिल्लीस पातशाहास कागद लिहिला कीं सोम ठाकूर देसला मोठा लांचखाऊ कुभ्राणदार असामी आहे, त्याला दस्त केल्या वांचून देशाची मशागत होत नाहीं. त्या वरून पातशाहानें सोम देसला व पायरुत यांना दिल्लीस बोलावून घेतले व तेथें त्यांचे प्राण हरण केले. पापरुताची खाल काढिली. सोमदेसल्याचें पोट चिरून, आंतड्याची वात वळून व चर्बीचें तेल जाळून, त्याचा दिवा लाविला. असल्या क्रूर व पाशव शिक्षा मुसलमानी राज्यांत दिलेल्या अद्याप हि आढळतात. त्या कालीं तर त्यांचा हरहमेश प्रचार होता. Margoliouth आपल्या Mohommedanism ह्या पुस्तकाच्या १०३ व्या पृष्ठा वर येणें प्रमाणें लिहितो:—D. Fraser in a book published this year gives a photograph of a brigand buried alive by order of a governor of Ispahan; the present writer had an interview with another persian governor in 1901, who was said to have cut a prisoner to pieces, and a photograph is said to have been taken of the same process in the market-place of a Persian city. In independent Moslem states such practices were common; to our sensitive minds the perusal of most chronicles in Moslem languages is in consequence harrowing. Hand-cutting, which is the legal punishment for theft, can scarcely be regarded as other than mutilation, and it is strange that the Prophet should have maintained it. That this still exists in Persia is attested by travellers: "Such horrible punishments," says Miss Ella Sykes (in I910), as being plastered up alive, being crucified or blown from a cannon, are practically punishments of the past; but a petty thief is still liable to have his hand severed." The punishment assigned by law for abandoning Islam is death. सोम देसल्या वर असा सूड उगविल्या नंतर, भागडचुरी मलिकाच्या जोरा वर देसलकी करूं लागला. तो देशांतील रयतांना मान्य होई ना. चहूं गावींचे भलेभले लोक एकत्र मिळून पापरुताचा मुलगा दादरुत देसला यास भेटले. भागडचुरीचा भाऊ कमळचुरी याज वर हल्ला चढविला. भागडचुरी हरबादेवीच्या यात्रेस गेला होता, त्याला गांठून घायाळ केलें. भागडचुरीनें कांदरडाह्यांत उडी घेतली. तेथें होडी वर गोम तांडेला होता. गोम तांडेल्यास समिल म्हातऱ्यानें भागडचुरीला मारण्यास सांगितलें.

जर आपली कन्या देशील व जातींत घेशील तर मारतों, म्हणून तांडेल्यानें उत्तर केलें. तें सीमल म्हातऱ्यानें मान्य केलें. तेव्हां गोम तांडेल्यानें भागडचुरीस वर्मी पालकोयती हाणिली आणि पाण्यांत उडी टाकून वल्ह्याचा चुडा मारिला. भागडचुरी मुक्ती पावला. कामगिरी बद्दल, गोम तांडेल्यास देसल्यांनीं आपल्या जातींत घेतलें व दरण्याची कन्या दिली. गोत्र कश्यप ब्राह्मणीं दिधलें.

२५ भागडचुरीचा असा अंत झाल्या वर निका मलिकाला लोकांची मोठी जरब बसली. लोकांच्या तंत्रानें थोडे बहुत वागल्या खेरीज निभाव लागणें कठिण असें जाणून, वृत्त्या, मानपान, वगैरे ज्यांच्या त्यांज कडे निका मलिकानें जाहीर रीतीनें चालू केल्या, इतकें च नव्हे तर नागरशाच्या माहीमच्या गादी वर नागरशाचा पुत्र लाहूरशा यास बसविलें. लाहूरशानें माहीमास राज्य नऊ वर्षे केलें. पृष्ठ ५० त नऊचा आंकडा नकलकारानें बरोबर लिहिला आहे, परंतु पृष्ठ ६२ त दोहोंचा आंकडा चुकीचा दिला आहे. लाहूरशाच्या नऊ वर्षांच्या अमदानी नंतर, निका मलिकानें माहीमचें राज्य शक १२७९ त नायत्या राजांच्या स्वाधीन केलें. हे राजे मूळचे प्रतिलोम हिंदू होते, परंतु ते पुढें मुसलमान बनले. जन्मानें व कुळानें देशी आणि धर्मानें मुसलमानी असे हे दुरंगी राजे हिंदू देसल्यांस हि मानवले व निका मलिकास हि आवडले. ह्या नायत्या राजांची वंशावळ बखरकार येणें प्रमाणें देतो:—

| | | |
|---|---|---|
| आबू नाखवे | राज्य केलें वर्षे | १२, ११९६ |
| पाणी सावंत | ” ” ” | १३, शक ११२८ |
| हंबीरखान | ” ” ” | २७, शक ११४१ |
| सुरंगन | ” ” ” | ३२, शक ११६८ |
| नसीलखान | ” ” ” | ३६, शक १२०० |
| हंबीरखां | ” ” ” | ४०, शक १२३६ |
| डफरखां | ” ” ” | ३०, शक १२७६ |
| मलिक थुरदार | ” ” ” | १०, शक १३०६ |
| मकसीदसीर आरबा | ” ” | ३५, शक १३१६ |

नायत्या राजांच्या नंतर वीस वर्षे माहीम प्रांतांत भोंगळे यांनीं दंगा केला. तदनंतर पंधरा वर्षांनीं अमदाबादेचा सुलतान जो अहमदशहा त्याचा सुलगा डफरखां ऊर्फ जफरखां ह्याच्या ताब्यांत माहीम गेलें. हा प्रसंग शक १३५१ त घडला. (Bombay Gazeteer, History of Gujarat, page 239). अहमदशहा शक १३६३ त वारला. ६ बद्दल १ बखरींत चुकीनें पडला आहे. डफरखां ऊर्फ जफरखां यानें माहीमास २५ वर्षे राज्य केलें व शक १३७६ त तो एकाएकीं वारला. डफरखां नंतर, माहीमची कमावीस अमदाबादेचे सुलतान स्वतःच्या अंमलदारां करवीं घेऊं लागले. अमदाबादेच्या सुलतानांची वंशावळ बखरकार अशी देतो:—

१ अलाउद्दीन ( नासीरुद्दीन ), शक १३२५
|
२ तोगिलखां
|
३ पेरोजस्या
|
४ गिलियादिन ( घियासुद्दीन ) १३६३
|
५ बाहादूरशाहा
|
६ आमदस्या
|
७ माहामदशहा बेगडा, शक १३८१
|
८ मुजफर, शक १४३५
|

| सिकांदर | बाधुरस्या | माहंमदस्या | चांदखां | आहमदस्या |
|---|---|---|---|---|
| शक १४४८ | शक १४४९ | शक १४४८ | | |

ह्या नांवां पैकीं २, ३, ५ व ६ नंबरचीं नांवें ओळखतां येण्याची पंचाईत पडत्ये. दाउद अहमद याला आमदस्या बखरकार म्हणत असल्यास, नंबर सहाचें नांव कल्पनासृष्टींतून वस्तुसृष्टींत येऊं शकेल. तोगिलखां म्हणजे तातारखां व पेरोजस्या म्हणजे अहमदशहा जर असेल, तर नंबर २ व ३ च्या नांवांची हि संगति लागते. बाकी राहिलें नंबर ५ चें बहादूरशहा हें नांव. घियासुद्दीन मुहमदशहा च्या मृत्यू नंतर व दाउदशहा च्या राज्यारोहणा पूर्वीं गडबड होऊन नंबर ५ चा बहादूरशहा कांहीं दिवस गादीनशीन झाला असल्यास, नंबर ५ च्या नांवाची हि विल्हेवार सुरळित होते. शक १४४८ त मुजफरशहा वारल्या नंतर, त्याचा मुलगा शिकंदरशहा अमदाबादच्या गादी वर बसला. परंतु त्याचा खून होऊन, त्याचा भाऊ माहामदशहा तख्तनशीन झाला. बहादूरशहा हिंदुस्थानांत पीराच्या भजनीं होता तो ह्या च सुमारास गुजराथेंत आला व त्यानें माहामदशहाला ठार मारून गादीचा ताबा घेतला. ह्याच्या कारकीर्दींत ठाणे-कोंकणा वर अमदाबादच्या सुलतानांची सत्ता स्थिर झाली. माहीम प्रांतांतील क्षुद्र देसाईदेसले आपसांतील मानापमानाचीं क्षुल्लक भांडणांचीं गाऱ्हाणीं मुसलमान अधिकाऱ्यां कडून फैसल करून घेण्यांत गुंगले होते. राजकीय महत्त्वाची किंवा अधिकाराची आकांक्षा त्यांच्या स्वप्नीं हि राहिली नव्हती. वसईस बहादूरपुरा बहादूरशहानें वस-

विला. मालिक अलाउद्दीन नामें सरदाराला बाहादूरशहानें विसामागड तांदुळवाडीचा किल्लेदार केलें. त्यानें गडा खालीं बुराणपुर नांवाचें नवें गांव स्थापिलें आणि गडाच्या दक्षिणेस अमदानगर किराडची वसाहत केली.

२६ अश्या प्रकारें अमदाबादच्या सुलतानांचें बस्तान ठाणेंकोंककणांत बसत चाललें असतां, महमूदशहा बेगडा याच्या कारकीर्दींत शक १४२२ त पोर्तुगालाहून फिरंगी दोन तारवें घेऊन या प्रांतीं आले. एका तारवाचें नांव सिनोर देस्कोर व दुसऱ्याचें बोजिजुझ. कप्तानाचें नांव लोरेंस लुइस देताव्र. येतां च कोची बंदर कबज केलें. तेथोन गोवें घेतलें. नंतर शक १४३४ त फिरंगी दवण प्रांतास आले. आमदरफ्ती करूं लागले. नफ्याचें आमिष दाखवून वसईस फेतोरी म्हणजे फ्याक्टरी ऊर्फ आडतबाजार घातला. उदीमा मुळें बहुत हासल होईल या मतलबानें फिरंग्यास वसईस दांडाळ्या तळ्या जवळ जागा मांडवी उभारण्या करितां दिली. तळ्या वर नागेशतीर्थाचीं आयतीं भिंताडें होतीं त्यांची मजबुती करून फिरंग्यांनीं वसती केली. आमदानी करीत चालले. प्रीतीचीं लक्षणें बहुत दाखविलीं. वर्षें तीन पावें तों विश्वास उत्पन्न करून फेतोरीची अधिकोत्तर मजबुती करीत चालले. भांडीं म्हणजे जंगी तोफा सोळा फेतोरी वर आणून ठेविलीं. नंतर गोमताचळाहून म्हणजे गोंव्याहून हळूच आरमार आणिलें. प्रांताच्या मुसलमान सुभेदारास गोड भुलथापा देऊन जहाजावर बसवून मार्गीं दगा दिला. तसे च दवणेस उतरले. मारामारी करोन दवण घेतलीं. नंतर यावत् माहीम बिंबस्थान पावें तों सर्व कोंकणकिनारा काबीज केला. वसईस फेतोरी वर आल्मेद कप्तान होता त्यानें हा सर्व डाव रचिला. त्या दिवसा पासोन फिरंग्यांची काबजात झाली. सुलतानाचें व मुसलमानांचें फिरंग्यां पुढें कांहींएक चाले ना. पातशहा पराभव पावला. रयत लोकां पैकीं व वाणी उदम्यां पैकीं ज्यास जें पाहिजे तें देवून सर्वत्र आबादीआबाद केलें. धर्म ज्याचा त्यास चालता केला. अशीं २५ वर्षें गेलीं. नंतर खरें स्वरूप दाखविण्यास प्रारंभ केला. दहशत घातली कीं हिंदू किंवा मुसुलमानी धर्मानें जो चालेल त्याला गिरफ्तार करून गोंव्यास पाठऊं. त्या भयानें कित्येक परागंदा झाले. कित्येक गोमांतकास धरून नेले. तेव्हां सगळ्यांस फिरंगी त्या शब्दाचा वाच्यार्थ कळला. प्रांतांत अशी दहशत बसविल्या वर व स्थिरस्थावर केल्या वर फिरंग्यांनीं शेजारच्या रामनगरच्या संस्थानिका कडे दृष्टि फेकिली. प्रतापशा जाधवाची एक राख होती. तिचा पुत्र देवशा . त्याचा पुत्र रामशा. त्या रामशानें पुंडाई करून, सह्याद्रिकिनाऱ्याचे १५७ गांव कबजांत घेतले व त्या प्रांताचें नांव रामनगर ठेविलें ( शक १२९४ सुमार ). त्याचे वंशज रामनगरास राज्य करीत असतां, त्यांच्याशीं फिरंग्यांची घसघस सुरू झाली. फिरंग्यांशीं भांडतां पुरवत नाहीं असा अनुभव येऊन, रामनगऱ्या तहास आला. फिरंग्यांनीं जे गांव घेतले त्यांची चौथाई रामनगऱ्यास मिळावी, असा तह झाला. रामनगऱ्याचा जव्हारचा कोळी उमराव होता. त्यानें त्या संधीचा फायदा घेऊन फितवा केला व कित्येक गांव मारून काढिले.

थंडा पडला. तो च उद्योग माळवा, पंजाब, काफरिस्थान व चित्रळ ह्या प्रदेशांत मानभावांच्या भक्तिमार्गानें गेलीं आठ शें वर्षें चालविला आहे. महाराष्ट्राचा राष्ट्रीय देह जर पुन: सजीव झाला तर पूर्वीचा महाराष्ट्रधर्म, अर्थात् महाराष्ट्रभाषा, भरतखंड भर पसरविण्याचा पूर्वजन्मींचा धागा त्याला सोडून चालतां येणार नाहीं असें भविष्य वर्तविण्याचें कारण नाहीं. जीवमात्राचा हा निसर्गधर्म च आहे.

३५ दमण पासून मुंबई पर्यंतच्या व समुद्रा पासून सह्याद्रिपर्यंतच्या टापूंतील मांगेले, वारली, कोळी, ठाकर, कातवडी, वगैरेंच्या प्रांतांतील नद्या, डोंगर व गांवें ह्यांचीं नांवें पहातां तीं सर्व संस्कृतोत्पन्न आहेत. हीं नांवें वारली वगैरे लोकांनीं वसाहत करतांना दिलीं असावीं हें एक, किंवा ब्राह्मणादि लोकांनीं दिलीं असावीं हें दुसरें. पैकीं वारल्यांच्या व डोंगरी कोळ्यांच्या प्रांतांत ब्राह्मण व मराठे यांची वसती सध्यां तर मुळींच नाहीं व पूर्वीं हि थोडी देखील असेल असें म्हणवत नाहीं. औषधाला एखाद–दुसरा ब्राह्मण किंवा मराठा ह्या प्रदेशांत प्राचीन काळीं असल्यास असेल. तेव्हां नद्या, डोंगर व गांवं ह्यांना संस्कृत नांवें मूळ दिलीं कोणी हा प्रश्न उद्भवतो. उदाहरणार्थ, कांहीं नांवें येथें देतों:—

## नद्यांचीं नांवें.

१ दमणगंगा नदी
२ काळू नदी
३ वरोळी नदी
४ जोगणी नदी
५ गाउंडा नदी
६ बाणगंगा नदी
७ दूध नदी
८ वळई नदी
९ गोळझरी
१० सूर्या नदी
११ घोघती नदी
१२ कबूर्का नदी
१३ वैतरणा नदी
१४ सर्वर नदी
१५ वांदरी नदी
१६ तानसा नदी
१७ देहर्जी नदी
१८ टांकी नदी
१९ दिंडी नदी
२० कामान नदी
२१ सुपरी नदी
२२ उल्हास नदी
२३ जोमदरी नदी

## ग्राम नामें.

१ दमण ( दामनीयकं )
२ उंबरगांव ( उदुंबरग्राम )
३ फणसें ( पनसीयं )
४ बोरीगाव ( बदरीग्राम )
५ दाभळें ( दर्भपल्लं )
६ शिरगांव ( श्रीग्राम )
७ कुसुंबें ( कौशांबी )
८ महुली ( मधुपल्ली )
९ बौरी ( भौरिकिविधं )
१० साकरा ( शर्करीयं )
३२ माहीम ( मत्स्यमत् )
३३ तारापूर ( तारापुरं )
३४ केळवें ( कदलीवहं )
३५ वाघोली ( व्याघ्रपल्ली )
३६ देवनरें ( देवनगरं )
३७ धारदिवी ( धारद्वीपिका )
३८ मोरवें ( मयूरवहं )
३९ वानरें ( वननरकं )
४० शिवरी (सीमापुरी,शिवपुरी,शाल्मलीपुरी)
४१ नौपाडा ( नौपाटक: )

११ काशीळ ( काशिलं )
१२ वाशीळ ( वाशिलं )
१३ आर ( अरीहणं )
१४ साकशी ( सांकाश्यं )
१५ बळें ( बल्यं )
१६ चुळें ( चुल्यं )
१७ आनिक ( आणकीयं )
१८ साकी ( साखेयं )
१९ पळशी ( पालाशिका )
२० इकटें ( इक्कटिकं )
२१ जव्हार ( यवसाहार प्रेक्षादिगण )
२२ पालें ( पाल्यं सख्यादिगण )
२३ सुपारें ( सौपर्य संकाशादिगण )
२४ नळें ( नल्यं वलादिगण )
२५ दातिवरें ( दात्तामित्रीयं )
२६ इडें पाडळें ( इडकीयं उत्करादिगण )
२७ आंधेरी ( अंधकगिरि )
२८ थळ ( स्थल )
२९ दांडें ( दंडं ऋश्यादिगण )
३० माळवणी ( मल्लवनं )
३१ चिचवळी ( चिंचापल्ली )
४२ तुळशी ( तूलसकिं )
४३ मोगरें ( मुद्गरकं )
४४ कोंडिवली ( कुंडिनपल्ली )
४५ भुईगांव ( भूग्राम )
४६ मरदेश ( मरुदेश )
४७ राजोडी ( राजवाटिका )
४७ कसराळें ( कशेरुपल्लं )
४८ सैवन ( सागवनं )
४९ कामनदुर्ग ( कामवनदुर्ग )
५० नागली ( नागपल्ली )
५१ कावेसर ( कामेश्वर )
५२ दहीसर ( दधीचेश्वर )
५३ धनसर ( धनेश्वर )
५४ नागांव ( नागग्राम )
५५ कुडें ( कूटकं )
५६ गुहिरी ( गुहागिरी )
५७ भोपोली ( बाहुकपल्ली )
५८ बोरिवाडी ( वीरवाटिका )
५९ सालवड ( सालवाटकं )
६० खंबाळें ( स्कंभपल्लं )
६१ रानशेत ( अरण्यक्षेत्रं )
६२ सोनाळें ( सुवर्णपल्लं )

इत्यादि आणीक पांच शें गांवांची यादी देतां येईल. कान्हेरी हें डोंगराचें नांव कृष्णगिरि ह्या संस्कृत शब्दा पासून निघालेलें सर्वांच्या परिचयाचें आहे. तात्पर्य नदीनामें, ग्रामनामें व पर्वतनामें येथूनतेथून सर्व संस्कृत किंवा संस्कृतोत्पन्न प्राकृत आहेत. कांहीं ग्रामनामें जातिनामां वरून पडलीं आहेत तीं अशीं:—

१ माछीवाडा ( मत्स्यकवाटः )
२ महारवाडा ( महारवाटः )
३ मगरवाडा ( मकरवाटः )
४ भिलाड ( भिल्लवाटः )
५ किराट ( किरातवाटः )
६ वारलीवाडा ( वारुडाकिवाटः )
७ ठाकरियापाडा ( तस्करकपाटकः )
८ कर्कुट पाडा ( कर्कुटपाटकः )
९ भोयपाडा ( भौमपाटकः )
१० बर्बराचापाडा ( बर्बरीयपाटकः )
११ मांगेलवाडा ( मांगेलवाटः )
१२ कोळवाडा ( कोलवाटः )
१३ नागपाडा ( नागपाटकः )
१४ बामणवाडी ( ब्राह्मणवाटिका )
१५ आगरवाडी ( आगारिकवाटिका )

हीं सर्व नांवें किंवा ह्यां पैकीं बहुतेक सर्व नांवें मांगेले, वारली, कोळी, वगैरे संस्कृतोत्पन्न प्राकृत भाषा बोलणाऱ्या लोकांनीं मूलतः ठेविलीं असें म्हटल्या खेरीज दुसरी वाट नाहीं. सोपारें, वाळुकेश्वर, ठाणें, कल्याण, दमण, वगैरे किंचित् अपभ्रष्ट किंवा पूर्णपणें संस्कृत नांवें वारली वगैरेंच्या नंतर आलेल्या नल, मौर्य, शिलाहार, दामनीय, इत्यादि पश्चात्क लोकांनीं यद्यपि दिलीं असण्याचा संभव आहे, तत्रापि बाकींचीं बहुतेक सर्व नांवें वारली वगैरे लोकांनीं दिलीं असावीं. सोपारें हें नांव शिलालेखांतून व ताम्रपटांतून शूर्पारक असें नमूद केलेलें आढळतें. परंतु सोपारें ह्या प्राकृत उच्चाराचा हा संस्कृत उद्धार आहे इतकेंच. मूळ नांव सौपर्यम् . सुपरि हा शब्द पाणिनीय संकाशादिगणांत नमूद आहे. तसेंच, शेवलसुपरि ० ( ५-३-८४ ) ह्या पाणिनीय सूत्रांत हि पठित आहे. सुपरिणा निर्वृत्तं नगरं सौपर्यम् . सुपरि नामें कोणी एक व्यक्ति. त्यानें वसविलेलें जें नगर तें सौपर्यम् . सौपर्यम् चा अपभ्रंश सोपरें, सोपारें, सुपारें. कश्याचा अपभ्रंश काय आहे हें न शोधिल्या मुळें सोपारें ह्या शब्दाचें संस्कृत शूर्पारक असें शिलालेख लिहिणाऱ्या व रचणाऱ्या अडाणी लोकांनीं व अर्धवट संस्कृतज्ञांनीं केलें. शूर्पार असा शब्द संस्कृत भाषेंत बिलकुल नाहीं. शूर्प असा शब्द आहे. परंतु अर किंवा आर प्रत्यय शूर्प शब्दाला कोठून लागला आणि कशा करतां लागला हें कोणीं पाहिलें नाहीं व अर्धवट संस्कृतज्ञ पहात हि नाहींत. प्राकृत ग्रामनामांचें असलें धेडगुजरी संस्करण अन्यत्र हि अनेक ठिकाणीं आढळतें. उदाहरणार्थ, जूर्णनगर ( जुन्नर ), शीर्णनगर ( सिन्नर ), विराटनगरं ( वाई ), माहिकावती ( माहीम ), इत्यादि.

३६. दमण, नळें, मोरें, मोरकुरण, केरौली, आंधेरी, इत्यादि ग्रामनामां वरून दिसतें कीं आर्यांच्या किंवा आर्यसमांच्या पहिल्या वसाहती उत्तर कोंकणांत दामनीय, नल, मौर्य, कोरव्य, अंधक, इत्यादि लोकांनीं केल्या. त्यांच्या अगोदर वारली, कोळी, ठाकर हे लोक कोंकणांत येऊन स्थिर झाले होते. नंतर बहुशः आंध्रभृत्यांच्या कारकीर्दींच्या आगें मागें मांगेले आले. कातडी पांघरणारे कातवडी सर्वांच्या आधीं येथें वसती करून आहेत. नागलोक कातवड्यांच्या नंतर व वारलीकोळी ह्यांच्या थोडे अगोदर कोंकणांत आले. ह्या सर्व लोकांची कालानुक्रमानें शेजवार परंपरा येणें प्रमाणें लागेल. कालनिर्देशा वांचून कोणता हि ऐतिहासिक प्रसंग हृत्पट्टिके वर नीट बिंबत नाहीं. करतां अत्यन्त स्थूल मानानें ह्या लोकांच्या आगमनाचा अंदाजी काल देतों. तो शातवाहनांच्या पर्यंत फक्त अंदाजी आहे, नक्की नाहीं, हें लक्ष्यांत ठेवावें.

| लोकनाम | | अंदाजी काल. |
|---|---|---|
| अतिप्राचीन लोक | गुहाशय<br>कातवडी | स्वयंभू शकपूर्व २००० च्या पूर्वी |
| मध्यप्राचीन लोक | नाग<br>वारली<br>कोळी<br>ठाकर | शकपूर्व २०००–१००० |
| अव्यवहित प्राचीन ऊर्फ पाणिनिकालीन व बौद्धकालीन लोक | दामनीय<br>महाराष्ट्रिक | शकपूर्व ९००—३०० |
| | शातवाहन<br>आंध्र<br>मांगेले | शकपूर्व ३००–शकोत्तर २०० |
| | नल<br>मौर्य | शकोत्तर २००—४०० |
| जुने मराठे | त्रैकूटक | शकोत्तर ३००—५०० |
| | शिलाहार | शकोत्तर ७००—११०० |
| | चालुक्य<br>राष्ट्रकूट<br>चालुक्य | शकोत्तर ५००—११०० |
| | बिंब<br>व<br>यादव | शकोत्तर १०६०—११६३ |
| | नागरशादि राजे | शकोत्तर ११६३—१२७० |
| | प्रताप बिंब यादव | शकोत्तर १२१६—१२५४ |
| मुसुलमान | दिल्लीचे मुसुलमान | शकोत्तर १२७०—१३६० |
| | अमदाबादकर सुलतान | शकोत्तर १३६३—१४६० |
| युरोपीयन | पोर्तुगीज | शकोत्तर १४२२-१४३४-१४६० |
| नवे ऊर्फ अर्वाचीन मराठे | मराठे | शकोत्तर १६६०—१७२५ |
| युरोपीयन | इंग्रज | शकोत्तर १७२५—१८४६ |

कातवडी हें शकपूर्व पांच सहा हजार वर्षां पासून आज पर्यंत येथें स्वयंभू आहेत. नाग, वारली, कोळी व ठाकर शकपूर्व दोन हजार पासून पाणिनिकाला पर्यंत हें रान

धरून आहेत. शकपूर्व नऊ शें पासून शकोत्तर चार शें पर्यंत म्हणजे पाणिनीय व बौद्ध कालाच्या ऱ्हासा पर्यंत दामनीय, माहाराष्ट्रिक, आंध्र, मांगेले, नल व मौर्य कोंकणांत शिरले. शक चार शें पासून त्रैकूटक, शिलाहार, चालुक्य, राष्ट्रकूट, यादव, बिंब, नागरशादि राजे, वगैरे जुन्या मराठ्यांनीं शक बारा शें सत्तर पर्यंत आठ शें सत्तर वर्षे राज्य केलें. मुसुलमानांचा अंमल शक बारा शें सत्तर पासून शक चौदा शें साठ पर्यंतचीं दोन शें वर्षें होता. नंतर दोन शें वर्षें पोर्तुगीजांनीं हा प्रांत आक्रमण केला. तदनंतर नव्या मराठ्यांनीं साठ वर्षें स्वराज्य भोगिलें. आणि अलीकडे सवा शें वर्षें इंग्रजाच्या पंजा खालीं उत्तर कोंकण आहे. मुसुल्मानांचीं दोन शें वर्षें, पोर्तुगजिांचीं दोन शें वर्षें व इंग्रजाचीं सवा शें वर्षें मिळून पांच सवापांच शें वर्षें कोंकण परकीय अंमला खालीं खितपत पडलें आहे. जुन्या व नव्या मराठ्यांच्या ताब्यांत उत्तर कोंकण साडे नऊ शें वर्षें होतें आणि -शातवाहननलमौर्यादींच्या अंमला खालीं तेरा शें वर्षें होतें. मिळून साडे बावीस शें वर्षे उत्तर कोंकण हिंदूंच्या अंमला खालीं होतें व सवा पांचशें वर्षें अहिं-दूंच्या अंमला खालीं आहे. कातवड्यांना नागांनीं व वारल्यांनीं रेटलें, नागांना आंध्र मौर्य व महाराष्ट्रिक यांनीं जिंकिलें, ह्यांची जागा शिलाहार, चालुक्य, राष्ट्रकूट व यादव ह्यांनीं घेतली, ह्यांच्या उरा वर मुसुल्मान बसले, मुसुलमानांना पोर्तुगीजांनीं उखाडलें, पोर्तुगीजांना मराठ्यांनीं टांग मारिली व मराठ्यांना इंग्रजांनीं खो दिला. हा खेळ गेल्या तिन हजार वर्षें चालला. येथें असा प्रश्न उद्भवतो कीं नवे नवे सत्ताधिशि पूर्व पूर्व सत्ता धीशांची उचलबांगडी करीत असतां, कातवडी, नाग, महाराष्ट्रिक, जुने मराठे, मुसुल-मान, पोर्तुगीज अस्सल व बाटे, नवे मराठे, हे कोंकणांत कायमची वसती करून राहि-लेले लोक निमूटपणें नव्या सत्तेला कितपत राजी होत गेले व नव्या सत्तेला कित-पत प्रतिरोध करते झाले ? ह्या भानगडीच्या प्रश्नाचें स्थूल उत्तर थोडेंबहुत देण्याचा प्रयत्न प्रस्तुत प्रकरणाला व इतिहासाभ्यासाला उपकारक म्हणून केला असतां वावग होणार नाहीं.

३७ शकपूर्व दोन हजार वर्षां पूर्वीं किती हजार वर्षें कातवडी उत्तरकोंकणांत आहेत त्याचा अंदाज होत नाहीं. हे लोक कधीं हि मछमार नाहींत व नव्हते व समुद्र-किनाऱ्याच्या वाऱ्यास हि हे कधीं उभे राहिले नाहींत. ह्यांची वसती सह्याद्रीच्या रानांत ह्यांच्या समकालीं समुद्रा वर कोण लोक होते तें कळण्यास मार्ग नाहीं. मिसरी व असुर लोकांशीं भरतखंडाचा व्यापार त्या वेळीं म्हणजे शकपूर्व दोन हजार वर्षां पूर्वीं जर कोंक णच्या किनाऱ्या वरील बंदरांच्या द्वारा होत असेल, तर एवढें मात्र निश्चित कीं दमण पासून मुंबईचेऊल पर्यंतच्या वर्तमान बंदरां पैकीं एक हि बंदर व्यापारी पेठेच्या पदवीस त्या कालीं पोहोचल्याचा संशय सुद्धां घेण्यास जागा नाहीं. दमण, सोपारें, वसई, घोडबंदर, ठाणें, कल्याण, हीं बंदरें त्या प्राचीन काला नंतर दोन हजार वर्षांनीं इति-हासप्रांतांत डोकावूं लागलीं. सह्याद्रीच्या माच्यांवर कातवडी वसती करून असतांना, समान्तर समुद्रकिनाऱ्या वर व सह्याद्रीच्या तळरानांत मनुष्याची हालचाल प्रायः नसावी

असा अंदाज आहे. परंतु सह्याद्रीच्या शिखरां खालील कपाऱ्यांत व गुहांत प्राचीन गुहाशय माणसांची तुरळक वसती कातवड्यांच्या माच्यांच्या वरल्या भागास असावी. माच्यां वर कातवडी व डोंगरकपारींत व गुहांत गुहाशय, असा प्रकार कित्येक हजार वर्षे चालला असावा. गुहाशयां हून कातवडी जास्त सुधारलेला. कातवडी कातडीं तरी पांघरी. गुहाशयांना ती हि कला अवगत नव्हती. सध्यां जीं बुद्धांचीं लेणीं सह्याद्रीच्या शिखरां खालीं खोदलेलीं दिसतात तीं गुहाशयांच्या मूळच्या ओबडधोबड स्वभावसिद्ध कपाऱ्यांच्या व गुहांच्या सुधारलेल्या आवृत्त्या आहेत. नागड्या गुहाशयांचा व कातडीं पांघरणाऱ्या कातवड्यांचा कित्येक शतकें शेजार होऊन शेवटीं कातवडी शिल्लक राहिला. सह्याद्रींत दोघांना हि विपुल अन्न होतें. एकानें दुसऱ्यास ठार केलें च पाहिजे असा प्रकार नव्हता. गुहाशय निर्वंश झाल्या वर, कातवड्याच्या शेजाराला नाग, वारली, कोळी व ठाकर लोक आले. त्यांना हि रानांत व किनाऱ्या वर मुबलक अन्न मिळण्या सारखें होतें. तेव्हां कातवड्यांच्या व नागादींच्या लढाया वगैरे न होतां नागादींना हि ह्या प्रदेशांत बिगरअडथळा रहातां येऊं लागलें. नंतर आंध्र, मांगेले व माहाराष्ट्रिक आले. त्यांना हि येथें विपुल अन्न सांपडलें व ते हि ह्या प्रांतांत गुण्यागोविंदानें नांदूं लागले. पुढें चालुक्यादि जुने मराठे आले. ते हि ह्या देशांत समावले. कालान्तरानें मुसुलमान व पोर्तुगीज कोंकणांत शिरले व ते हि सुखानें पोट भरून येथें आहेत. जो जो म्हणून येथें येतो तो तो सुखासमाधानानें देशांत कायमचा बिनबोभाट समावला जातो. ह्याचा अर्थ इतका च कीं, ह्या देशांत उद्भिज्ज व प्राणिज संपत्ति ऊर्फ अन्न इतकें मुबलक आहे कीं येईल त्याला येथें रहाण्यास यथेच्छ वाव आहे.

३८ मुबलक अन्न व यथेच्छ जागा असल्या मुळें, कोंकणांत जीवनार्थ कलह युरोपांतील किंवा मध्यआशियांतलि भुकेबंगाल देशांतल्या प्रमाणें जाज्वल्य नाहीं. संपन्नतेनें आपला वरद हस्त एकट्या कोंकणां वर च ठेविला असें समजूं नये. भरतखंड म्हणून ज्या खंडाला म्हणतात त्या बहुतेक सर्व खंडा वर अन्नपूर्णेची अशी च पूर्ण कृपादृष्टि आहे. ह्या कृपादृष्टीचा परिणाम येथें रहावयास आलेल्या कायमच्या सर्व लोकांच्या स्वभावांत दृष्टीस पडतो. वाटेल त्यानें येथें यावें व थोडीशी खडबड व गडबड करून आपल्याला हवी तशी व मिळेल तशी जागा करून घ्यावी. काळजी एवढी च घ्यावी कीं, दुसऱ्याला आपल्या पासून तोशिस पोहोंचूं नये. एखादा रानटी मोगल किंवा हापापलेला युरोपीयन प्रथम प्रथम बेवकूबपणें मारामाऱ्या व रक्तपात करतो. परंतु वस्तुस्थिति ध्यानांत व अनुभवांत आल्या वर तो हि आस्तेआस्ते निवळत जातो व इतरांच्या प्रमाणें च सालस, निरुपद्रवी व पाहुणचारी बनतो. तात्पर्य, हिंदुस्थानांत माणसाचा स्वभाव अन्नसंपत्तीच्या मुबलक व सहजलभ्य पुरवठ्या मुळें मुक्तद्वारी बनतो पहिली भीड चेपे तों पर्यंत काय घासाघीस होईल तेवढी च. तदनंतर दोन्ही समाज शेजारधर्मानें परंतु तुटकपणें रहातात. तुटकपणाचा हा कल समाजा पुरता च न थांबून

समाजांतील कुटुंबांना व व्यक्तींना हि पछाडतो. कारण समाजाला जसें अन्न अल्पश्रमानें मिळूं शकतें तसेंच कुटुंबांना व व्यक्तींना हि तें तितक्याच किंवा त्याहून हि अल्पतर श्रमानें मिळतें. अन्नाच्या सहजलभ्यते मुळें अन्योन्यावलंबित्व बहुतेक नसल्या सारखें होऊन, सर्व देश पृथक् पृथक् व अन्योन्यस्वतंत्र अशा व्यक्तींचा बनून जातो. व्यक्तिस्वातंत्र्याचा अत्यन्त अतिरेक झालेला जर कोठें पहावयाचा असेल, तर तो हिंदुस्थानांत पहावा. हिंदुस्थानांत शेकडों खेडेगांवें अशीं आहेत कीं त्यांतील बहुतेक सर्व गरजा गांवांतल्या गांवांत भागल्या जातात. तेल, मीठ, बोंबील, गूळ व कपडा ह्यांची बेगमी जवळच्या जत्रेंत करून ठेविली, म्हणजे खेड्यांतल्या कुटुंबाला सगळें जग वर्षभर धाब्या वर बसवितां येतें. येणें प्रमाणें अन्नाच्या वैपुल्यानें हिंदुस्थानांतील माणसांचा स्वभाव जसा मुक्तद्वारी बनतो तसाच अन्नाच्या सौलभ्यानें तो तुटक निपजतो. दुसऱ्याची विशेष पर्वा बाळगण्याची अपेक्षा रहात नाहीं. मुक्तद्वार पडल्या मुळें देशांत वाहेल त्यानें शिरावें आणि स्वभावांत तुटकपणा असल्या मुळें जुटीच्या अभावीं आगंतुक परकीयाला कमींत कमी अडथळा व्हावा, असा ह्या देशांतला मनुष्यस्वभाव आहे. पुढें वाढून ठेविलेलें सुग्रास अन्न टाका आणि परकीय बाह्याला शत्रू समजून त्याशीं लढण्यांत कदाचित् प्राण वेचा, हा खुळसट धंदा हिंदुस्थानांतला शहाणा माणूस सहज च करीत नसे. अशा स्थितींत पृथ्वी वरील कोणी हि माणूस असें च आचरण करता. भारतबाह्य परकीयांना प्राण वेंचून अन्न मिळवावयाचें असे. भारतीयांना प्राण वेंचून हातचें अन्न गमवावयाचें असे. विपुल अन्न आणि सुलभ अन्न हाताशीं तयार असल्या मुळें, हिंदुस्थानांतील माणसांला पोलिसाची म्हणजे सरकार म्हणून ज्या संस्थेला संज्ञा आहे त्या संस्थेची अडगळ फारच थोडी खपे. श्वापदां पासून व चोरचिलटांपासून अन्नाचें संरक्षण करण्याला महार व कुत्रा असला म्हणजे हिंदू गांवाचें काम भागे. पंचायत, महार व कुत्रा ह्या हून जास्त भानगडीचें, भव्य किंवा भयंकर सरकार हिंदू ग्रामसंस्थेला नको असे. गेल्या तीन हजार वर्षांत हिंदुस्थानांत जी देशी व परदेशी सरकारें होऊन गेलीं तीं सर्व एका प्रकारच्या पोटबाबू चोरांचीं झालीं व सरकार म्हणजे एक उपटसुंभ चोरांची टोळी आहे अशी हिंदू गांवकऱ्याची अंतस्थ प्रामाणिक समजूत असे. त्या मुळें सरकाराच्या बऱ्या वाईटा कडे हिंदू गांवकरी स्वतः होऊन बिलकुल लक्ष्य देत नसे. जुनें सरकार मोडो किंवा नवीन सरकार जुडो, त्याचें सुखदुःख गांवकऱ्याला तितपत च असे. अपरिहार्य आपत्ति म्हणून सरकार नांवाच्या चोराचें देणें एकदा कसें तरी देऊन टाकलें म्हणजे वर्षभर पीडा चुकली, इतपत प्रेम सरकार नांवाच्या संस्थे वर गांवकऱ्याचें असे. ह्या भावनेचा असा परिणाम झाला कीं, शातवाहन, जुने मराठे, मुसुल्मान व पोर्तुगीज इत्यादि सरकारांचें जन्म व मृत्यू हिंदू गांवकऱ्यांनीं होतील तसे होऊन दिले. त्यांच्या भानगडींत आपण होऊन ते कधीं पडले नाहींत. जुन्या सरकाराच्या मृत्यू बद्दल गांवकरी कितपत रडले व नव्या सरकाराच्या जन्मा बद्दल गांवकरी कितपत हसले, ह्या प्रश्नाची ऐतिहासिक व मानसिक विवेचना ही असल्या मासल्याची आहे. हिंदू गांवकऱ्याची

राष्ट्रसिद्ध, परिस्थितिसिद्ध व अन्नसिद्ध मनोरचना इतकी मुक्तद्वारी, तुटक व स्वयंपूर्ण बनलेली असे कीं देशी किंवा परदेशी कोणतें च सरकार त्याला मना पासून नको असे.

३९ सरकार नांवाच्या कृत्रिम, उपटसुंभ, चोरट्या व जुलमी संस्थे संबंधानें गांवकरी जर इतका पराकाष्ठेचा उदासीन असे, तर असा प्रश्न उत्पन्न होतो की, येणारें नवें सरकार व जाणारें जुनें सरकार ह्यांच्या मधील युद्धें, तंटे, मारामाऱ्या व झटापटी कोण खेळे ? हिंदुस्थानचा राजकीय इतिहास ऊर्फ सरकारांचा इतिहास तर अथ पासून इतिपर्यंत मारामाऱ्यांनीं तुडुंब भरलेला आहे. ह्या मारामाऱ्या कोण करी ? मृत सरकारा बद्दल कोण रडे ? आणि नव्या सरकाराची जयंती कोण करी ? ह्या प्रश्नाचें उत्तर असें आहे कीं, ज्या मूठभर उपटसुंभांनीं सरकार स्थापिलें ते मूठभर लोक जुन्या सरकाराच्या वतीनें नव्या सरकाराशीं झुंजत, तंडत व पराभूत झाले असतां रडत आणि विजयी झाले असतां खिदळत. हिंदुस्थानांत सरकार ही संस्था सदा कांहीं अत्यल्पसंख्याकांची असे, सार्वलौकिक कधीं हि नसे. एवढें मोठें मोंगलांचें साम्राज्य; परंतु त्यांतील मुख्य घटकावयांची संख्या राजघराण्यांतील पुरुषांच्या संख्ये हून म्हणजे पांच पंचवीस राजपुरुषां हून जास्त नसे, कमाल ओढाताण केली तर साम्राज्यांतील मुलकी व लष्करी सुभे व नायबसुभे मिळून दीड दोन हजारां हून जास्त नसे. हे दीड दोन हजार लोक मोगल साम्राज्या करितां लढत, तंडत, मरत व रडत. बाकीच्या कोट्यवधि हिंदवासीयांना मोंगल, मराठा, पोर्तुगीज इत्यादि सर्व एका च दर्जाचे चोर भासत. तात्पर्य, हिंदुस्थानांत होऊन गेलेली सर्व सरकारें मूठभर अल्पसंख्याकांची आहेत व ह्या मूठभर अल्पसंख्याकांचें सरकार त्यांच्या च सारख्या इतर मूठभर परंतु समबल किंवा वरचढबल अल्पसंख्याक सरकाराच्या ऊर्फ टोळीच्या हातून नाश पावतें. त्यांत गांवकऱ्याचा हात शपथेला सुद्धां नसतो. एतत्संबंधानें अनेक ऐतिहासिक उदाहरणांतून एक अत्यन्त ठळक असें उदाहरण येथें नमूद करतों व तें मराठ्यांच्या इतिहासांतलें घेतों. शिवकालीं मराठे व मुसुलमान ह्यांच्या मध्यें घनघोर झगडा सुरू होता, अशी भाषा वापरलेली सामान्य इतिहासांतून आढळते. त्या भाषेंत कितपत तथ्य आहे तें पाहूं. शिवाजीच्या बाजूला एकोन एक सर्व मराठे होते असें म्हणतां येत नाहीं. महाराष्ट्रांतील सर्व मराठ्यां पैकीं शेंकडा नव्वद मराठे अवरंगझेबाचें प्रजाजन होते व त्यां पैकीं कांहीं त्याचे सैनिक होते. मुसुलमानां पैकीं शेंकडों लोक शिवाजीचे प्रजाजन होते व कांहीं त्याच्या सैन्यांत होते. तेव्हां शिवाजी व अवरंगझेब यांच्यांत जीं युद्धें झालीं त्यांना मराठे व मुसुल्मान ह्या दोन लोकां मधील युद्धें म्हणणें इतिहासाला धरून नाहीं. हीं लोकां लोकां मधील युद्धें नव्हतीं. हीं दोन्हीं बाजूच्या अल्पसंख्याक राज्यकर्त्यांचीं म्हणजे सरकारांची युद्धें होतीं. सामान्य गांवकरी ह्या दोघां हि कडे ढुंकून सुद्धां पहात नसे. तो केवळ उदासीन असल्या मुळें, त्याची संमती घेण्याच्या किंवा त्याचें औदासीन्य घालविण्याचा किंवा त्याला शिक्षण देण्याचा किंवा त्याला राजकीय उपदेश पाजण्याचा खटाटोप करण्याची जरूर नव्हती. त्याला सरकारें

बनविण्याची गरज भासत नसल्या मुळें, कोणत्या हि पक्षाच्या वतीनें युद्धाच्या नाटकांत तो सोंग घेईल ही आशा च करावयाला नको होती. ही बाब शिवाजी व अवरंगझेब दोघे हि जाणून होते. भाषा मात्र दोघे हि अघळपघळ वापरीत. धर्मा करितां, देशा करितां, लोककल्याणा करितां लढावयाचें व शत्रूचा निःपात करावयाचा अशी भाषा दोघे हि योजीत. त्या भाषेंतील तथ्य एवढें च असे कीं शिवाजी ह्या व्यक्तीला ठार करण्यास अवरंगझेब प्रयत्न करी व अवरंगझेब ह्या व्यक्तीचा प्राण घेण्या करितां शिवाजी टपून बसे. पुढाऱ्याची उत्सवमूर्त्ति व तिचे हजार पांचशें प्रमुख सरदार उड-विले म्हणजे दौलत गारत झाली, ही बाब दोघे हि जाणून होते. एकमेकांचा प्राण घेण्याचे दोघांचे असे डावपेंच चालले असतां, शिवाजीच्या मनांत अवरंगझेबाला उड-विण्याची व पातशाही काबीज करण्याची एक अचाट परंतु सर्वथा व्यवहार्य कल्पना आली. अवरंगझेब स्वतः जातीनें दक्षिणेस फार वर्षे आला नव्हता व पुढें हि कित्येक वर्षे येण्याचा संभव नव्हता. अवरंगझेबाला उचलावयाचें म्हणजे तो स्वतः दक्षिणेंत आला पाहिजे किंवा शिवाजीनें तरी उत्तरेस आग्ऱ्याला गेलें पाहिजे. पहिला मार्ग नाहीं; तर शिवाजीनें दुसरा मार्ग पतकरिला. कसें तरी करून खुद्द आग्ऱ्यास जावयाचें व तेथें अवरंगझेबाचा म्हणजे त्याच्या पातशाहीचा कबजा घ्यावयाचा असा बेत शिवाजीनें केला आणि तो बेत अत्यन्त शिताफीनें अमलांत येण्याच्या मार्गास लाविला. शाहिस्ते-खानादि अनेक मुसुलमान सरदारांना खडे चारणारा शिवाजी जयसिंगा पुढें दातीं तृण धरून केवळ गाय झाला. इतका गाय झाला कीं जयसिंग सांगेल तें करण्यास तो राजी झाला. जयसिंग तोंडांतून शब्द काढण्याचा अवकाश कीं शिवाजीनें त्या प्रमाणें केलें च म्हणून समजावें. किल्ले द्या म्हटल्या बरोबर जयसिंगाच्या स्वाधीन शिवाजीनें किल्ले केले. हात बांधून भेटावयाला या म्हटल्या बरोबर शिवाजी बंदा गुलाम म्हणून जयसिंगाच्या तंबूंत गेला. भिकार पंचहजारी व्हा म्हटल्या बरोबर सगळ्या जगाला पालाण घालणारा तो महावीर क्षुद्र पातशाही सरदार बनला. आणि आग्ऱ्यास चला म्हटल्या बरोबर पातशाहाला आदबीनें कुरनीस करण्या करतां, शिवाजी आग्ऱ्यास निघाला. जयसिंगानें हा शेवटला हुकूम करावा व तो आपण क्षणाचा हि विलंब न लावतां ताबड-तोब अमलांत आणावा ह्या च पर्वणीची वाट शिवाजी चातका प्रमाणें पहात होता. अव-रंगझेबाची प्रत्यक्ष व समक्षासमक्ष भेट होण्याचा व भेटीच्या प्रसंगीं पातशाहत व पात-शाहा गारत करण्याचा हा कधीं न येणारा कपिलाषष्ठीचा योग शिवाजीनें लग्नमुहूर्ता प्रमाणें उत्सुकतेनें साधिला. अवरंगझेबाच्या खुद्द मामाचीं बोटें छाटणारा व मामाच्या पोराचा जीव घेणारा शिवाजी पातशाहाला कुर्निसा करावयाला निघालेला पाहून संन्यास घेत-लेल्या लांडग्याची आठवण जयसिंगाला व्हावयाला हवी होती. परंतु, तसा कांहींएक प्रकार न होतां खुळ्या जयसिंगाला आपण बडी पातशाही कामगिरी बजावीत आहों अशी फुशारकी वाटली. हें च शिवाजीला हवें होतें. शिवाजीनें लीनतेचें सोंग इतकें कांहीं बेमालूम आणिलें कीं शिवाजीला आपण नरम केला अश्या वल्गना जयसिंग बड-

बढूं लागला. दिल्लीन्द्राचें पद पटकविण्याची ईर्ष्या शिवाजी आजन्म बाळगीत होता, हें हिंदुस्थानांतील मुत्सद्दी जाणत होते व जयसिंगाच्या हि काना वर गेलें नव्हतें असें नव्हतें. शिवप्रभृतिभूपालाः दिल्लीन्द्रपदलिप्सवः असें शिवाजीचें वर्णन जयसिंगाचा प्रशस्तिकार करण्या इतकी जगजाहीर ही आकांक्षा झाली होती. तत्रापि शिवाजीची हड्डी आपण मोकळी केली अशी फुशारकी जयसिंग मारित च होता व स्वतःच्या मामाचा हात तोडणाऱ्या व मामाच्या मुलाचा वध करणाऱ्या आततायाची भेट घेण्यास अवरंगझेब सिद्ध झाला होता. जखमे वर फुंकर घालणाऱ्या शिवाजीनें अवरंगझेबाला ही जी भुरळ पाडली ती पाहून तत्कालीन शहाण्यांनीं तोंडांत बोटें घातलीं असतील ह्यांत संशय नाहीं. शिवाजी अवरंगझेबाला स्नेहालिंगन देण्यास केडेकोट बंदोबस्त करून निघाला. बरोबर हजार पांचशें करोल व जातिवंत सरदार जीवाचे जीवलग व छातीचे निवडे असे त्यानें घेतले आणि मजल दर मजल दहा दहा पांच पांच माणसें ठेवीत ठेवीत आग्र्यांतील व्याघ्राच्या गुहेंत सरज्यानें प्रवेश केला. प्रथम भेटीच्या प्रसंगीं कुरनीस करण्याच्या वेळीं पातशाहाची व आपली जी लगट होईल त्या लगटींत सिंहासना वर उडी मारून पातशाहाचा निकाल लावावा आणि दरबारांत जमा झालेल्या उमरावांची कत्तल करून तेथल्या तेथें हिंदुपदपातशाहीची स्थापना करावी आणि सरहद्दी वर जय्यत ठेविलेल्या सैन्याच्या जोरा वर व धाका वर ती पातशाही स्थिर करावी असा शिवाजीचा बूट होता. चंद्रराव, अफजलखान, शाहिस्तेखान, इत्यादींचा फडशा शिवाजीनें असा च पाडला होता. तें च दूरदृष्टिमिश्रित अघटित साहस ह्या प्रसंगीं फलद्रूपतेस आणण्याचा शिवाजीचा आशय होता. परंतु, शिवाजीच्या बारशास जेवलेल्या अवरंगझेबाला त्याचें दैव थोर म्हणून दरबारांत शिवाजीला आपल्या पासून शंभर हात दूर उभें करण्याची बुद्धि आयत्या वेळीं झाली म्हणून निभावलें; नाहीं पक्षीं, चकत्यांच्या पातशाहीचा रामबोलो त्या च समयीं होण्याचा प्रसंग बहुतेक टपल्या सारखा च होता. खुद्द पातशाहा व त्याचे हजार पाच शें सरदार उडविल्या वर, मुक्तद्वारीं, तुटक व सुखाची भाकर खाण्यास चटकलेले हिंदुमुसुलमान प्रजाजन शिवाजीची पातशाहात निमूटपणें बिनतक्रार चालू देते, ही खूणगांठ शिवाजीनें पक्की बांधून ठेविलेली होती. तात्पर्य, राज्ययंत्राच्या व राज्यकर्त्यांच्या बऱ्या वाईटा कडे विपुल व सुलभ अन्न मिळणाऱ्या हिंदवासीयांचे बिलकुल लक्ष्य नसे. उघड च झालें कीं ह्या देशांत ज्याला राज्य आक्रमण करावयाचें असे त्याला तें मिळविण्या साठीं सामान्य लोकांची मनधरणी करण्याची जरूर पडत नसे, राज्ययंत्रचालकांच्या लहान कंपूची वासलात लाविल्यानें त्याचें काम बेश साधे.

**४०** सामान्य लोक राज्ययंत्रा कडे बिलकुल लक्ष्य कां देत नसत ह्या बाबीची ही अशी मीमांसा आहे. अन्नवैपुल्य व अन्नसौलभ्य हें ह्या उदासीन वृत्तीचें कारण असे. ही उदासीन वृत्ति व हा तुटकपणा जसा राजकारणक्षेत्रांत भासमान होई, तसाच तो समाज, वेदान्त, धर्म, भक्ति, संसार, सारस्वत, व्यापार व देव इत्यादि क्षेत्रांत हि वावरतांना आढळे. जातिसंस्था व वर्णसंस्था ह्या देशांत मूळ उत्पन्न होण्याचीं जीं

अनेक कारणें आहेत, त्यांत अन्नवैपुल्याचें व अन्नसौलभ्याचें कारण बरेंच प्रमुख आहे. प्रत्येक जातीनें आपापलें अन्न आपापला धंदा करून तुटकपणें सुखानें खावें. प्रत्येक माणसानें आपापला पृथक् देव करून खुशाल तदेकभक्त व्हावें. प्रत्येक माणसानें समाजा पासून विलग होऊन सन्यस्त होण्यांत परमपुरुषार्थ मानावा. इत्यादि सर्व स्थानीं उदासीन वृत्तींचा पाया भक्कम रोविलेला दिसे. उदासीन, सन्यस्त, तुटक, मुक्तद्वारी अश्या व्यक्तींनीं जर हा देश व्यापिलेला असे, तर ह्या सर्व व्यक्ती मिळून समाज म्हणून ज्या संस्थेस नांव आहे ती संस्था कितपत बने ? समाज हें नांव हिंदुस्थानांतील व उत्तर कोंकणांतील तत्कालीन लोकांना कितपत लागू पडे ? तत्कालीन हिंदी लोक एक भरींव समाज होते काय ? ह्या प्रश्नाला उत्तर द्यावयाचें म्हणजे समाज ह्या अर्थाची व्याख्या सांगितली पाहिजे. कांहीं एका अर्थाच्या सिद्ध्यर्थ अन्योन्योपकारक व्यक्तींचा जो सहकारी समवाय तो समाज, अशी व्याख्या केल्यास, उत्तर कोंकणांतील तत्कालीन मनुष्यसमूहाची समाजत्वा संबंधानें परीक्षा करण्यास सोपें जाईल. तत्कालीन म्हणजे शालिवाहनशकाच्या सोळाव्या शतका पर्यंतचा जो काल त्या काळांतील, असा अर्थ विवेचनसुखार्थ घेऊं. त्या कालीं उत्तर कोंकणांत वन्य, यहुदी, मुसुल्मान, ख्रिस्ती, पारशी, अंत्यज, शूद्र, वैश्य, क्षत्रिय व ब्राह्मण असे दहा प्रकारचे लोक कायमची वस्ती करून असत. देवधर्मदृष्ट्या पाहिलें तर वन्य, यहुदी, मुस्लीम, ख्रिस्ती, पारशी व हिंदू असे सहा गट असत. ह्या सहा गटांत हिंदूंची संख्या अधिकतम असे. हे सहा हि गट अन्योन्योपकारक म्हणण्या पेक्षां अन्योन्यापकारक जरी नव्हत तरी अनेक बाबतींत अन्योन्योदासीन असत. एका बाबींत, मात्र, हे सहा हि गट अन्योन्योपकारक होते असें म्हणतां येण्या सारखें आहे. ती बाब म्हणजे दोनप्रहरच्या अन्नाची. सहा ही गट परस्परांत कोणत्या नाहीं कोणत्या तरी रूपानें अन्नविनिमय करीत. कातकरी करवंदें, तोरणें व फाटीं विकी; यहुदी तेल पुरवी; मुसुल्मान आफ्रिका, मलबार व अरबस्थान ह्या देशांत भाताची वगैरे नेआण करी; ख्रिस्ती बाट्या शेती पिकवी; आणि पारशी आधेंमधें कोठें तरी लुडबुड करून दैन्यवाणें पोट भरी. अहिंदू पैकीं बाकी राहिला यूरोपीयन ख्रिस्ती जो पोर्तुगीज तो. त्याचें एक च एक काम राज्ययंत्र हाकून अन्नशोषण करण्याचें. हिंदूंना किंवा अहिंदूंना पोर्तुगीजाच्या राज्ययंत्राची बिलकुल जरूर नसे. त्याच्या यंत्रा खेरीज ते आपला बचाव व संरक्षण महार व कुत्रा ह्यांच्या द्वारा चोरांचिलटां पासून व पशूंपाखरां पासून करण्यास पूर्ण समर्थ होते. पोर्तुगीजांच्या धाडी पासून मात्र बचाव करण्याचें मानस त्यांच्या ठाई नव्हतें. कारण हिंदू व अहिंदू असे सर्व लोक मुक्तद्वारीं, तुटक व उदासीन असत. करतां, स्वतःच्या धाडी पासून हिंदूंचा व अहिंदूंचा बचाव करण्याकरितां पोर्तुगीज लोक जबरदस्तीनें राज्ययंत्र चालवीत, म्हणजे दुसरें तिसरें कांहींएक करीत नसत, करांच्या रूपानें लोकां पासून अन्न व पैसा उकळीत, अथवा स्पष्ट सांगावयाचें म्हणजे हिंदू व अहिंदू ह्यांच्या कष्टा वर चरत. परोपजीवी अश्या ह्या पोर्तुगीजांचा वर्ग सोडला, म्हणजे बाकी राहिलेले सर्व लोक अन्नोत्पादनाच्या बाबतींत एकमे-

कांचें साहाय्य करीत. तात्पर्य, फक्त अन्नोत्पादनाच्या दृष्टीनें कोंकणांतील ह्या दहा हि सहकारी जातींना एकसमाज म्हटलें असतां चालण्या जोगें आहे. इतर सर्व दृष्टींनीं प्रजोत्पादन, विद्योत्पादन, कलोत्पादन, मोक्षोत्पादन, राष्ट्रोत्पादन, वगैरे इतर व्यवसायांत हे गट स्वयंस्फूर्तीनें अन्योन्यसाहाय्य करीत नसत, अथवा खरें म्हटलें असतां करण्याच्या स्थितींत नसत.

४१ कातवडी, यहुदी, मुसुलमान, पारशी, ख्रिस्ती व हिंदू हे सर्व गट आचारानें, व्यवहारानें, प्रायश्चित्तानें, विद्येनें, देवधर्मानें, अथवा संकलित भाषेनें बोलावयाचें म्हणजे संस्कृतीनें इतके कांहीं विसदृश होतें कीं ह्या सर्वांचा थोड्या काळांत म्हणजे हजार दोन हजार वर्षांत एकजीव होणें अशक्यांतलें होतें. कातवडी जेव्हां सह्याद्रीच्या माच्यां वर एकटा च रहिवासी होता तेव्हां तो त्या वनींचा एकमेव अद्वितीय राजा होता. पुढें कोळी, वारली, ठाकर, मांगेले वगैरे जास्त सुधारलेले लोक आले. ते आचारादींनीं भिन्न पडल्या मुळें कातवड्यांत शरीरसंबंधानें मिसळून गेले नाहींत, अगदीं पृथक् राहिले. म्हणजे महाराष्ट्रिकादि चातुर्वर्णी लोक उत्तरकोंकणांत येण्या पूर्वीं च येथें अन्योन्यशरीर-संबंधव्यावृत्त अश्या जाती निर्माण होऊन गेल्या. नाग लोक आले त्यांत क्षत्रिय नाग व महार नाग अश्या दोन जाती होल्या. नंतर महाराष्ट्रिक आले. त्यांच्यांत चातुर्वर्ण्य असून, शिवाय सुतार लोहार इत्यादि जाती होल्या. यहुदी व पारशी आले. त्यांच्या हि ह्या जातिबद्ध समाजांत शरीरसंबंधव्यावृत्त जाती बनून गेल्या. शेवटीं मुसुलमान व ख्रिस्ती आले. ते हि ह्या जातिबद्ध समाजांत जातिरूपस्थ होऊन बसले. जाति-रूपस्थ होऊन बसल्या मुळें, अन्योन्य बेटीव्यवहार म्हणजे प्रजोत्पादनाच्या कामीं सहकार ह्या निरनिराळ्या गटांत होणें अशक्य झालें. आणि कधींकाळीं हे सर्व गट मिळून एक भरींव सजातीय समाज होणें प्रायः असंभाव्य होऊन बसलें. एकटा देवधर्म घेतला आणि त्या दृष्टीनें ह्या गटां कडे पाहूं गेलें तर, कातकरी पिशाचपूजक होता, यहूदी मुसुलमान व ख्रिस्ती मनुष्याकार एक देवपूजक होते, पारशी अग्निपूजक ऊर्फ पंचभूतां पैकीं एका भूताचा पूजक होता, आणि हिंदू पशुपक्षिमनुष्याकार अनेकदेवपूजक असून शिवाय अग्न्यादिपंचभूतें, पिशाचें, एकदेव, झाडें व दगड, ह्यांचा भक्त होता, इतकें च नव्हें तर स्वतःच देव, ईश्वर व ब्रह्म हि होता. देव एक आहे हें जितकें खरें तितकें च ते कोट्यवधि आहेत हें हि खरें असल्या मुळें, म्हणजे दोन्ही कल्पना केवळ बागुलबोवा प्रमाणें असत्य असल्या मुळें, कातकरी, यहुदी, मुसुलमान, पारशी, ख्रिस्ती व हिंदू हे सारे च अनेक निराधार व अवास्तव कल्पनांच्या पाठी मागें धांवत होते व आपापल्या कल्पनांचा अनिवार उपभोग घेण्यांत सौख्य मानीत होते. अश्या ह्या नाना प्रकारच्या देवकल्पनांनीं पछाडलेल्या गटांचा एक भरींव समरस समाज बनवावयाला एक च तोडगा होता. तो हा कीं, ह्या सर्वांच्या डोक्यांतील निराधार व अशास्त्र अशी जी देवकल्पना ती च मुद्दलांत उपटून काढली पाहिजे होती, निदान एकसमाजत्वा प्रीत्यर्थ ह्या देवकल्पनेला व देवधर्माला गबाळांत गणून इतर राजकीय, वैय्यापारिक व शास्त्रीय

व्यवहारांत तिला नितांत गौणत्व दिलें पाहिजे होतें. तें जो पर्यंत झालें नव्हतें, तों पर्यंत हे सहा हि गट एकसमाजत्वाला उपकारक होण्याची आशा नव्हती. देवकल्पनेचें असत्य युग पांच चार हजार वर्षें चालून समाप्तीस येण्याच्या रंगांत आहे हें ह्या देवभोळ्या लोकांच्या अद्याप लक्ष्यांत आलें नव्हतें. एकट्या अद्वैतवेदान्त्यानें तेवढें देवकल्पनेला लाथाडलें होतें, परंतु अद्वैतवेदान्त्यांची चिमकुली संख्या देवभोळ्यांच्या प्रचंड संख्येच्या पासंगाला हि पुरेशी नव्हती.

**४२** उत्तरकोंकणांतील हे लोक देव, वंश व जाति ह्या तीन कादंबऱ्यांचें बेसुमार पान करून झिंगल्या कारणानें, त्यांच्यांत एकसमाजत्वाचा प्रादुर्भाव होणें जितकें अशक्य होतें तितकें च एकराज्यत्वाचा उदय होणें असंभाव्य होतें. कातवड्याला प्राचीन कालीं राजा, राज्य व राष्ट्र हे शब्द देखील अपरिचित होते. आर्यांच्या संसर्गानें तो पुढें आपल्याला वनचा राजा म्हणूं लागला इतकें च. राजा हा शब्द कातवड्याच्या मूळ भाषेंतील अनार्य नाहीं. यहुदी व पारशी हे इतके पराकाष्ठेचे दुर्बल, पंगू व भुकेबंगाल होते कीं राजा हा अर्थ यद्यपि त्यांना अवगत होता तत्रापि त्या अर्थाचा साक्षात्कार करून दाखविण्याची धमक उत्तरकोंकणांत ते कधीं दाखवितील अशी कल्पना हि संभाव्य कोटींतील नव्हती. बाकी राहिले मराठे, मुसुलमान व पोर्तुगीज. हे तिघे हि बाहेरून उत्तरकोंकणांत प्रवेश करून, मुक्तद्वारी व तुटक अश्या विपुलान्न व सुलभान्न लोकांत येऊन त्यांना जिची यत्किंचित् जरूर नव्हती त्या राज्यसंस्थेची ऊर्फ सरकारची स्थापना जबरदस्तीनें स्वार्थासाठीं म्हणजे स्वतःचें पोट जाळण्या साठीं करिते झाले, आणि राज्यस्थापने नंतर देशांतील इतर लोकां प्रमाणें अन्नवैपुल्या मुळें व अन्नसौलभ्या मुळें मुक्तद्वारी, तुटक, उदासीन व राजकारणविमुख बनले. हिंदूंतील क्षत्रिय व ब्राह्मण ह्यांचा तर राजा, राज्य व राष्ट्र ह्या तीन शब्दांचा घोष वेदकाला पासून चालू आहे. जेथें जातील तेथें राष्ट्र उत्पन्न करण्याचा ब्राह्मणक्षत्रियांचा मोठा हव्यास. ऋग्वेद, यजुर्वेद, अथर्ववेद व त्यांचीं ब्राह्मणें ह्यांच्यांत राजा, राज्य, राष्ट्र, साम्राज्य, बृहद्राज्य, एकराट्, विराट्, गणराट्, अधिराट्, इत्यादि राजकीय शब्दांची रेलचेल पाहिली व राज्यविषयक प्रार्थना पाहिल्या म्हणजे राजा व राष्ट्र हे अर्थ ब्राह्मणक्षत्रियांच्या हाडींमाशीं किती खिळले होते त्याची कल्पना होते. असे हे ब्राह्मणक्षत्रिय सुद्धां उत्तरकोंकणांतील विपुलान्न हवेंत इतर लोकांच्या प्रमाणें च राजसंस्थोदासीन होऊन बसले. ते इतके कीं आफ्रिकेंतील अर्ध रानटी शामळ व मध्यआशियांतील उनाड मोंगल ह्यांनीं अधाशीपणें राज्ययंत्र पटकाविलें असतां तुडुंब पोट भरलेल्या ब्राह्मणक्षत्रियांनीं तिकडे कानाडोळा केला. मुसुलमानांनीं हि पोर्तुगीजां पुढें तो च कित्ता गिरविला. पुढें पोर्तुगीजांची व त्यांच्या बाट्यांची पाळी आली तेव्हां चित्पावनां पुढें बाट्ये तर पहिले छूट वठणीस आले. परंतु पोट न भरलेल्या अस्सल पोर्तुगीजांनीं मात्र प्रिय अन्नाला चिकटून रहाण्याचा हट्ट प्राण जाई तों पर्यंत मुंग्या प्रमाणें धरिला. अन्नसंपन्न उत्तरकोंकणांत राजा, राज्य, राष्ट्र व राज्ययंत्र एतत्संबंधानें माणूस उदासीन कां व कसें होतें त्याचा हा असा इतिहास व

हिशेब आहे. राज्ययंत्राची येथें फारशी जरूर च नाहीं. उत्तरकोंकणचा हा दाखला सबंद भारतवर्षाला खुशाल लावावा. राष्ट्र, राष्ट्र, राष्ट्र म्हणून वेदघोष करणारे अन्नतृप्त ब्राह्मणक्षत्रिय जेथें राष्ट्रविन्मुख व समाजसन्यस्त होण्यांत भूषण मानूं लागले, तेथें मुदलांत च नको असलेलें राज्ययंत्र चालविण्याचे काबाडकष्ट भुकेबंगाल पोर्तुगीजादि यूरोपीयन लोक व आरब, अफगान, मोंगल वगैरे आशियाटिक लोक च फक्त करूं इछीत. तदितरांना हा खटाटोप निरर्थक भासे. राष्ट्र व एकराष्ट्र हा अर्थ ह्या अन्नसंपन्न देशांत रुजण्या सारखा व आवश्यक भासण्या सारखा नसे. राष्ट्र होण्याची ज्यांना जरूर नव्हती त्यांना एकसमाज हि होण्याची आवश्यकता नव्हती हें सांगावयाला नको च.

. ४३ सामान्यत: सर्वसाधारण लोकांना जबरदस्त व भपकेबाज किंवा सालस व शिष्ट अश्या कोणत्या हि सरकाराची, राज्ययंत्राची व राष्ट्रत्वाची जरूरी यत्किंचित् हि भासत नव्हती हें जरी खरें आहे; तत्रापि भारतवर्षांत सदा असा एक अल्पसंख्याक वर्ग वेळोवेळीं विद्यमान असे कीं त्याला राष्ट्रत्वाची व राज्ययंत्राची मालकी आपल्या हातांत राखण्याची आवश्यकता उत्कटत्वानें भासे. हा अल्पसंख्याक वर्ग म्हणजे ज्यांच्या हातचें राज्ययंत्र नवीन आलेल्या राज्यकर्त्यांनीं काढून घेतलें त्यांचा व नवीन आलेल्या राज्यकर्त्यांच्या हातचें राज्ययंत्र स्वहस्तगत करूं इच्छिणाऱ्या देशी किंवा विदेशी बुभुक्षितांचा. नामोहरम झालेले पूर्वींच्या राशियतींतील असंतुष्ट लोक व ताज्या दमानें राज्ययंत्र बळकविण्याची इच्छा करणारे नवीन बुभुक्षित लोक हिंदुस्थानांतील राजकारणाचा धागा गेल्या तीन हजार वर्षें बिनतूट चालवीत आलेले आहेत. तत्रापि हे हि बुभुक्षित लोक अन्नसंतृप्त होऊन अल्पावधीनें मुक्तद्वारी, तुटक, संन्यस्त व उदासीन नत. हे भारतबाह्य व भारतांतर्गत बुभुक्षित व असंतुष्ट लोक जर नसते तर राजकारण हा पदार्थ हिंदुस्थानांत औषधाला हि न मिळता. ज्यांनीं ज्यांनीं म्हणून राज्ययंत्राचें ओझें अन्ना करितां आपल्या शिरा वर घेतलें ते ते एकोनएक लोक अन्नसंतृप्त होऊन शिरा वरील ओझें खालीं ठेवण्याला उत्सुक झालेले दिसले आहेत. तारुण्यांत राज्यभार वाहणारा जनकराजा वार्धक्यांत वेदान्ताचीं प्रवचनें करतांना दृष्टीस पडतो. तारुण्याच्या पहिल्या तडफेंत रक्तपात व लांडीलबाडी करून राज्य आक्रमणाऱ्या चंद्रगुप्ताचा मुलगा जो अशोकराजा तो भर तारुण्यांत अहिंसेची शपथ घेतो. खुनांचा सडा पाडणारा अवरंगझेब कुराणाच्या नकला करून व रमजानचे उपास करून पापनिर्मुक्त होण्याची खटपट करतो. सर्व हिंदुस्थान भर हुतूतू घालणाऱ्या पहिल्या बाजीरावाचा नातू जो दुसरा बाजीराव तो राज्यभाराची दगदग विसरण्या करितां स्नानसंध्येंत विश्रांति घेण्याचा रस्ता धरतो. आणि पूर्ववयांत राजकारणीं दंग झालेला महादजी शिंदा उत्तरवयांत रडके अभंग रचीत बसतो. ह्या सर्व दाखल्यांचा अर्थ इतका च कीं हिंदुस्थानांत राजकारण, तदंगभूत मारामाऱ्या व राज्ययंत्र ह्यांची वास्तविक जरूरी नव्हती. कृत्रिमपणें राज्ययंत्र निर्माण करतांना व मारामाऱ्यांत दंग होतांना कांहीं अर्धपोटी अल्पसंख्याक लोक हिंदुस्थानांत दिसत. परंतु

बाकीच्या सर्व अन्नसंतृप्त लोकांस त्यांच्या ह्या धांगडधिंग्याचा व रानटीपणाचा पूर्ण तिटकारा वाटे. एका च वाक्यांत सांगावयाचें म्हणजे हिंदुस्थानांत इतकें मुबलक अन्न असे कीं येथें तल्लब्ध्यर्थ राज्ययंत्र, राष्ट्र, मारामाऱ्या व मुत्सद्दीगिरी पैदा करण्याची जरुरी नसे. सर्वसामान्य लोकांच्या दृष्टीनें येईल त्याला येथें मुक्तद्वार असे, मज्जाव नसे. मज्जाव, अडथळा व प्रतिबंध जो होई तो अल्पसंख्याक भुकेबंगाल राज्यकर्त्यां कडून होई.

४४ येणें प्रमाणें उत्तरकोंकणांतील हिंदी लोक ऊर्फ कायमची वसती करून राहिलेले नाना वंशांचे, नाना वर्णांचे, नाना देवधर्मांचे, नाना आचारांचे व नाना भाषांचे सर्व लोक जे इतके राजकारणपराङ्मुख, राष्ट्रपराङ्मुख, समाजपराङ्मुख, मुक्तद्वारी, तुटक, संन्यस्त व व्यक्तितंत्र दिसतात त्याचें एक च एक आदिमूळ आर्थिक आहे. अन्नाचें वैपुल्य व सौलभ्य हें ह्या एकसमाजविन्मुखतेचें कारण आहे. अश्या परिस्थितींत मानवांचा कोणता हि वंश अशा च स्वभावाचा बनला असता. पश्चिम यूरोपांतील ख्रिस्ती लोक बद्धद्वार, एकजूट, समाजनिष्ठ व राष्ट्रनिष्ठ जे दिसतात त्याचें हि मूळ व मुख्य कारण आर्थिक च आहे. अन्नाचें दौर्भिक्ष्य व दौर्लभ्य हें ह्या एकसमाजसन्मुखतेचें कारण आहे. संघविहीन लोकां वर घाला घालून अन्न मिळविण्या करितां एकसंघ व एकसमाज केल्या विना त्यांना तरुणोपाय नव्हता. ह्या वरून असें विधान करणें शक्य होतें कीं उत्तरकोंकणांतील व हिंदुस्थानांतील समाजपराङ्मुख व राष्ट्रपराङ्मुख लोकांना एकसमाजनिष्ठ व राष्ट्रनिष्ठ करावयाचें असल्यास, त्यांच्यांत अन्नदौर्भिक्ष्य व अन्नदौर्लभ्य उत्पन्न झालें किंवा केलें पाहिजे. नाना जाती करून रहाणें घातक आहे, नाना भाषा वापरणें ऐक्यसाधक नाहीं, नाना धर्मांना कवटाळून बसणें राष्ट्रनाशक आहे, वगैरे कोरड्या व कच्च्या उपदेशानें हें कार्य साधणार नाहीं. अनन्नत्वाचा जेव्हां पेंच लागेल तेव्हां हे लोक जगावयाचें असल्यास, एकसमाजनिष्ठ व एकराष्ट्रनिष्ठ झाल्या वांचून रहाणार नाहींत. नाना भाषा, नाना वंश, नाना धर्म व नाना जाती ह्यांच्या मुळें हिंदू लोक दुर्बल झाले आहेत, हें म्हणणें खोटें आहे. हिंदुस्थानांतील, मुसुल्मान लोकांत नाना जाती, नाना वंश, नाना धर्म व नाना भाषा नाहींत, एक वंश, एक जात, एक भाषा व एक धर्म आहे. तत्रापि ते हि हिंदू लोकां प्रमाणें च तुटक, उदासीन, समाजविन्मुख व राष्ट्रपराङ्मुख आहेत. तेव्हां हिंदूमुसुल्मानांच्या राष्ट्रपराङ्मुखतेचें कारण वंश, धर्म, जाती व भाषा ह्या चार राशींत हुडकीत बसणें युक्तिसिद्ध नाहीं. पराङ्मुखतेचें मुख्य व एक च एक कारण सुलभ व विपुल अन्नसंपत्ति आहे. हीं संपत्ति अपुरी भासण्यास हिंदूस्थानांत आहे ती हून लोकसंख्या तिप्पटचौपट वाढली तरी पाहिजे किंवा आहे त्या लोकसंख्येच्या रहाणीची इयत्ता दसपटीनें वाढली तरी पाहिजे किंवा बहिःस्थ राजकर्त्यांनीं अन्नशोषण करून तें अत्यन्त दुर्मीळ तरी करून टाकिलें पाहिजे. ह्या आर्थिक, सामाजिक व राजकीय विषयाचा खल इत्थंभूत व सविस्तर होण्यास एखादा स्वतंत्र ग्रंथ रचिला पाहिजे, बखरींच्या पडवींतील तुटपुंज्या जागेंत त्याचा निर्वाह होणार नाहीं.

४५ उत्तरकोंकणांतील लोक राष्ट्रपराङ्मुख व एकसमाजपराङ्मुख किती होते ह्या विधानाला पोषक असे तीन प्रसंग प्रस्तुत बखरींतून व बिंबाख्यानांतून निर्दिष्ट करतों. ( १ ) केशवाचार्य व नायकोराव यांनीं शक १३७० त माल्हजापुरीं जो लोकसमूह जमविला तो जमविण्याचा हेतू तुर्कांना हांकून देण्याचा राजकीय नव्हता, तर विसरत चाललेला महाराष्ट्रधर्म लोकांना कळविण्याचा आचारविषयक होता. ( २ ) तुर्कांनीं उत्तरकोंकणांत बळजबरीनें राज्य स्थापिलें, तेव्हां त्यांच्या विरुद्ध खटपट करण्यांत लोकांची शक्ति खर्च झाली पाहिजे होती, अशी साधी समजूत करून घेण्याचा मोह वाचकांना पडण्याचा संभव आहे. परंतु खरा प्रकार असा होता कीं तुर्कांचा द्वेष करण्या ऐवजीं आपसांतील क्षुद्र मानापमानाचे खटले अजाण अश्या तुर्क अधिकाऱ्यांच्या मार्फत लडिवाळपणें निवडून घेण्यांत निरनिराळ्या जाती व लोक भूषण मानीत. ह्याचा अर्थ असा कीं राज्ययंत्र कोणाचे हि असलें तत्रापि त्याचा द्वेष लोक करीत नसत, का कीं द्वेष करण्याचें तितकें प्रयोजन भासत नसे. फार झालें तर एका भुकेबंगाल उपटसुंभाचें लिगाड जाऊन दुसऱ्या भुकेबंगाल अधाशाचें पिशाच्च आलें, एवढी भाषा लोक वापरीत, शिपाई कारकून मोजणीदार सुभेदार इत्यादि लहानमोठ्या सरकारी हस्तकांना भामटे चोर व भिक्षेकरी मनांतल्या मनांत म्हणत आणि त्यांच्या आंगा वर लांकूड, फाटें, गवत व वैरण महारा करवीं तुच्छतेनें फेंकून देत. ह्या हून प्रखर प्रतिकार करण्याचें गांवकऱ्यांच्या किंवा देशांतील लोकांच्या स्वप्नीं सुद्धां नसे. ( ३ ) राज्यकर्ते व सर्वसामान्य लोक ह्यांच्या दर्म्यान प्रेमभाव व सहानुभूति किती अल्प होती तिचा निदर्शक असा एक उतारा मज जवळील लेखी बिंबाख्यानातला देतों. संकटसमयीं सर्वसामान्य लोकांचा आपल्याला विशेष उपयोग होणार नाहीं व निर्वाणीच्या प्रसंगीं गाठीं बांधून ठेविलेलें द्रव्य तेवढें उपयोगीं पडेल, अश्या बालंबाल खात्रीनें बिंबदेव जाधवानें अगणित द्रव्य जागोजागीं पुरून ठेविलें. त्याची हकीकत बिंबाख्यानांत द्रव्याचिकिछासांखाळि नांवाच्या समाप्तीच्या अध्यायांत दिली आहे ती अशी:—

॥ श्रीगणेशाय नमः ॥

**॥ अथ द्रव्याचिकिछाः ॥**

आतां थोडकसा प्रश्न ॥ प्रतापपुरिं महाल जाण ॥
रायें केलें अनुसंधान ॥ सर्व खजीन्यां साटीं ॥ १ ॥
तेथें × × × भुयार केलें ॥ तेथें येक पूर्व दिसेस स्थान केलें ॥
तये स्थानि अगणित द्रव्य सांठविलें ॥ कोणास अंत न लागे ॥ २ ॥
त्याचि येक खुण ॥ तेथें चिरे रुंद जाण ॥
त्याचे उत्तरेस आंगण ॥ ठेविलें असें ॥ ३ ॥
× × × × × × जाण ॥ सर्व धातुमय पूर्ण ॥
खणो खाणि जाण ॥ × × × × × असे ॥ ४ ॥

असें पुरिलें असंख्य धन ।। राणिं कारणें सांगितलि खुण ।।
हे तुम्हा लागि जाण ।। द्रव्य असे ।। ५ ।।

आगाशिचे डोंगरि वरि ।। सीळा असे फार बरि ।।
× × × × म उखळ धरि ।। तये खालिं ।। ६ ।।

खालि च्यार लक्ष हिरण्य ।। रायें ठेविलें आपण ।।
प्रधानास आज्ञा करोन ।। ठेविलें असें ।। ७ ।।

विश्वनाथ नाईक यजुःशाखि ।। त्यास राज्यान केलें सबानिस ।।
त्यास माहित सर्व स्थानें किं ।। त्या प्रमाणें लिहिलें असे ।। ८ ।।

आणिक सांगतो येक ।। आगाशिचे पश्चमे कडे तटाक ।।
वासुंदरें नाम देख ।। त्यांत पात्रक असे ।। ९ ।।

दक्षण पाळिस जाण ।। चिरे मृत्तिका हे कठिन ।।
नाहे ठेविलें कारण ।। पुन्हा हो न्यावयाचि ।। १० ।।

वांदरें वरि विस्तीर्ण ।। तेथें डोंगरि येक जाण ।।
तिचें नांव सेलिन ।। तिचे मस्तार्कि ।। ११ ।।

आहे येक × × × लोखंडी जाण ।। त्यांत दोन कोटि मोहोरा भरोन ।।
ठेविला रखवालिस जाण ।। जनार्दन भास्कर ।। १२ ।।

ऐसिं धनें गुप्त फार ।। जागो जागां ठेविलि फार ।।
त्याचें करोन टिपण पत्र ।। आपले ताईतंत ठेविलें असे ।। १३ ।।

म्हणे लक्ष्मुमण ।। उघडें करावें हें न कारण ।।
याज करितां दुसरिं स्थानें ।। गुप्त ठेविली ।। १४ ।।

मोरोसि पर्वत थोर ।। तेथें खडक असे किर ।।
त्यास छिद्र वर्तुळ ।। अपूर्व किं ।। १५ ।।

त्याज वर खुण ।। पाउले चर्मपूर्ण ।।
लहान थोर जाण ।। लिखितार्थ येक असे ।। १६ ।।

त्या खडकाचे दक्षण भागें ।। कढई येक निके ।।
तये मध्यें मोहोरा सिके ।। चार लक्ष भार असे ।। १७ ।।

दुसरि पूर्वें कडिल खुण ।। साडे तिन बोळे जाण ।।
ते वाचितां परिपूर्ण ।। नधान असे ।। १८ ।।

खडखास भयंकर फार थोर ।। मिरें सेजारि डोंगरि ।।
तेथें डोंगरि वरि ।। रायें ठेविलें पांच कुंड ।। १९ ।।

कासिया मागें पूर्वदिसेस जाणा ।। येक कुंड बांधिलें जाणा ।।
उदक सुंदर पूर्ण ।। तये कुंडि ।। २० ।।

तेथें द्रव्य सांठविलें जाण ॥ रायें आपुलें अनुसंधान ॥
करोन ठेविलें जाण ॥ प्रताप दावावयासिं ॥ २१ ॥
वरसावें बोरभाट जाण ॥ तेथें खजीन्याचें केलें स्थान ॥
तेथें द्रव्य असंख्य सुवर्ण ॥ रायें ठेविलें ॥ २२ ॥
तेथें यक पाटांगण ॥ सिळा आहे जाण ॥
तये वरि लिखित जाण ॥ करोनि ठेविलें उफराटें ॥ २३ ॥
अक्षरें उफराटिं लिहिलिं जाण ॥ त्या वरिं चंद्रसूर्याचें स्थान ॥
येक गर्धव जाण ॥ स्त्रिये वरि ॥ २४ ॥
ऐसा केला बंदोबस्त ॥ रायें रक्षक ठेविले तेथें ॥
आपण आले माहिमास ॥ खेडा वरिं ॥ २५ ॥
तेथे माहाल उत्कर्ष केले ॥ तिन कुंडें बांधिली ॥
त्यांसि कुलुपें केलिं ॥ तये स्थानिं ॥ २६ ॥
त्यांत भरिला सर्व खजिना ॥ नाना तरेचें नाणें जाणा ॥
आणिं हिरे परि पाचु जाणा ॥ ठेविले असति ॥ २७ ॥
ऐसा केला बंदोबस्त ॥ राजा राहिला निवात ॥
राज्य चालत असे स्वस्त ॥ बिंबदेवाचें ॥ २८ ॥
या खेरीज जाण ॥ जागो जागा निधान ॥
रायें ठेविलें पुरोन ॥ बिंबदेवें ॥ २९ ॥

॥ **सांखळि** ॥ १ ॥

ह्या एकोण तीस ओव्यांची शाई ओली असतांना, लेखकानें सर्व लिखाणा वर उलटा ठसा घेण्या करितां कागद दाबिला. त्या मुळें बरींच अक्षरें पुसून चिताड झालीं. तत्रापि बहुतेक अक्षरें वाचतां येण्या सारखीं आहेत. दहा वीस अक्षरें अगदींच पुसून गेलीं होतीं तेवढयांच्या कोऱ्या जागीं फुल्या छापिल्या आहेत. ओव्यांत उल्लेखिलेल्या स्थळीं द्रव्यलब्धीचा जरी फारसा संभव नसला तत्रापि बिंबदेवकालीन प्राचीन अवशेष सांपडण्याचा संभव आहे.

**४६** येथ पर्यंत केलेल्या विवेचनाचा इत्यर्थ असा कीं भारतवर्षांत फार पुरातन काला पासून दोन स्वभावाचे लोक वावरत आलेले आहेत. राज्ययंत्र चालवून पोट भरणारे बहिस्थ भुकेबंगाल लोक व अन्नसंपत्ति निर्माण करून सालसपणें कालक्रमणा करणारे अंतस्थ अन्नसंतृप्त लोक. जेव्हांकेव्हां पासूनचा भारतवर्षाच्या इतिहास आपणास माहीत आहे, तेव्हां पासून हे दोन वर्ग दृष्टिपथांत येतात. दुसऱ्या वर्गास बहिःस्थ वैदिक लोक विश् ह्या संज्ञेनें ओळखीत. विश् म्हणजे बैठे लोक म्हणजे बिछायत पसरून शेतकी व व्यायाम करणारे लोक. विश् लोक संपत्ति कमाविण्यास लागणाऱ्या करामतीनें मारामाऱ्या करण्यांत पटाईत अशा क्षत्रिय लोकां हून जास्त सुधारलेले असत.

विश् लोकांत राजा, राज्य, राष्ट्र, इत्यादि राजकीय अर्थांचा हव्यास अत्यन्त अल्प प्रमाणाचा असे. कदाचित् राजन् हीं पदवी विश् लोकांना क्षत्रियांची गांठ पडे तों पर्यंत माहीत हि नसावी. क्षत्रियांना व ब्राह्मणांना मात्र राजा, राज्य, राष्ट्र व प्रजा हे चार अर्थ फार प्राचीन काला पासून माहीत होते. कारण ते पृथ्वीच्या ज्या प्रदेशांत रहात असत त्या प्रदेशांत अन्नाची टंचाई पराकाष्ठेची असे. अन्न दे, प्रजा दे, राजा दे, गाई दे, मेंढ्या दे, अशा मायन्याच्या प्रार्थनांनीं चार हि वेद भरलेले आहेत. Give us our daily bread, ही जशी यूरोपीयन लोकांची निकडीची प्रार्थना त्याच मासल्याची ब्राह्मणक्षत्रियांची भुकेबंगाली प्रार्थना असे. राजा व प्रजा ही संस्था ब्राह्मण क्षत्रियांनीं भारतवर्षांत आणिली. प्रत्येक बाप आपल्या प्रजेचा म्हणजे संततीचा राजा असे. राजा म्हणजे रक्षण करणारा. मूळ राज् या धातूचा किंवा खरें म्हटलें म्हणजे शब्दाचा अर्थ रक्षण करणें असा होता. संततीचें रक्षण, पाळण व पोषण करणारा जो तो राजा. राजा ह्या शब्दा सारखा च पितृ हा शब्द आहे. पितृ म्हणजे पाळण, रक्षण, पोषण करणारा. राजा व त्याच्या पोटची प्रजा मिळून राष्ट्र होई. पोटच्या संततीस च तेवडी प्रजा हि संज्ञा असे. प्रजेला व्यक्तिदृष्ट्या राष्ट्रीय म्हणत. राज् रक्षण करणें ह्या धातूला ऐश्वर्यवान् होणें, अधिकार चालविणें, इत्यादि अर्थ लक्षणेनें नंतर आले. मूळचा राजन् हा शब्द पितृ ह्या शब्दाचा समानार्थक होता. प्रजा हा शब्द केवळ पोटची संतति ह्या अर्थाचा वाचक होता. Subject म्हणजे खालीं दडपिलेला ह्या अर्थी प्रजा हा शब्द त्या प्राचीन कालीं योजिला जात नसे. विश् जेव्हां भेटले तेव्हां subject ह्या अर्थी दास हा शब्द अस्तित्वांत आला. तों पर्यंत राजा व प्रजा ह्या संस्थेंत दास नव्हते. मूळचें आर्य लोकांचें राष्ट्र म्हणजे राजा व पोटची प्रजा. ह्या आर्यांना अर्य भेटले. अरेः इदं अर्यं. अर्य म्हणजे शत्रू जे विश् लोक त्यांना आर्यांनीं दास हें टोपण नांव दिलें. दास म्हणजे देणारे. दाला सिप् किंवा सन् होऊन दास हा शब्द झाला आहे. दास म्हणजे कर देणारा. विश् जो दास तो राजाला कर देई. संतती जी प्रजा ती कर देत नसे. प्रजा वयांत आली म्हणजे ती राजा ह्या पदवीला पोहोचे. दास जे विश् ते राजा ह्या पदवीला किंवा प्रजा ह्या पदवीला पोहोचत नसत. ते केवळ कर देणारे जित लोक असत. प्रत्येक पितृ राजन् असल्यामुळें अनेक पितृ मिळून जो गण होई त्या गणांतील सर्व पितृ आपणास व्यक्तिशः राजन् म्हणवीत. टोळींतील असे अनेक राजे मिळून गणराज्य होई. गणाचा जो पुढारी त्याला गणराज्, गणपति किंवा गणनायक ही संज्ञा असे. गणराजा जेव्हां आपल्या हातीं सर्व सत्ता बळकावी तेव्हां त्याला एकराज् म्हणत किंवा संक्षेपानें राज् म्हणत. राज् व गणनायक हे दोन शब्द प्राचीन इतिहासदृष्ट्या अत्यन्त महत्वाचे आहेत. रोमन् राजार्थक rex शब्द राज् ह्या धातूला सिप् किंवा सन् होऊन बनला आहे. राज् + स् = राक्स् = रेक्स्. गणनायक = कोणआअग = Konig = King अश्या अपभ्रंशानें किंग, कोनिग हा राजार्थक इंग्लिश व जर्मन शब्द बनला आहे.

Konig, King ह्या शब्दाचा मूळ अर्थ heap of the horde, leader of the horde, असा आहे. ह्या व्युत्पत्त्यां पासून असें निगमन प्राप्त होतें कीं राज् हा शब्द ज्या काळीं वैदिक आर्यांत अधिपति, ईश्वर ह्या अर्थाचा वाचक झाला त्या कालीं वैदिक आर्य व रोमन लोकांचे पूर्वज एकमेकांच्या शेजाराला होते; तसेंच, गणराजू, गणनायक, हे शब्द ज्या कालीं गणराज्यसंस्थेच्या अनुषंगानें वैदिक आर्यांत प्रचलित झाले त्या कालीं जर्मनादि लोकांचे पूर्वज वैदिक आर्यांच्या शेजाराला होते. रोमन व जर्मन लोक वैदिक आर्यांच्या शेजाराला होते व आर्यभाषा बोलत होते म्हणून ते आर्यवंशी होते, असें मात्र समजण्यांत अर्थ नाहीं. जर्मन, साक्सन्, रोमन, वगैरे लोक वंशानें आर्य नव्हते. राक्षस्, दानव, यातु, वगैरे अनार्यवंशांतले हे आर्यभाष लोक होते. अशी ही प्राचीन गणराज्यसंस्था घेऊन भारतवर्ष हें नांव ज्या देशास पुढें कालान्तरानें पडलें त्या देशांत आर्यांची धाड शिरली व त्या धाडीनें एकराज्य, वैराज्य, साम्राज्य, माहाराज्य इत्यादि राजकारणाचे नाना प्रयोग केले, आणि प्रयोग करून थकल्या वर व अन्नसंतृप्त झाल्या वर मुक्तद्वारी, तुटक, संन्यस्त, वेदान्ती, समाजपराङ्मुख व राष्ट्रपराङ्मुख होऊन बसले. सुदासादि ऋग्वैदिक राजां पासून तो तहत बाजीरावादि चित्पावन राजां पर्यंत हा क्रम थोड्या फार फरकानें ह्या खंडांत चालू आहे. अन्नसंतृप्त, संन्यासप्रवण व व्यक्तिस्वतंत्र लोकांचे थरा वर थर ह्या देशांत गेल्या पांच हजार वर्षे क्रमानुक्रमानें बसत आले आहेत. त्यांच्या करवीं राजकीय, देवधार्मिक, वैयापारिक, भाषिक, राज्यमारक किंवा राज्यसाधक असें कोणतें हि सामुदायिक कार्य स्वयंस्फूर्तीनें किंवा परस्फूर्तीनें आजपर्यंत कधीं च झालेलें नाहीं. हीं सर्व कार्यें पोटा करितां राज्ययंत्र पटकविण्याची हांव धरणाऱ्या बहिःस्थ किंवा अंतःस्थ असंतुष्ट अल्पसंख्याक लोकांच्या हातून वेळोवेळ पार पडलेलीं आहेत.

**४७** अपरंपार अशी अन्नसंपत्ति, साही ऋतूंत अत्यल्प कपडाल्त्या वर शीतोष्णनिवारण होईल अशी हवा, कित्येक शतकें पुरून उरेल अशी जागा, वगैरे साधनांची सुलभ अनुकूलता असल्या मुळें, ह्या देशांत जे जे लोक स्थायिक राहिवाशी होतात ते ते बाहुल्यानें मुक्तद्वारी, संन्यस्त, व्यक्तिनिष्ठ, समाजपराङ्मुख व राष्ट्रपराङ्मुख बनतात, ही कहाणी गेल्या दहा रकान्यांत सांगितली. अन्ना करितां दाही दिशा हिंडणाऱ्या व चोऱ्यामाऱ्या, खून, कत्तली, जबरदस्ती, दंगे व लढाया ह्यांत चूर झालेल्या गेल्या तीन हजार वर्षांतील मध्यआशियांतल्या मोंगलादि बिनसुधारलेल्या उनाड लोकां कडे तिरस्कारानें दुर्लक्ष करून, अलीकडील चार शें वर्षांतील सुसंस्कृत म्हणविणाऱ्या युरोपीयन लोकांना हे मुक्तद्वारी, संन्यस्त, व्यक्तिनिष्ठ व राष्ट्रपराङ्मुख लोक असा प्रश्न करीत कीं, सरकारें बनवून कर उकळीत न बसतां, सालसपणें, निमूटपणें, व शांततेनें ह्या देशांत इतरां प्रमाणें अन्न खात राहिलात तर काय बिघडेल ! एकसमाज करून, राज्ययंत्रें बनवून, राष्ट्रें निर्मून, शास्त्रें रचून, शस्त्रास्त्रें घडवून, एक जूट होऊन, स्वदेशांतील लक्षावधि मोल मजुरांची व भिकार भणंगांची उपासमार

करून व परदेशांतील अन्न लुटून शेवटीं पोटाची खळी भरण्या पलीकडे कोणतें शतकृत्य साधता ? आमच्या देशांत आम्हांला ज्या प्रमाणें सरकार ही संस्था जरूरीची भासत नाहीं त्या प्रमाणें तुमच्या कडील शेंकडा नव्वद लोकांना हि समाजाच्या अंतर्बाह्य जिकडेतिकडे घुसणारी सरकार ही संस्था मना पासून नको आहे. तेव्हां, कांहीं उपद्व्यापी अल्पसंख्याक लोकांनीं स्वतःची चैन भागविण्या करितां स्थापिलेल्या व सर्व पृथ्वीला पीडा करणाऱ्या सरकार ह्या कृत्रिम व अनवश्यक संस्थेला तुम्हीं आम्हीं सर्व मिळून मातींत गाडून टाकूं या. सर्व पृथ्वी भर फलांगा फलांगा वर एकेका कुटुंबाला कोंकणांतल्याप्रमाणें एकेक घरवाडा देऊन जुलमाचीं व पापाचीं जन्मस्थानें जीं शहरें त्यांचा प्रथम नायनाट करूं. ज्याला ज्या देशांत रहावेंसें वाटेल त्यानें त्या देशांत जाऊन जागा असेल तेथें बिनहरकत रहावें. भय काय तें चोराचिल्टांचें, पृथ्वीच्या पाठी वरील अर्ध रानटी उनाड लोकांचें किंवा बडे जमीनदार, जंगी पेढीवाले व धंदेवाईक मुत्सद्दी यांचें. पैकीं चोराचिल्टांचा मागमूस फलांगा फलांगा वर घरें झाल्यानें मुदलांत च रहात नाहीं, असा दक्षिण कोंकणांतील अनुभव आहे. तो च अनुभव सर्व पृथ्वी भर येईल व चोराचिल्टांच्या निवारणार्थ महार व कुत्रीं ह्यांचें देखील सरकार निर्मिण्याची अवश्यकता रहाणार नाहीं. अर्धरानटी लोकांचा एक मोठा जमाव आफ्रिकेच्या मध्य भागांत आहे आणि दुसरा मोठा जमाव मध्य आशियांत आहे. ह्या दोन्हीं अर्धरानटी जमावांना पाठी मागून रेटून पुढें हुसकून देण्यास त्यांच्या हून रानटी व भुकेबंगाल लोक आतां राहिले नाहींत. करतां, हे हि समाज आपापल्या मूळभूमींत स्थिर होण्याचा संभव आहे. तेव्हां त्यांचा प्रतिकार करण्या साठीं सरहद्दी वरून सैन्य ठेवणाऱ्या सरकारांची आतां अवश्यकता राहिली नाहीं. सबब, दंडधारी सरकारांना येथून पुढें कायमची रजा देणें युक्त नव्हे काय ? बडे जमीनदार, जंगी पेढीवाले आणि धंदेवाईक मुत्सद्दी यांनीं सर्व पृथ्वी भर मोंगलादि अर्धरानटीं लोकां प्रमाणें धूमाकूळ घालण्या करितां व आपली अनिवार द्रव्यतृष्णा भागविण्या करितां जुलमीं व घातकीं सरकारें चालविलीं आहेत. त्यांचा हा परोपघातक स्वार्थी धंदा बंद पाडण्याची वेळ होऊन गेलीं नाहीं काय ? भारतवर्षांतील व उत्तरकोंकणातील उदासीन व निवृत्त अश्या बहुतम लोकांचा शकाच्या सोळाव्या व सतराव्या शतकांतील इतिहास जर कांहीं विचारीत व शिकवीत असला तर हे प्रश्न विचारीत व शिकवीत आहे.

४८ ह्याच्या उलट उपदेश भारतवर्षांतील व उत्तरकोंकणांतील तत्कालीन उपद्व्यापी व प्रवृत्त अश्या लघुतम लोकांचा इतिहास करतो. अल्पसंख्याक प्रवृत्तांचा इतिहास आपल्या मूठ भर अनुयायांच्या कानांत कंठरवानें ओरडतो कीं, एकसमाज करून व एकराष्ट्र बनवून स्वधर्म, स्वराज्य, स्वभाषा इत्यादींची स्थापना करा व यथेच्छ अन्नसंपत्ति मिळवा. प्रस्तुत बखरीचा एक कर्ता जो केशवाचार्य व त्याचा पुरस्कर्ता जो नायकोराव ते दोघे हि ह्या प्रवृत्तिधर्मांचे प्रवर्तक होते. त्यांनीं ५२१ ब्राह्मण व ३६५६ सैनिक ऊर्फ क्षत्रिय उत्तरकोंकणांतून म्हाळसापुरीं जमविले म्हणजे एकंदर ४१७७ माणसें म्हणजे सुमार चार हजार माणसें

प्रवृत्तिमार्गाची मिळविलीं. साऱ्या उत्तरकोंकणांत शक १३७०त ह्या हून कमींत कमी निदान दसपट तरी लोकसंख्या असावी. म्हणजे दहा माणसें निवृत्तिमार्गी धरिल्यास त्यांत एक माणूस प्रवृत्तिधर्माचें त्या कालीं आढळे असें झालें. ह्या अल्पसंख्याक लोकां पैकीं खरे जातिवंत राजचिकीर्षु फक्त दोन च माणसें होती, पहिला केशवाचार्य व दुसरा नायकोराव. बाकी सर्व सैनिक ऊर्फ क्षत्रिय व ब्राह्मण पोटा करितां यवनाचे सेवक झाले. केशवाचार्य लिहितो, " खल्क सैनिक ईनामक सर्व रईत अजम शेख अल्लावादिनाची जालिं. " सर्व सैनिक, इनामदार व रयत यवनाच्या बाजूचे झाले. केशवाचार्य पुढें शोक करितो कीं, क्षत्रियांनीं राज्याभिमान सांडिला, शस्त्रें सोडिलीं, कृषि धरिली, सोमवंशियांनीं कारकोणी व गांवखोती पतकरिली, शिंदे वतनें संभाळून यवनाची सेवा करूं लागले, आचारहीन जाले, गोत्र प्रवर कुळस्वामीण कुळगुरू यास विसरले ( पृष्ठ ५३ ). सुग्रास अन्न सोडून राज्यें मिळविण्यांत व नवीन सरकारें स्थापिण्यांत होणारे हाल व उपासमार कोण सोसतो? केशवाचार्य व नायकोराव यांनीं बोलाविलेल्या सभेस भोजना वर यथेच्छ ताव मारण्यास व आचरिला जाण्यास कठीण अश्या महाराष्ट्रधर्माच्या शपथा घेण्यास सर्व भोजनभाऊ जमा झाले. ह्या अन्नलंपटांना केशवाचार्यानें प्रवृत्तिप्रधान महाराष्ट्रधर्म सांगितला. ह्या च महाराष्ट्रधर्माचा पुनरुच्चार दोन शें वर्षांनीं पुढें म्हणजे शक १५७० च्या सुमारास श्रीमत्समर्थ रामदासस्वामी यांनीं शिवप्रभृति मराठ्यांच्या हितार्थ सह्याद्रिकुहरांत केला. तदनंतर दोन शें वर्षांनीं महादेव गोविंद रानडे व राजारामशास्त्री भागवत ह्यांनीं पंचवीस वर्षां मागें महाराष्ट्रधर्म म्हणजे काय ह्या बाबी संबंधानें लेखांतून व भाषणांतून खल मांडिला. महाराष्ट्रधर्म या शब्दाचा अर्थ महाराष्ट्रांतील देवधर्म म्हणजे religion of महाराष्ट्र असा रानडे व भागवत यांनीं केला. महाराष्ट्रधर्म हा देवधर्मवाचक शब्द नसून कर्तव्यवाचक शब्द आहे, असें प्रत्युत्तर त्या वेळीं प्रस्तुत लेखकानें दिलें. त्या प्रत्युत्तराला पोषक असा पुरावा केशवाचार्याच्या लेखांत सांपडतो. केशवाचार्यानें महाराष्ट्रधर्माचें निरूपण बखरीच्या ५३ पासून ६१ पृष्ठा पर्यंतच्या आठ पृष्ठांत केलें आहे. महाराष्ट्रधर्मा वर एवढें विस्तृत लिखाण आजपर्यंतच्या कोणत्या हि जुन्या ग्रंथांत आलेलें नाहीं. आज पर्यंत समर्थांच्या त्रोटक उल्लेखां वरून महाराष्ट्रधर्माची अल्पस्वल्प कल्पना करतां येत असे. ती अडचण आतां राहिली नाहीं. महाराष्ट्रधर्म या सामासिकशब्दाचा अर्थ केशवाचार्य महाराष्ट्रदेशाचा धर्म असा करीत नाहीं, तर महाराष्ट्रिक लोकांचा ऊर्फ मराठा लोकांचा धर्म असा करतो. नंतर, महाराष्ट्रधर्माचें वर्णन करण्या पूर्वी मराठा कोणाला म्हणावें तें सांगतो. उत्तरकोंकणांत केळव्या पासून साष्टी पर्यंत तुव्हेरी, भोसले, चव्हाण, जाधव, घोरपडे, दाह्याबाडे, कावरे, बुधले, कबाड, इत्यादिक शहाण्णव कुळींचे पाटील, देशमुख, वतनदार, ठिकाणदार होते ते सर्व केशवाचार्य माहाराष्ट्रांत गणतो. देसाय, पाटेल, चौधरी, वतनदार, इजारदार, महालदार, कुळावी, कुळुंबी, म्हातरे, चवघले, साहाणे, इत्यादींनीं यद्यपि कृषिकर्म पतकरिलें तत्रापि हे हि सर्व माहाराष्ट्र. राऊत, शिंदे, कडू, चोरघे, म्हातरे, पाटेल, चौधरी, ठाकूर, परभू ह्या नऊ कुळ्यांनीं

जरा उदीम धरिला तरी हे सर्व माहाराष्ट्रांत मोडतात. कौळी, सवे, सावे, चुरी, चौधरी, राऊत, वर्तक, म्हातरे, देशमुख, नायक, भोईर, माळी या कृषिकर्म करणाऱ्या बारा कुळ्या माहाराष्ट्रांत पडतात. कौळाय, शिळाय कुळींचे लोक माहाराष्ट्र. पुरो,राणे, दरणे, प्रभू यांनीं कारकूनवृत्ति धरिली ते हि माहाराष्ट्र. देशले, म्हातरे, नायक, रुत, राऊत, चौधरी, पाटेल, वर्तक, पुरो, ठाकूर, साण्हे, कौळी, माळी, सुतार, दरणे, ह्या सर्व कुळ्या माहाराष्ट्रांच्या. शेतकरी, कांसार, तांबट, पोगार, लोहार, गाडबडे, बाहारे, मासी, वैती, कोळी, सोनकोळी, ढोरकोळी, आगरी, खारू, डोखळे आणि नट, भाट, बुरूड, चर्मक इत्यादि वर्णावर्ण अत्यंज, हे सर्व माहाराष्ट्र. माहाराष्ट्र ह्या शब्दाचा अपभ्रंश माराष्ट्र ( पृष्ट ६० ). महाराष्ट्रे भवा: माहाराष्ट्रा: । माराष्ट्र म्हणजे मराठा. मराठा ह्या शब्दाचे दोन अर्थ. भोसले, चव्हाण, जाधव इत्यादि जे क्षत्रिय त्यांना महाराष्ट्रिक अशी प्राचीन संज्ञा होती. त्यांना प्रथमारंभीं मराठा हें उपपद अन्यव्यावृत्त्यर्थ लावीत. महाराष्ट्रिकांनीं वसविलेला जो देश त्याला महाराष्ट्र असें नांव पडलें. नंतर त्या देशांत ब्राह्मणा पासून अंत्यजा पर्यंत जेवढ्या म्हणून हिंदू जाती होत्या त्यांना माराष्ट्र ऊर्फ मराठा ही व्यापक संज्ञा लावण्याचा प्रघात चालू झाला. ह्या व्यापकसंज्ञेनें विशिष्ट जे सर्व लोक त्यांचा जो धर्म तो महाराष्ट्रधर्म म्हणावा. भिन्न वर्ण, भिन्न गोत, भिन्न कर्म, भिन्न आचार, भिन्न पहिराव, भिन्न भूषणें, भिन्न भाषा, भिन्न कुळ्या, इत्यादि नाना उपभेद ह्या मराठ्यांत यद्यपि असले तत्रापि कांहीं धर्म ह्या लोकांत सामान्य आहेत. धर्म चार; ( १ ) देशाचार, ( २ ) कुळाचार, ( ३ ) वंशाचार व ( ४ ) देवशास्त्राचार. आचारप्रधानो धर्म: । करतां आचाराला केशवाचार्य धर्म म्हणतो. ( १ ) देशधर्म, ( २ ) कुळधर्म, ( ३ ) वंशधर्म व ( ४ ) देवधर्म. याज्ञवल्क्यादि ऋषींनीं प्रचालित केला जो आचारव्यवहारप्रायश्चित्तादि त्रिविध धर्म तो देशधर्म. कुळांत म्हणजे गोतांत ज्या कुळमान्य चालीरीती त्या कुळधर्म. वंशांत जे प्रचालित धर्म ते वंशधर्म. आणि देवसंबंधक जीं कर्तव्यें तीं देवधर्म. देशधर्म, कुळधर्म, वंशधर्म व देवधर्म ह्या चार धर्मांच्या अनुज्ञे प्रमाणें आपापल्या धर्मीं सर्वांनीं वर्तावें. त्यांत महाराष्ट्रधर्माची पहिली खूण म्हणजे, सर्वांत ब्राह्मण श्रेष्ठ, हें मत मान्य असणें. तो सर्वांचा गुरु. देव गुरूरूपें सर्वांस रक्षिता,सुख देता, मुक्तिदेता. हा धर्म सर्व धर्मांचा जिव,म्हणून केशवाचार्य सांगतो. ही महाराष्ट्रधर्माची दुसरी खूण. प्रत्यहीं स्नान करणें ही, केशवाचार्याच्या मतें, महाराष्ट्रधर्माची तिसरी खूण. मूळ महाराष्ट्रधर्म म्हणजे ( १ ) स्नान, ( २ ) गुरूपदेश, ( ३ ) मंत्रजप प्रत्यहीं करावा, असें केशवाचार्याचें वाक्य आहे ( पृष्ट ६१, ओळ १।२ ). स्नान म्हणजे शुचिर्भूतपणा. गुरूपदेश म्हणजे सर्व जातींत श्रेष्ठ जो ब्राह्मण त्यानें उपदिष्ट जो आचारव्यवहारप्रायश्चित्तादि धर्मसमूह तो. आणि मंत्रजप म्हणजे गुरूपदेशानुरूप श्रद्धायुक्त आचरण. तीर्थगुरु तीर्थाचा, स्थळगुरु स्थळाचा, श्रीगुरु कुळाचा व जगद्गुरु जगताचा म्हणजे सर्व देशाचा. जगद्गुरु तो च शंकराचार्य. शंकराचार्यांनीं धर्मस्थापना केली. दक्षिणेस सेतुबंधरामेश्वर, उत्तरेस काशी,

पश्चिमेस द्वारका व पूर्वेस तुळजापुर, यांच्या मधील जो पुण्यदेश तो महाराष्ट्रधर्माचें स्थान. जो जो म्हणून स्वतःस माराष्ट्र म्हणवितो त्यानें हा लक्षणत्रयांकित माराष्ट्रधर्म आचरिला पाहिजे. पैकीं मराठा क्षत्रिय जो आहे त्यानें कुक्कुटशब्दा पासोन उठावें, शौचस्नान संपादावें, देवपूजन नित्यकर्म आचार्ययुक्त करावें, शास्त्रवचनाधारें न्याय निवडावा, पुराणेतिहास प्रत्यहीं आयकावा, व शस्त्र कमरेस बांधून भोजन सारावें, कदापि गाफील न रहावें. असें शास्त्रोक्त धर्मचोदित आचरण जो करील तो क्षत्रिय गर्भादान, पुंसवन, चौल, व्रतबंध, विवाह, महोत्सव, विद्यारंभ, इत्यादि कर्मे वेदोक्त करण्यास सर्वथा योग्य होय. ह्या धर्मा पासून पतित असे बहुत राजे शंकराचार्यें शुद्ध केले ( पृष्ठ ५८, ओळ १३ ). कांहीं तसेच अशुद्ध राहिले त्यांस निराळी पद्धती नेमून दिली. विप्रांस वैदिक मंत्र, अशुद्ध क्षत्रियांस पौराणिक मंत्र व शूद्रांस तांत्रिक पद्धत शंकराचार्यांनीं घालून दिली. हें अश्या स्वरूपाचें केशवाचार्यानें महाराष्ट्रधर्माचें विवरण केलें आहे. विवरणा वरून स्पष्ट च होतें कीं महाराष्ट्रधर्म म्हणजे केवळ religion of महाराष्ट्र नव्हे. महाराष्ट्रधर्म म्हणजे देशधर्म + जाति धर्म + कुलधर्म + वंशधर्म + देव-धर्म होय. महाराष्ट्रांतील देशधर्म म्हणजे याज्ञवल्क्यस्मृती वर् विज्ञानेश्वरानें केलेल्या टीकेंत सांगितलेले सर्व धर्म. जातिधर्म म्हणजे प्रत्येक जातीचे विशिष्ट धर्म. कुलधर्म म्हणजे प्रत्येक कुलाचे विशिष्ट धर्म. वंशधर्म म्हणजे उपकुलांचे ऊर्फ वंशांचें धर्म. व देवधर्म म्हणजे देशांत, जातींत, कुलांत, वंशांत मान्य असलेल्या देवा संबंधानें व स्वतः व्यक्तिमात्राला इष्ट असलेल्या देवते संबंधानें कर्तव्यें. हे सर्व धर्म मिळून महाराष्ट्रधर्म ऊर्फ माराष्ट्रधर्म होतो. महाराष्ट्रधर्माची मुख्य व एक च एक खूण म्हटली म्हणजे गुरु-त्वाच्या नात्यानें सर्व धर्मसंबंधक कर्मांचें ब्राह्मणाच्या म्हणजे तीर्थगुरूच्या किंवा स्थल-गुरूच्या किंवा कुलगुरूच्या किंवा जगद्गुरूच्या हस्तें संपादन. ब्राह्मणाच्या हस्तें जो कोणी कोणचें हि धर्मकर्म संपादूं इच्छीत नाहीं तो महाराष्ट्रधर्मी नव्हे. अश्या ब्राह्मण-द्वेष्ट्याला त्या कालीं पाखंडी म्हणत व धर्मबाह्य म्हणजे कायद्याच्या व रूढीच्या बाहेरचा पतित समजत.

४९ एवंस्वरूप महाराष्ट्रधर्माचें निरूपण नायकोराव ह्या क्षत्रियानें केशवाचार्य ह्या ब्राह्मणाच्या मुखें म्हालजापुरीं जमलेल्या चार हजार ब्राह्मणक्षत्रियादि अठरापगड जातींना निरूपविलें. तें निरूपण ऐकून क्षात्रतेज व राज्यचिकीर्षुत्व कितपत उज्ज्वलित झालें तें शक १२७० नंतरच्या इतिहासा वरून दिसतें च आहे. सुग्रास अन्न खाण्यास चटावलेल्या राज्यपराङ्मुख लोकांच्या मना वर त्या निरूपणाचा कांहीं एक परिणाम झाला नाहीं. तत्रापि, १२७० नंतर दोन शें वर्षांनीं म्हणजे शक १५७० च्या सुमारास शिवाजी नामें करून एका महान् वीरपुरुषाच्या नेतृत्वा खालीं बुभुक्षित अश्या पांच चार शें वरघाटी परस्थ ब्राह्मणमराठ्यांनीं उत्तरकोंकणांत कल्याणप्रांतीं स्वतःचें सरकार ऊर्फ स्वराज्य स्थापिलें. त्या स्थापनेंत उत्तरकोंकणांतील खास रहि-वाश्यांचा कितपत हात होता तें सांगणारीं कागदपत्रें अद्याप उजेडांत यावयाचीं आहेत.

बखरींतील तिसऱ्या, पांचव्या व सहाव्या प्रकरणां वरून एवढें मात्र म्हणतां येतें कीं उत्तरकोंकणांतील अन्नसंपन्न देसाई, पाटेल, म्हातरे, चौधरी, सोमवंशी, सूर्यवंशी व शेषवंशी मानापमानाच्या चुरशींत चूर होऊन जाऊन राज्यचिकीर्षेच्या विवंचनेशीं पूर्ण फारकत करून बसले होते, इतकें च नव्हे तर आचाराला, धर्माला व गुरूला सोडचिठ्ठी देऊन बहुतेक मोकळे झाले होते. शक १२७० त तुर्कोण झाल्या पासून शक १३७० पर्यंतच्या शंभर वर्षांत ह्यांची जी ही राजकीय व धार्मिक ऊर्फ सामाजिक अवनति झाली तिचा पत्ता हि ह्यांना नव्हता. ह्यांना न दिसणाऱ्या ह्यांच्या दैन्यावस्थेची परीक्षा केशवाचार्य व नायकोराव ह्या दोघा उद्धारकांना मात्र झाली. केशवाचार्य व नायकोराव ह्या उद्धारकांच्या मनांत असें आलें कीं, तिरस्कारबुद्धीनें ह्या लोकांचा नाद अजीबात सोडून दिल्यास हे स्वराज्ययंत्राला जसे पारखे झाले तसे हिंदुत्वाला हि मुकून जातील आणि राज्यनाशा प्रमाणें कुलनशाला हि गांठतील. करतां, कारुणिकबुद्धीनें केशवाचार्य व नायकोराव ह्यांनीं स्वतःच्या खर्चानें ह्या उदासीनांना एकत्र करून, जेवायाला घालून व चुचकारून महाराष्ट्रधर्माची ओळख करून दिली. आपण अडीच शें वर्षे स्वराज्य कसें केलें, आपले पूर्वज धाडशी कसे होते व आपले आचार किती उच्च आहेत, आपली पूर्वपीठिका किती उज्ज्वल आहे व आपली सद्यःस्थिति किती शोचनीय झाली आहे, ह्या बाबी एका कैफियतींत ऊर्फ वंशावळींत ऊर्फ कुळकटांत लिहून काढून व त्याच्या शेंकडों नकला करून त्या नकला ह्या दोघा उद्धारकांनीं तेथें जमलेल्या लोकांना फुकट वाटल्या. उद्धारकांनीं काकलुतीनें गळ्यांत बांधिलेल्या नकला उशाशीं गुंडाळून ठेवून हे ऐदी, उदासीन व सुखावलेले लोक जे झोंपी गेले ते मुसुलमानाचें राज्य जाऊन पोर्तुगीज लोकांचें राज्य चिमाजी अप्पानें शक १६६१ त वसईतून भिरकाडून दिलें तव्हां तीन शें वर्षांनीं किंचित् जागे होतात न होतात ( अणजूरकरांचीं पत्रें वगैरे ) तों पुनः गाढ निद्रेनें अद्ययावत् पछाडले गेले आणि अन्नसंपन्नतेनें व अन्नसौलभ्यानें पृथ्वीच्या पाठी वरील कोणी हि अल्पसंतोषी लोक मुक्तद्वारी, उदासीन, संन्यस्त व्यक्त्येकनिष्ठ व राज्यपराङ्मुख बनतात ह्या सिद्धान्ताचें त्रिकालाबाधित्व प्रस्थापित करते झाले. तुम्हीं क्षत्रिय, स्वतः राज्य करण्याचा तुमचा आधिकार, तुम्हीं परकीय राज्यकर्त्यांची सेवा करणें ऊर्फ सहकार करणें सर्वथा अनुचित, इत्यादि प्रच्छन्न उपदेश केशवाचार्यानें व नायकोरावानें ह्या कोंगाड्यांस गोड शब्दांनीं केला. परंतु त्या उपदेशा प्रमाणें कां वागावें हें च मुळीं त्या अहृदयांना कळे ना. आपलें कांहीं एक गेलें नसतां व आपली चंगळ चालू असतां, परकीय राज्यकर्त्यांशीं सशस्त्र किंवा अशस्त्र असा कोणता हि प्रतिकार करण्याचें सबळ कारण ह्या लोकांना दिसे ना. उलट, राज्यकर्त्यांना परकीय म्हणणाऱ्या केशवाचार्यांच्या व नायकोरावाच्या खुळचट मूर्खपणाची मात्र त्या शहाण्यांना कींव आली.

---

॥ श्रीगणेशाय नमः ॥

॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥

॥ श्रीगुरुभ्यो नमः ॥

॥ श्रीकुळदेवताय नमः ॥

अथ पूर्वपरंपरा—वंशउत्पत्ती—वर्णावर्ण—व्याख्या ॥

॥ श्लोक ॥

उमायां गजकणवक्त्रं गणेशं । भुजाकंकणं शोभितं ज्ञानरूपं ॥
गळा हारमुक्ताफळं शोभिवंतं । नमो ज्ञानरूपं गणेशं नमस्ते ॥ १ ॥
गणेशैकदंतं शुभं सर्वकार्ये । स्मरे सन्मुखं ज्ञानदं सर्वसिद्धि ॥
मनं चिंतितं कार्यसिद्धि भवंति । नमो बुद्धिकांतं गणेशं नमस्ते ॥ २ ॥

॥ ओवी ॥

ऐसा नमिला गणेश ॥ जो नाना श्रृंगारें शोभला विघ्नेश ॥
अळंकार भूषणें चतुर्दश ॥ नमिला भावें ॥ ३ ॥
जयाचें अगम्य महिमान ॥ चतुर्दश विद्या जया पासोन ॥
सर्व सिद्धि जयासि शरण ॥ तो गजवदन वंदिला म्या ॥ ४ ॥
चाळकस्थिती जयाची ॥ सर्वस्वें सत्ता तयाची ॥
ते मूर्ति हेळापूर्ण आमची ॥ अमृतकळा ॥ ५ ॥
ते हे शारदा निधान ॥ जियेचा पिता चतुरानन ॥
ते वेदमाया आद्य करोन ॥ तयेसि शरण अनन्यभावें ॥ ६ ॥
श्रीगुरु वोळला कृपापाणी ॥ ज्याणे सर्वज्ञ सत्ता आंदणी ॥
तयासि शरणांगत अन्योन्नी ॥ लोळेन चरणि श्रीगुरुचे ॥ ७ ॥

॥ श्लोक ॥

गुरु ब्रह्मा गुरो विष्णु गुरु देवमहेश्वरः ॥
गुरुरेकपरब्रह्म तस्मै श्रीगुरवे नमः ॥ १ ॥
अज्ञानतिमिरांधस्य ज्ञानांजनशलाकया ॥
चक्षु उन्मिलितं येन तस्मै श्रीगुरवे नमः ॥ २ ॥

॥ ओवी ॥

अज्ञानतिमिर दवाडिलें ॥ ज्ञान स्फूर्तीतें पावलें ॥
वाग्विलासी स्फूरलें ॥ वाग्देवता आनंदे ॥ १ ॥

जैसे च्यारि मेघ वर्शती ॥ उल्हासें दाटाले क्षिती ॥
हर्षित चळचरें पावती ॥ आनंदें सुखावती स्थावर इत्यादी ॥ २ ॥
घोरशब्दें सिंधू उन्मळे ॥ लहरि शब्द उमाळे ॥
तैसि वाग्देवता आपुलिया बळें ॥ उत्पत्तिप्रळये बोलतसे ॥ ३ ॥
मुख्यत्वि व्यास वक्ता ॥ पूर्वपरंपरा साकल्यता ॥
बोलिला जो भगवान् दत्तचित्ता ॥ आईका म्हणे ॥ ४ ॥
रुषिवाक्य उत्तम जाण ॥ जें आइकतां निवति श्रवण ॥
भाविष्योत्तरपुराणि कथन ॥ वंशउत्पत्ती संपुर्ण सांगितलि जेथें ॥ ५ ॥
ते हे कथा पवित्र ॥ शैयाद्रिखंडिचा तर्क ॥
प्राकृतव्याख्यान समग्र ॥ बोलिजे हे ॥ ६ ॥
ब्रह्मोत्तरखंडिची कथा ॥ ये ग्रंथि आणिली समंता ॥
नारदोक्ति ते हि साकल्यता ॥ सांगितली जेथें ॥ ७ ॥
दशावतारकथा सुरस ॥ ऐकता हरति महादोष ॥
सायुज्यमुक्तिपद तयास ॥ जे श्रवण जालिया ॥ ८ ॥
दशावतार उत्पन्नता ॥ समुळ सांगतों आंता ॥
जेणें आनंद सर्वांचिया चित्ता ॥ ऋषिवदोक्ती ॥ ९ ॥

॥ श्लोक ॥

मत्छा पासुनि च्यारि ते नरहरी पर्यंत जाले कृती ॥
त्रैती वामन परशराम तिसरा श्रीराम शीतापती ॥
ऐसे हे अवतार सात मग तो द्वापारिचा आठवा ॥
श्रीकृष्ण कालि बोध्य वर्तत असे कल्कि पुढे दाहावा ॥ १ ॥

॥ वोवी ॥

हे दश अवतार ॥ अवतरलें ब्रह्म तेजाकार ॥
उत्पत्ति पाळक संहार ॥ स्वयें साकार आकारले ॥ १० ॥
जें निर्गुण गुणासि आलें ॥ स्वयें ब्रह्म चि प्रकाशलें ॥
विश्व व्यापुनि निराळें ॥ स्वयें खेळे स्वस्वरूप ॥ ११ ॥
जें अगम्य अगोचर ॥ कवण जाणे तयाचा पार ॥
म्हणोनि साष्टांग नमस्कार ॥ करितो देवादिदेवा ॥ १२ ॥
आतां प्रथम अवतार संखावतीं उदरीं ॥ मत्छे जन्मला अवधारी ॥
चैत्रशुद्धगुरुवारी ॥ जन्म जाला ॥ १३ ॥
पिता पुक्षराज ॥ हर्षित जाला सहज ॥
धन्य अवतार सोहंबीज ॥ प्रकाशलें आह्मा उदरी ॥ १४ ॥

पूर्वपुण्यसामर्थता ॥ आणिक पाळक अवस्था ॥
म्हणोन येणे जालें भगवंता ॥ शंखासुर वधावया ॥ १५ ॥
त्या उपर द्वीतिय अवतार ॥ माता कर्णावती सुंदर ॥
पिता काश्यपऋषि थोर ॥ तपस्विसूर्यसहस्त्र ॥ १६ ॥
ज्येष्ठशुक्लद्वीतिया भृगुवासर ॥ तद्दिनी जन्मला कुर्मावतार ॥
दैत्य निर्दाळिला महाथोर ॥ पाळकेस्थिति अपरांपर देवाची ॥ १७ ॥
देवें अवतरावें पशुशरिरीं ॥ पद्मावतींचिया उदरी ॥
भक्ता कारणें श्रीहरी ॥ तृतीये अवतार ॥ १८ ॥
वराहरूपें भगवंत ॥ अवतरला श्रीहरि साक्षांत ॥
वैशाखशुद्धतृतिया तिथ ॥ जन्मकाळ वराहरूपीं ॥ १९ ॥
चतुर्थ अवतार नृसिंह ॥ अवतरला चतुर्दशि शुद्ध वैशाखमास प्रसिद्ध ॥
माता चंद्रायाणि शुद्ध ॥ या परि नृसिंह जन्मला ॥ २० ॥
भक्त प्रल्हाद रक्षिला ॥ दैत्य हिरण्याक्ष निर्दाळिला ॥
+ + + + + + + + ॥ सायुज्या कारणें ॥२१॥
पांचवा अवतार वामन ॥ साक्षांत अवतरला नारायण ॥
शुद्धद्वादशि श्रावण ॥ तद्दिनि अवतरले ॥ २२ ॥
माता अदिति सुंदरी ॥ पिता कश्यपऋषि अवधारी ॥
वामने बळी घातला पाताळीं ॥ मही रक्षिली ॥ २३ ॥
ऐसा हा वामनअवतार ॥ साक्षांत ब्रह्म साकार ॥
ब्रह्मचर्य वेदाक्षर ॥ निपुण सर्वस्वीं ॥ २४ ॥
वैशाखशुद्धतृतिया ॥ परशराम जन्मला क्षत्रिय निर्दाळावया ॥
माता रेणुका गुणालया ॥ पिता जमदाग्नि ॥ २५ ॥
सावा अवतार परशराम ॥ जो साक्षांत परब्रह्म ॥
अवतरला नारायण ॥ धर्म रक्षावया ॥ २६ ॥
सातवा अवतार श्रीराम ॥ माता कौशल्या निधान ॥
तया उदरी ब्रह्मपूर्ण ॥ स्वयें आपण अवतरले ॥ २७ ॥
दशरथा आनंद जाला ॥ श्रीराम पाहे वेळोवेळा ॥
लावण्यरूप सांवळा ॥ अनुपम्य साजिरा ॥ २८ ॥
चैत्रशुद्धनवमी ॥ अलक्ष रूप ज्याचें अवतरलें मेदिनी ॥
देखोन संतोष सर्वांचिया मनीं ॥ श्रीराम परमनिधान ॥ २९ ॥
लावण्यरुपाचि मुस ॥ कळे आणला राजस ॥
उपमा न ये देतां तयास ॥ श्रीराम हृदयां सदृढ धरावा ॥ ३० ॥

आठवा अवतार श्रीकृष्ण ॥ देवकी उदरी जन्मला जाण ॥
श्रावणवद्यअष्टमी बुधदिन ॥ अवतार आठवा जाला ॥ ३१ ॥
वसुदेव पिता देवाचा ॥ एक म्हणति देव नंदाचा ॥
ठाव नाहि मायबापाचा ॥ अकुळी साचा श्रीकृष्ण ॥ ३२ ॥
तयासि कुळ ना गोत्र ॥ शाखा ना प्रवर ॥
स्वयें साक्षांत ब्रह्माकार ॥ देवादिदेव ॥ ३३ ॥
तयाचें विंदान सांगतां ॥ विस्तारें जाईल कथा ॥
म्हणोन तयाचे चरणी माथां ॥ ठेविला भावें ॥ ३४ ॥
जो साक्षांत ब्रह्म सदोदित ॥ आठवा अवतार श्रीकृष्णनाथ ॥
तयाचे चरणाचि मज आर्त ॥ हृदईं स्फुर्ती हरिनामें ॥ ३५ ॥
नवम अवतार बोध्यरूप ॥ माघशुद्धनवमी जन्मतिथ ॥
माता लिळावति आद्यवंत ॥ पिता व्यासऋषी ॥ ३६ ॥
बोध्यरुपि नारायण ॥ स्वयें अवतरला आपण ॥
जो साक्षांत परब्रह्म ॥ युगप्रमाण विंदाण केलें ॥ ३७ ॥
ऐसे हे अवतार जाले ॥ ते समुळ सांगितले ॥
साविस्तरि बोलिले ॥ अनवयुक्त ॥ ३८ ॥
पुढे कल्की दाहावा ॥ अवतार घेणे लागले देवा ॥
तयाचा जन्म बरवा ॥ त्याणे निवाडा करावा पापपुण्याचा ॥ ३९ ॥
ते कथा अद्यापि विलंब ॥ भविष्यें काथिलें व्यासें प्रतिबिंब ॥
ते सांगतां ग्रंथि पाल्हाळ प्रासिद्ध ॥ अनेक संमति बोलिले आहेत ॥ ४० ॥
नाना शास्त्रें वेवादती ॥ पुराणसंमति वित्पती ॥
व्यास वक्ता पुण्यमूर्ती ॥ ग्रंथरचना केली असे ॥ ४१ ॥
प्रथमऋषि पार्वतिमुनी ॥ तेथोनि उत्पाति ऋषिलागुनी ॥
तया पासोन ईशानजयो महाज्ञानी ॥ जन्मला जाणा ॥ ४२ ॥
ईशानजयोचा महाऋषी ॥ उत्पती जाली तयासी ॥
तया पासाव अंबऋषी ॥ जो शृष्टि माजी समर्थ ॥ ४३ ॥
अंबऋषिपासोनि ॥ जन्मला कश्यप महामुनी ॥
जो सर्वज्ञ अपरोक्षज्ञानी ॥ रचना मेदनी जयाची ॥ ४४ ॥
त्या पासोन जन्म सर्वांसी ॥ पुराणि प्रासिद्ध बोलिले रुषी ॥
तेरा राणियां जयासी ॥ तयां पासोन उत्पन्नता जाली ॥ ४५ ॥
त्या राणिया कवणकवण ॥ श्रोतें ऐका चित्त देऊन ॥
भाविष्योत्तरिचें निरोपण ॥ उत्पती समुळ सांगितली ॥ ४६ ॥

| | | |
|---|---|---|
| १ आदिती | २ दिती | ३ कद्रु |
| ४ वैनता | ५ सुताळिका | ६ सोमप्रभा |
| ७ रूपप्रभा | ८ कुंडळिका | ९ ब्रह्मदंडा |
| १० कंजनी | ११ पद्मावती | १२ कनकप्रभा |

१३ दळाणिका

ऐसिया राणिया त्रयोदश ।। आदिती पासोनि उत्पती देवांस ।।
तेतिस कोटि गणता तयांस ।। जालि प्रत्यक्ष ।। ४७ ।।
द्वीति पासोनि दानव जाले ।। ते बलाढ्य बोलिले ।।
दैत्यवंशी प्रवर्तले ।। श्रुष्टिमाजि ।। ४८ ।।
कद्रुचें नागकुळ ।। शेषवंश प्रबळ ।।
कद्रुपासोनि सकळ ।। उत्पत्ति तयांसी ।। ४९ ।।
वैनते उदरि उत्पन्न ।। अरुण गरुड दोघे जण ।।
पक्षिकुळिचे भूषण ।। दोघे बलाढ्य पैं ।। ५० ।।
आतां सुताळिका ।। प्रसुत जालि अष्टलोका ।।
उत्पत्ति तियेचि आईका ।। प्रत्यक्ष बोलिली ।। ५१ ।।
सोमप्रभेचे नवग्रह ।। दिशाचाक्रि जयांचा ठाव ।।
श्रुष्टिक्रम चालविती प्रत्यक्ष ।। जे सांगितले ।। ५२ ।।
रुपप्रभा प्रशवली ।। तेथोन वंशउत्पती जाली ।।
सूर्यसोमवंशावळी ।। तिये पासोन म्हणती पै ।। ५३ ।।
आणि ब्रह्मदंडा प्रशवली ।। वल्लीवृक्षउत्पति जाली ।।
अठरा भार गणती आली ।। ताडमाडआद्यकरोनी ।। ५४ ।।
आतां कुंडळणी जाणा ।। प्रशवली साटि सहस्त्र गणा ।।
अठ्यासि सहस्त्र ऋषिआद्यकरोन ।। उत्पन्नता जाली ।। ५५ ।।
आणि ते कंजनी ।। प्रशवली मेघां ततक्षणी ।।
घनद्रोणपवनपागुळा लागोनी ।। जन्म जाले ।। ५६ ।।
च्यारि मेघ तये उदरी ।। जन्मले चराचरी ।।
श्रुष्टिपाळक अवधारी ।। च्यारि मेघ ।। ५७ ।।
प्रळयि च्यारि वरुषती ।। मग रसातळा जाईल क्षिती ।।
भविष्य बोलिलें पुणती ।। शास्त्रि अनेक ।। ५८ ।।
आतां कनक प्रभा ।। प्रशुत जालि कां लगवगा ।।
साठि संवत्सर नारदा ।। प्रशवाले ते हे ।। ५९ ।।

आतां असुरदळणी ॥ प्रशवलि अमित्यवस्तु निदानीं ॥
मुक्ताफळें हिरेमाणिकें पुक्षराजपाषाण मेदिनी ॥ तिये पासोनि जाली॥६०
ऐसि हे उत्पति समुळ ॥ सांगितली निर्मळ ॥
निवाडा केला केवळ ॥ निपुणत्वें ॥ ६१ ॥
हे कथा महापावित्र ॥ जेथें सांगितलें उत्पत्तिचरित्र ॥
लाघवि साक्षांत परमेश्वर ॥ यका पासोनि अनेक ॥ ६२ ॥
रचना समुळ सांगितली ॥ ते प्राकृति बोलिली ॥
अर्थ सर्वांसि साकली ॥ प्रस्फुट आहे ॥ ६३ ॥
शैयाद्रिखंडिचें मत्त ॥ व्याख्यान केलें प्राकृत ॥
तरि हे परउपकारार्थ ॥ बोलिलों जे हे ॥ ६४ ॥
ब्रह्मोत्तरखंडि निवाडा केला ॥ तो हि साक्षसि बोलिला ॥
हा ग्रंथ विख्यात रचिला ॥ युगा युगी राहावा ॥ ६५ ॥
पंढरि युगे अठाविस ॥ पुराणि समंत तयेस ॥
तैसें शास्त्र हें सुरस ॥ युगा युगा ठाइं राहिलें ॥ ६६ ॥
जेथें निवाडा सर्व केला ॥ उत्पती सर्व बोलिला ॥
ऐका श्रोते चित्तयुक्ता ॥ युक्तार्थ सत्यमेव । ६७ ॥
ऐकतां निवर्ती श्रवण ॥ हराति दोष महादारुण ॥
पुराणिचें निरोपण ॥ भविष्यार्थ काथिला ॥ ६८ ॥
वक्ता भगवान् दत्त ॥ संमत बोलिले व्याशोक्त ॥
कथा महापवित्र ॥ उत्पती सर्वांची ॥ ६९ ॥

॥ इति श्रीब्रह्मोत्तरखंड भविष्योत्तरपुराणे
भगवान्‌दत्तसंवादे उत्पातिअवतारनिवेदन
नाम प्रथमोध्यायः ॥ १ ॥

---

## ॥ श्रीगणेशाय नमः ॥

ॐ नमो जी विनायका ॥ सर्व सिद्धींच्या नायका ॥
ज्ञानबोधा विश्वव्यापका ॥ कविमयंका वेदमूर्ती ॥ १ ॥
चाळकस्थिति अगम्य सर्वादी ॥ स्वयें सर्वश्री ऐक्य मांदी ॥
इछातित भक्तहृदीं ॥ कळासिद्धी अर्पिसी ॥ २ ॥
धरोनि हा चि विश्वास ॥ ग्रंथ आरंभितो सावकास ॥
जेणे पावन सूर्यवंश ॥ ते कथा सुरस वदवी देवा ॥ ३ ॥
व्यासें कथिलें भारत ॥ जें युगांतरि चालले सत्य ॥
तैसें च वाल्मीककृत्य ॥ कथा पवित्र बोलिला जो ॥ ४ ॥
श्रीराम सूर्यवंशी उत्पन्न ॥ वाल्मीकरुषि वदला आपण ॥
तैसें हें भविष्योत्तरपुराण ॥ ऋषिवाक्यें ॥ ५ ॥
अठ्यासि सहस्र ऋषेश्वर ॥ नानामतिं विस्तारले कल्पतरुवर ॥
जे सर्वउपमेचे सागर ॥ तयांसि मी थिल्लर काय वर्णू ॥ ६ ॥
तयांची नावें सांगतां ॥ विस्तारे जाईल कथा ॥
म्हणोनि तयांचे चरणी माथां ॥ ठेवोनि विनवितों ॥ ७ ॥
रिघोनि तयांसि शरण ॥ नमिले त्यांतिल चतुर्विस जण ॥
ते कवणकवण ॥ मुख्यत्विं पूर्ण सांगतों ॥ ८ ॥

| | | |
|---|---|---|
| १ प्रल्हाद | ९ कपिल | १७ अगस्ति |
| २ अत्रि | १० शौनक | १८ कौशिक |
| ३ वशिष्ट | ११ याज्ञवल्क | १९ वत्छ |
| ४ शुक | १२ जमदग्नि | २० पौलास्ति |
| ५ कण्व | १३ गौतम | २१ मकण |
| ६ पाराशर | १४ मुद्गल | १२ दुर्वास |
| ७ विश्वामित्र | १५ व्यास | २३ नारद |
| ८ भारद्वाज | १६ लोमस | २४ कश्यप |

मुख्यत्विं नामांकित ॥ सांगितलें जे ऋषि प्रतापवंत ॥
जे चाळक श्रृष्टिमाजि समर्थ ॥ वित्पन्न सर्वश्री ॥ ९ ॥
जयांचा आधार सर्वांसि ॥ धर्मस्थापना जयां पासी ॥
त्यांचिया उत्पन्नतेसी ॥ निंदी ऐसा कवण असे ॥ १० ॥

ज्यांची स्थापित कर्मे ॥ तीं चालति शुद्ध नेमे ॥
तीं कवण ऐशीं भविष्योत्तरपुराणें ॥ साकल्य आहेत ॥ ११ ॥
त्यांतिल हा एक अध्याये ॥ जेथें सांगितला सूर्यवंशशोमवंशसमुदाये ॥
क्षेत्रि पवित्र ऋषि अनुभवपर्व ॥ भविष्यार्थ बोलतों ॥ १२ ॥
कृता त्रैता द्वापार कलि ॥ एकाकि एक चाललीं ॥
परि रुषिवाक्यें राहिली ॥ युगा युगा ठाईं ॥ १३ ॥
प्रथमवर्ण ब्राह्मण ॥ जो सर्वशास्त्रिं निपुण ॥
तयासि हा चि अवगुण ॥ प्रतिग्रहकार यत् ॥ १४ ॥
ऋग् यजु साम अथर्वण ॥ ऋग्वेदा अष्ट भेद जाण ॥
शाहासि भेद यजुर्वेदा लागोन ॥ वेदि निवाडा असे ॥ १५ ॥
त्या परता क्षेत्रिवर्ण ॥ जो क्षेत्रधर्म दारुण ॥
मंत्रविद्या रुषि पासुन ॥ शिष्यवर्ग म्हणोन पावले ॥ १६ ॥
ते क्षेत्रि कवण कवणा पासुन ॥ सूर्य सोम दोघे जण ॥
सोमवंशउत्पती येथुन ॥ सांगतों आतां ॥ १७ ॥
ब्रह्मदेवा पासोन अत्रि जन्मला ॥ तया पासोन सोम जाला ॥
तो वंश वृद्धि पावला ॥ कवणे परी ॥ १८ ॥
चंद्रा पासाव बुध ॥ १ ॥ बुधा पासाव पुरुरवा ॥२॥ पुरुचा दक्ष ॥३॥
दक्ष पुस्करदिपीं रहिवास ॥ जो क्षेत्रि महाराजस ॥
अजिंत सर्वांसि सुरस ॥ नांदत असे ॥ १९ ॥
तयांसि कन्यारत्न जालें ॥ आदिती नाम ठेविलें ॥
कोटिदिनकरतेज फांकलें ॥ महास्वरूपता ते ॥ २० ॥
ते दक्षाची कंन्या आदिती ॥ उपवर जाली महासती ॥
भ्रतार ईछिला दिनमूर्ती ॥ तैसा त्रिभुवनि नसे दुजा ॥ २१ ॥
मग ते दक्षरायें ॥ पाहोनि सुमुर्त बरवा ॥
बोलाविलें कश्यपदेवा ॥ कंन्या अर्पिली तयासी ॥ २२ ॥
ते आदिती आणि कश्यप ॥ दोघें शोभलि वधूवर्य ॥
लग्न लागलें मोहोत्छायें ॥ वेदमंत्री ॥ २३ ॥
मग तेथोन सूर्यवंश ॥ तो सांगतों सावकास ॥
ऋषिवचन सुरस ॥ शास्त्रवाक्यें ॥ २४ ॥

आदिती पासाव सूर्याचा

मनु १ ईलु २

आहुति ३ नहु ४

अयाति ५ पुरु ६
जन्मेजय ७ महाभय ८
सयाति ९ हरीयाति १०
सार्वभौम ११ महाभोम १२
अयुताचन १३ अक्रोध १४
रुचि १५ मतिनार १६
सुनोजं १७ दुश्यंत १८
भरथ १९
माता
सकळि
तयाचा अभिमन्यु २०
आहुति २१ अगस्ति २२
अजामळ २३ श्रावण २४

तो श्रावण पुंण्यसिळ ॥ क्षेत्रधर्मि जो प्रबळ ॥
त्रिभुवनि कीर्त्ति अचळ ॥ जो केवळ विष्णुभक्त ॥ २५ ॥
तयाचे अगणित महिमान ॥ सर्व क्षेत्रि जयासिं शरण ॥
तेथे सूर्याचि आंगवण ॥ पुरु सके ॥ २६ ॥
मंत्रविद्या संपूर्ण ॥ युद्धी महादारुण ॥
पवाडे बंदिजन ॥ म्हणति ज्याचे ॥ २७ ॥
सूर्य जिंतिला क्षण न लगतां ॥ शरण म्हणोनि रक्षिलें आदित्या ॥
मग सुलक्षणा अर्पिली दुहिता ॥ श्रावणा लागी ॥ २८ ॥
तथोनि सोमवंश आधार ॥ धरिला असे साचार ॥
परंपरा भविष्योत्तर ॥ सांगतसे ॥ २९ ॥

सोभद्र १ परीक्षिती २ भीम प्रदिप्त ३
शांतन ४ विचित्रवीर्य ५ पंडु ६
अर्जुन ७

पांडवकथा अनुपम्य ॥ अनुपम्य वदला ऋषिवर्य ॥
शोमवंशि नृपवर्य ॥ महाक्षेत्रि दारुण ॥ ३० ॥
ज्यांसि कळिकाळ शरण ॥ क्षेत्रधर्मि निपुण ॥
ज्यांसि साह्य नारायण ॥ सर्वार्थि तीष्टत ॥ ३१ ॥
बळाढ्य भीमा सारिसा ॥ कवण पुरे तयाचे आयासा ॥
मुशळ गदा अतुल्य बहुवसा ॥ प्रचंड जी हे ॥ ३२ ॥

तैसा च अर्जुन शुभट ॥ जो क्षेत्रिया माजि मुगुट ॥
हनुमा ध्वजस्तंभि नीकट ॥ पणि जिंतिला ॥ ३२ ॥
जेण्हे अधोदृष्टि वींधिलें चित्र ॥ श्रुभद्रा जिंतिली पवित्र ॥ ३३ ॥
आभिमन्य तयाचा कुमर ॥ त्याची परंपरा ॥ ३४ ॥
जे नांदति हस्तनापुरी ॥ त्याची परंपरा चालली अवधारी ।
ते कथा सांगितली कुसरी ॥ भविष्योत्तरपुराणी ॥ ३५ ॥

| | | |
|---|---|---|
| अभिमन्य १ | परीक्षिती २ | जन्मेजय ३ |
| नरवाहन ४ | वेणुवैस्यराज ५ | अजानबाहु ६ |
| सुबाहो ७ | भीमसेन ८ | कृपामान ९ |
| उर्ध्वबाह १० | सौभद्र ११ | परीक्षिती १२ |
| साहादेव १३ | मदन १४ | कुमार १५ |
| केदार १६ | लक्षमण १७ | द्रोण १८ |
| धनंजय १९ | अर्जुन २० | विक्रम २१ |
| मेघनाद २२ | देवदत्त २३ | त्रीविक्रम २४ |

त्रीविक्रम राजा कुशळ ॥ कवण बांधि तयासि सळ ॥
क्षेत्रिया माजी प्रबळ ॥ शोमवंशि जो ॥ ३६ ॥
सदावृत्ति राजन्न ॥ नेमधारि त्रीविक्रम ॥
वरदि उपाशक त्रिलोचन ॥ व्रत नेम सदा चालवी ॥ ३७ ॥
शोमवंशासि व्रत सोमवार ॥ यज्ञोपवीत निर्धार ॥
रुद्रगायित्री बिजाक्षर ॥ जप त्रिकाळी ॥ ३८ ॥
स्नानसंध्या देवार्चन । शीवभक्ति कथाकीर्तन ॥
वेदमंत्री क्रियाकर्म । ब्रह्मभोजन सदाकाळी ॥ ३९ ॥
व्रतबंध यकादशवर्षी । विवाह उपवरि राजसी ॥
रजशिळा चतुर्थदिवशीं । शुद्ध होणें ॥ ४० ॥
सिंहासन पंचकलशीं । मुगुट मंजिरि घोषीं ॥
छत्रे पांच शोभेसीं । वधूवरा कारणें ॥ ४१ ॥
वीरकंकण बाहुबंद । तोडर चरणि प्रसिद्ध ॥
बाहुटा पीतवर्ण उदित । नानावाद्यें ॥ ४२ ॥
अश्वासन गजासन । वधूहास्तिणी आसन ॥
पुष्पमाळिका शुंडि धरून । अर्पि हास्तिणी ॥ ४३ ॥
सोहाळा दिवस पांच । मढमंडपस्थापना साच ॥
त्रितिय दिवसिं मातुळ वधुवरें आर्च । पूजनादिक संपादी ॥ ४४ ॥

चतुर्थ दिवसीं उद्यापन । सारिती लज्यायज्ञ ॥
करिती पादप्रक्षाळण । वेदमंत्री ॥ ४५ ॥
पंचम दिवसी बोळवण । होये ब्राह्मण–भोजन ॥
क्षेत्रियांसि हाचि धर्म । सांगितला असे ॥ ४६ ॥
याचिया रिती सूर्यवंश । सूर्य विष्णूव्रत तयांस ॥
सूर्यभक्ति सांग्य वेदमंत्र । कर्मनिष्ट जे ॥ ४७ ॥
सदा ऋषि तयां पूज्य । गोत्रें द्वादश ऋषिवाक्य ॥
धर्मनिष्ट उपाशक । विष्णुभक्ति ॥ ४८ ॥
ऐसा निर्वाह सांगितला । अजामेळा पासाव वंश चालिला ॥
तो सूर्यवंश वर्णिला । भविष्योत्तर पुराणीं ॥ ४९ ॥

| | | |
|---|---|---|
| अजामेळ १ | श्रावण २ | श्रुशुर्मा ३ |
| दक्ष ४ | ईंद्रसेन ५ | महीपाळ ६ |
| विक्रमादित्य ७ | सोभद्र ८ | कपिलाक्ष ९ |
| श्रावण १० | अजानबाहो ११ | धुम्रकेत १२ |
| दुस्यासन १३ | श्रीदत्त १४ | कामांकुश १५ |
| आदित्य १६ | सुबाहु १७ | धनंजय १८ |
| विमळ १९ | केदार २० | वीरभद्र २१ |
| विरुपाक्ष २२ | वेंकट २३ | विश्वपाळ २४ |

यका पासोन येक । परंपरा चालिली देख ॥
पूर्वदिशे राजे कवतुक । चालती जाणा ॥ ५० ॥
विश्वपाळराजा पवित्र । सूर्यउपासक सर्वत्र ॥
त्रीभुवनि अगाध कीर्त । जयाचि असे ॥ ५१ ॥
शोमवंशाचिया कन्या ॥ सूर्यवंशासि देति आदरें करोनियां ॥
विवाह ॐपुण्या ॥ चालत असे ॥ ५२ ॥
क्षेत्रिय महादारुण ॥ जे धनुर्धरविद्यापूर्ण ॥
तयां सन्मुख राहों सके कवण ॥ जे क्षेत्रि बळाढये ॥ ५३ ॥
ज्यांची किर्ती दिगांतरी ॥ वाखाणिली भविष्योत्तरी ॥
ते सूर्यशोमवंशि क्षेत्री ॥ चालति सत्य ॥ ५४ ॥
आतां सोमवंशिचा नृपवर ॥ राव विरुपाक्ष महाथोर ॥
क्षेत्रधर्मि धनुर्धर ॥ महासमर्थ ॥
तो असतां हस्तनापुरी ॥ कथा अपूर्व अवधारीं ॥
जे ऋषि वदला वैखरी ॥ अनुपम्ये ॥ ५६ ॥

राजकंन्या नागरी ॥ सुलोचना नाम सुंदरी ॥
सखियां समवेत गंगे भितरी ॥ क्रीडा करित होती ॥ ५७ ॥
जळाक्रिडा सखियां समवेत ॥ खेळत असतां गंगेत ॥
तवं अपूर्व वर्तलें तेथ ॥ तें आईका श्रोतेहो ॥ ५८ ॥
विचित्रावियं भृगुनंदन ॥ वह्याळि खेळतां आला नदी टाकुन ॥
दृष्ठि पडलें निधान ॥ सुलोचना ते ॥ ५९ ॥
त्याण्हे पाचारिलें तयेसी ॥ तुं कवणाचि कवण होसी ॥
ते भयाभित वदनेसी ॥ राहिली जाणा ॥ ६० ॥
पुणती विचारि भृगुनंदन ॥ तु कवणाचि गे कवण ॥
ते न बोले चि वचन ॥ म्हणोन क्रोधे खवळला ॥ ६१ ॥
रथा खाले उतरोनी ॥ धावोन धरिली तियेचि वेणी ॥
वोढोन काढिली ततक्षणी ॥ जळा बाहेरी ॥ ६२ ॥
आधि च हो ति नग्न ॥ मनि शंकलि दारुण ॥
हृदइं स्मरिला पंचवदन ॥ तो ततक्षणि पावला ॥ ६३ ॥
वस्त्र लेवविलें अनुपम्य ॥ सन्मुख राहिला त्रिलोचन ॥
पुसे क्षेत्रिया लागुन ॥ तुं कवण होसी ॥ ६४ ॥
येरु बोलिला मी भृगुनंदन ॥ नावं माझें विचित्रवियं जाण ॥
सूर्यवंशि नृपति पूर्ण ॥ जाण सत्ये ॥ ६५ ॥
ऐकोनि तयाचें उत्तर ॥ बोलता जाला कर्पुरगौर ॥
निर्लज्य होउनि नागर ॥ धरिली तुवां ॥ ६६ ॥
तुं नव्हसि सूर्यवंशिचा क्षेत्री ॥ महा–अपवित्र दुराचारी ॥
निरापराधें धरिली नागरी ॥ का रे पतिता ॥ ६७ ॥
निष्ठुर शब्द ऐकुनी ॥ वीचित्रवीर्य खोंचला मनी ॥
जैसा घृतें सिंपिला अग्नी ॥ तैसा कोपला ॥ ६८ ॥
म्हणे तुं कवण होसी ॥ मज पुढा पैजा बोलसी ॥
युद्धी सन्मुख जरि राहासी ॥ तरि च सत्य ॥ ६९ ॥
जाई येथुनि त्वरिता ॥ नाहिं तरि मुकसि प्राणासि आंता ॥
म्हणोन वोढिता जाला त्वरिता ॥ तया नागरिसी ॥ ७० ॥
शंभु कोपला दारुण ॥ त्रिशुळे हाणितला वीचित्रविर्य जाण ॥
हृदइं रुतला त्रिशुळ खडतरोन ॥ तेणे गेला चांचरी ॥ ७१ ॥
क्षणेक मूर्छना आली ॥ अष्ट दिशा झांकोळली ॥
सुर्यासि चिंता वर्तली ॥ मग उतरला आकाशिहुन ॥ ७२ ॥

अमृतदृष्टि विलोकिला ॥ वीचित्रवीर्य सावध जाला ॥
धनुष्या हात घातला ॥ साहे म्हणोनियां ॥ ७३ ॥
वीचित्रवीर्य क्षेत्रि दारुण ॥ संग्रामि प्रवर्तला पंचानन ॥
शर वर्षला अमित्य संधान ॥ महादेवा वरी ॥ ७४ ॥
त्रैलोक्यनायक निवारी ॥ वीचित्रवीर्य अचुक संधान करी ॥
जैसा स्वापदा वरि केसरी ॥ तैसा प्रवर्तला ॥ ७५ ॥
युद्ध जाले घोरांदर ॥ पिनाक जिंकिला सत्वर ॥
प्रसन्न म्हणोनियां कर्पुरगौर ॥ बोलला वचनी ॥ ७६ ॥
मग म्हणे वीचित्रविर्य ॥ बोलिला उत्तर ॥
मज अर्पिजे हे नागर ॥ सुलोचना ॥ ७७ ॥
मग विरुपाक्षासि वृत्तांत सांगितला ॥ वीचित्रविर्य भेटविला ॥
सोहळा पांच दिवस संपादिला ॥ मग महेश गेला कैलासा ७८
सुलोचना आणि वीचित्रविर्य ॥ गृहिं आलिं वधूवर्य ॥
भृगु सुखि देखोनि सौंदर्य ॥ सुलोचनाचे ॥ ७९ ॥

| | | |
|---|---|---|
| वीचित्रविर्य १ | सुबाहुविर्य २ | वैरोचन ३ |
| कपिलाक्ष ४ | कपिलध्वज ५ | विमळध्वज ६ |
| शुद्रसेन ७ | दुंदुभी ८ | विमळार्जुन ९ |
| कुकर्मा १० | सार्वभोम ११ | वज्रबाहो १२ |
| सुसुपाळ १३ | वीरभद्र १४ | भद्रसेन १५ |
| कृपासेन १६ | केशवादित्य १७ | सुशर्मा १८ |
| हेमाद्री १९ | सासार्जुन २० | देवधर्म २१ |
| वीरधर्म २२ | वितीनार्य २३ | वीरभद्र २४ |

सूर्यवंशींचे नृपवर ॥ जे प्रतापि महाधनुर्धर ॥
नांदति पूर्व दिसे साचार ॥ महाबलाढय ॥ ८० ॥
क्षेत्रियां माजि पंचानन ॥ समरंगणि महादारुण ॥
कीर्ति दिगंतरि तयांजि जाण ॥ वाखाणिली असे ॥ ८१ ॥
ते पवित्र पुण्यसिळ ॥ ब्रम्हार्पणि औदार्य केवळ ॥
ज्यांचि कीर्ति परम विमळ ॥ चालत असे ॥ ८२ ॥
दैत्य निर्दाळुनि समग्र ॥ राज्य भोगिती पवित्र ॥
ज्यांसी साह्ये श्रीरामचंद्र ॥ सूर्यवंशी ॥ ८३ ॥

| | | |
|---|---|---|
| दशरथ १ | श्रीराम २ | लहुअंकुश ३ |
| भरथ ४ | शत्रुघ्न ५ | अजानबाहु ६ |

विमळार्जुन ७ सर्वोत्तम ८ महाभोम ९
क्षेत्रिपंचानन ॥ जे ना गवसति कवणा लागुन ॥
ज्यांची कीर्ति त्रिभुवन ॥ फाकलि असे ॥ ८४ ॥
ज्यांहि सोमयाग केला ॥ जिहि अश्वयाग संपादिला ॥
ज्याहि नरयाग सांगितला ॥ शास्त्रयुक्त ॥ ८५ ॥
ज्याहि पृथ्वि जिंकिली ॥ दैत्यकुळें निर्दाळिलीं ॥
जयजयकारें गर्जली ॥ मही जयांसी ॥ ८६ ॥
ज्याहि धर्म रक्षिला ॥ देवांचा बंद सोडिला ॥
आपला धर्म चालता केला ॥ गौब्राह्मण रक्षिलें ॥ ८७ ॥
ज्या वंशि अवतार जाले ॥ साक्षांत विष्णु अवतरले ॥
रामकृष्ण प्रवर्तले ॥ जया वंशि ॥ ८८ ॥
उत्तम क्षेत्रि दोनी वंश जाण ॥ आणि तीसरा शेषवंश सुजाण ॥
शेष पाताळे नांदतो आपण ॥ ज्याणे पृथ्वि धरियेली ॥८९॥
तो शेष सर्वा माजि उत्तम ॥ जयाचा विलासि नारायण ॥
ब्रह्मक्षेत्रि महानिपुण ॥ राजाधिराज ॥ ९० ॥
ज्याणे अवतार धरिले ॥ विष्णुसवें विजें केलें ॥
माहिमंडाळि राज्य भोगिलें ॥ ते कथा पुढें सांगेन ॥ ९१ ॥
आतां शोमवंशिचे नृपवर ॥ जे दक्षणे आले धनुर्धर ॥
त्याचि गोत्रें प्रवर ॥ सांगेन ति आइका आता ॥ ९२ ॥

प्रह्लद १ त्रीप्रवर ३ योगेश्वरी
जमदाग्नि २ पंचप्रवर ५ येकविरा
अत्रि ३ त्रीप्रवर ३ माहेश्वरी
नारद ४ पंचप्रवर ५ त्वरिता
वेंकट ५ त्रीप्रवर ३ दुर्गा
शुक ६ त्रीप्रवर ३ चंडिका
कण्व ७ त्रीप्रवर ३ काळिका
कपिल ८ त्रीप्रवर ३ रेणुका
शौनक ९ त्रीप्रवर ३ वज्राय
वल्क्य १० पंचप्रवर ५ माहालाये
मुद्गल ११ पंचप्रवर ५ माहालाये
लोमस १२ पंचप्रवर ५ कुमारी
देवदत्त १३ त्रीप्रवर ३ काळी

बकदालभ्य १ पंचप्रवर ५ प्रभावती
कौंडण्य २ त्रीप्रवर ३ कुमारिका
पद्माक्ष ३ प्रवरसत ७ जोगेश्वरी
सास्वन ४ त्रिप्रवर ३ महालक्ष्मी
भद्राक्ष ५ त्रीप्रवर ३ वज्राये
क्षवण ६ पंचप्रवर ५ पद्मावती
पारस्वत ७ त्रीप्रवर ३ हरबाये
वैरक्ष ८ पंचप्रवर ५ चांपादेव
गैातम ९ पंचप्रवर ५ येकवीरा
श्रीपत १० त्रिप्रवर ३ चंडिका
वशिष्ट ११ त्रिप्रवर ३ हरडाये
नागेश्वर १२ प्रंवर त्रि ९ महाबाये
वछ १३ त्रीप्रवर ३ नारायणी

| | |
|---|---|
| शांतन १४ त्रीप्रवर ३ त्वरिता | हरिद्र १४ पंचप्रवर ५ महालाये |
| विरुपाक्ष १५ त्रीप्रवर ३ बगला | त्रैंबक १५ पंचप्रवर ५ हरडाये |
| त्रिपुर १६ पंचप्रवर ५ दीपिका | विश्वामित्र १६ प्रवर ७ ललिता |
| येकश्रृंग १७ त्रीप्रवर ३ क्षेत्रि | अंगिरा १७ त्रिवर ३ माहेश्वरी |
| तांतोऋषि १८ त्रीवर ३ लक्ष्मी | श्रीचंद्र १८ त्रिप्रवर ३ चंदनदेवी |
| गंभिर १९ त्रीवर ३ पार्वती | जनार्दन १९ त्रिप्रवर ३ माहेश्वरी |
| वसुदेव २० त्रीवर ३ दुर्गा | भारद्वाज २० त्रीवर ३ रक्तदंति |
| कर्पुर २१ पंचप्रवर ५ वज्राय | भृगु २१ पंचप्रवर त्वरिता |
| भृगु २२ त्रीप्रवर ३ वेणु | मित्राक्ष २२ प्रवर ५ चंद्रायणी |
| द्रौपद २३ त्रीप्रवर ३ पार्वती | कश्यप २३ पंचप्रवर ५ रुद्रायेणी |
| शुक्षमण २४ पंचप्रवर५ द्रोपदी ललिता | अंबऋषि २४ पंचप्रवर ५ सिंव्हाये |

हे राजे दक्षण दिशे राहिले याचि गोत्रें ही गोत्रें शोमवंशास ॥ छ·
ऐसिं गोत्रें सांगितली ॥ शोमवंश वंशावळी ॥
भाविष्योत्तर बोलिली ॥ शैयाद्रिखंडि निवाडा आहे ॥ ९३ ॥
दुसरा निवाडा ब्रह्मोत्तरखंडी ॥ तेथें बोलि असे उघडी ॥
जे भविष्योत्तरि कथा बरवीं ॥ व्यासें बोलिली असे ॥ ९४ ॥
ऋषिवाक्यें संपुर्ण ॥ जेऐकतां निवति श्रवण ॥
ब्रह्मोत्तरखंडिचें निरोपण ॥ कथा अनुपम्य साजिरी ॥ ९५ ॥
जैसें व्यासवाक्य उत्तम ॥ ऐकतां हराति दोष दारुण
भविष्योत्तरिचें निरोपण ॥ जन्मेजयकृत्य ॥ ९६ ॥
जैसे परीक्षितिसीं श्रवण जालें ॥ त्याचें दोष गेले ॥
शोमवंशिउद्धरिले ॥ पूर्वज तेण्हे ॥ ९७ ॥
ते हे कथा पवित्र ॥ कलयुगि राहिला साक्षात्कार ॥
शोमवंश महासमुद्र ॥ वरदिज हे ॥९८॥
असंख्य संवत्सर लोटले ॥ युगप्रमाण चालले ॥
हस्तनापुरि वर्तलें ॥ अपुर्व येक ॥ ९९ ॥
हस्तनापुरि राजा शामकर्ण ॥ शोमवंशि क्षेत्रि दारुण ॥
वह्याळि खेळतसे आपण ॥ कोटिपर्वति तोगेला ॥ १०० ॥
तों ते पर्वति महास्थान ॥ लिंगाकृति आहे जाण ॥
कोटि तिर्थाचे महिमान ॥ शोभा दारुण शोभते ॥ १०१ ॥
नाना वृक्ष मंडित ॥ पुष्पें सर्वदा घवघवित ॥
तेथें गुंफा शोभांकित ॥ देखिली रायें ॥ १०२ ॥

ते गुंफेमाझारी ।। आसनि बैसलीसे सुंदरी ।।
लावण्यरुप चराचरी ।। जे अनुपम्य ।। १०३ ।।
ते रायें दृष्टि देखिली ।। जैसि विद्युल्लता भासली ।।
रांया मुर्छना आली ।। विरहता बाणालि आंगी ।।१०४ ।।
क्षण येक सावध होउनी ।। राव उतरला अश्वावरोनी ।।
सन्मुख उभा राहोनी ।। विनवों लागला ।। १०५ ।।
कवण होसि तूं नागरी ।। सांगे मजसिं झडकरी ।।
कवण तुझा साहाकारी ।। हे स्थळी ।। १०६ ।।
तुं कवणाचि सुंदरा ।। कीं यद्यपि कुमारा ।।
हा निर्धार सत्वरा ।। सांगिजे मज ।। १०७ ।।
येरी होति ध्यानस्त ।। मौन्य प्रकार दृढवंत ।।
सुशिळ आचार्यवंत ।। जपमाळिका ।। १०८ ।।
राजा विचारि आपुले मनी ।।प्रतिउत्तर न बोले कामिनी ।।
राजा विव्हळ कामबाणी ।। ह्मणे कैसें करावें ।। १०९ ।।
की हे आदिशक्तिमहंमाया ।। कि अपसरा देवलोकिचिया ।।
हे बैसालि असे या ठाया ।। काये ह्मणोनी ।। ११० ।।
ऐसा विचार करितां राजयासी ।। दीन गेला अस्तमानासीं ।।
तेथे झाली निर्सा ।। गुंफेमाजीं ।। १११ ।।
तंव तिये ध्यान विसर्जिलें ।। दृष्टि राजयातें देखिलें ।।
मग पुसों आदरिलें ।। तयाप्रती ।। ११२ ।।
तुं कवणाचा कवण होसी ।। कवण देशिं नांदसी ।।
या गुंफे केंवि आलासि ।। कवणे परी ।। ११३ ।।
येरु ह्मणे मी राजा शोमवंशी ।। हस्तनापुरि नांदतो परियेसी ।।
वह्याळि खेळतां गुंफेसी । आलों येथें ।। ११४ ।।
तुझें लावण्य देखोनी ।। भुललो असे मी कामबाणी ।।
आतां विनति आईकोनी ।। अनुसर देई ।। ११५ ।।
येरि ह्मणे मी उपवरी ।। भद्राक्ष ऋषिची कंन्या अवधारी ।।
तपास्वि ब्रह्मचारी ।। असे येथे ।। ११६ ।।
तुं क्षेत्रि मी ब्राह्मणी ।। हा अधर्म केवि तुझे मनी ।।
जें ब्रह्मादिका अमान्य पुराणीं ।। तें केवि घडे ।। ११७ ।।
रुद्राक्ष ऋषि माझा पिता ।। जो तपस्वि सूर्य जैसा तत्वता ।।
त्याचि मी दुहिता ।। येथे असे ।। ११८ ।।

मज पाहे ऐसा कवणया त्रिभुवनी ॥ शापें शोषिन मेदिनी ॥
तेथे बापुडें तु काये क्षत्रि मज लागुनी ॥ वरो शकसी ॥ ११९ ॥
ऐसे वचन बोलिली तिक्ष्ण ॥ ऐकोन कोपला शामकर्ण ॥
जैसा धृतें सिंपिला अग्न ॥ हात घालोन धरली केशी ॥१२०॥
गजबजिली ते सुंदरा ॥ हा हा शब्द वदली अवधारा ॥
तापसि महागंभिरा ॥ शाप वदालि दारुण ॥१२१॥
तुं होसिल अंधककुब्ज ॥ निर्वंश जाईल सहज ॥
पुरुषत्व नाहि तुज ॥ अमंगळ पापरासी ॥१२२ ॥
ऐसे शापवचन जाले ॥ तें ततक्षणि फळलें ॥
ऊशाप मागों आदरिलें ॥ शामकर्णे तये वेळीं ॥१२३ ॥
कोटि ब्रह्मकन्या उद्यापन ॥ द्रव्यद्वारि कन्यादान ॥
चतुर्विंश वरुषे या पर्वति स्थापन ॥ वास करिसी ॥१२४॥
मग निसी क्रमिली ॥ सूर्यप्रभा फाकली ॥
राया सेवकासि साद घाली ॥ तें आले ततक्षणी ॥ १२५
मग राजा तेथोन उचलिला ॥ सुखासनि बैसविला ॥
हस्तनापुरासि आणिला ॥ अंधकुब्ज ॥ १२६ ॥
आश्चिर्य केलें सकळीं ॥ काये जालें वनस्थळी ॥
वृत्तांत सांगितला सकळी ॥ प्रधानवर्गासी ॥ १२७ ॥
आईकेनि वृत्तांत ॥ द्विजकुळासि केला आमंत ॥
ऊशाप सांगितला सर्वा प्रत ॥ ऋषिकन्येचा ॥ १२८ ॥
जेथें कन्या असे उपवरी ॥ त्याणं द्रव्य न्यावें मंदिरी ॥
पुण्य मज लागि अवधारी ॥ दिधलें पाहिजे ॥ १२९ ॥
या परि कोटि उद्यापनें केलीं ॥ रायासि दृष्ट आली ॥
मग प्रयाणा उतावळि ॥ केली राये ॥ १३० ॥
प्रयाण केलें कोटिपर्वती ॥ प्रधाना समवेत विप्रमूर्ती ॥
जावोन राहिले पर्वती ॥ चतुर्विंश वरुषें ॥१३१ ॥
तेथे देवालय बांधिलें ॥ कोटि यज्ञ केले ॥
रायाचें शरिर दृढ जाले ॥ दिव्यरुप ॥ १३२ ॥
मग ऊशाप जाला ॥ कुळि पुत्र उपजला ॥
नाव काळकोट ठेविता जाला ॥ रायें तयाचें ॥ १३३ ॥
त्या काळकोटा पासुन ॥ वंश वृद्धी पावला जाण ॥
ते समुळ सांगेन ॥ आईका आतां ॥ १३४ ॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| काळकोट | १ | कृतांतकाळ | २ | देवदत्त | ३ |
| अयाती | ४ | कपिलाक्ष | ५ | लक्षमण | ६ |
| वीरभद्र | ७ | द्वारकभीम | ८ | केदार | ९ |
| कपिलाक्ष | १० | विरुपाक्ष | ११ | सोमदत्त | १२ |
| भद्राक्ष | १३ | चंद्रसेन | १४ | हेमवंत | १५ |
| बाळिभद्र | १६ | अर्जुन | १७ | अंकुश | १८ |
| ताम्रध्वज | १९ | नीळध्वज | २० | उग्रसेन | २१ |
| विश्वपाळ | २२ | देवगिरी | २३ | चंद्रसेन | २४ |

इतुके राजे नांदले नवकोटि पर्वती ॥ त्याचि परंपरा चालिलि तेथें ॥
पुढें कथा वर्तलि सत्य ॥ ते आईका ॥ १३५ ॥
इंद्रशेन राजा तेथिचा ॥ प्रतापि धनुर्धर साचा ॥
धार्मिष्ट बोलणें सत्य वाचा ॥ सदावृती ॥ १३६ ॥
नांदतां नवकोटि पर्वती ॥ कथा वर्तलि पुणती ॥
ते ऐकावि श्रोतीं ॥ ऋषिवाक्ये ॥ १३७ ॥
उज्जनि नगरिचा नृपवर ॥ शांतनादित्य धनुर्धर ॥
धार्मिष्ट महाथोर ॥ दानसूर प्रतापि तो ॥ १३८ ॥
नांदतां उज्जनिनगरी ॥ कंन्या असे तयाचि उपवरी ॥
नांवें पद्मावति सुंदरी ॥ नागरा ते ॥ १३९ ॥
स्वयंवर मांडिलें तियेचें ॥ राजे मिळाले देशोदेशिचे ॥
इंद्रशेन स्वयंवरातें ॥ गेला तेथें ॥ १४० ॥
शांतनादित्यें पण बांधिला ॥ वज्रविहु असे उभारिला ॥
जो तिहि शरि भंगिल तयाला ॥ कंन्या आणि राज्य ॥ १४१ ॥
ऐसा पण दुर्घट ॥ राव पाहाति सकळिक ॥
येकमेकां विचार देख ॥ मांडला तेथें ॥ १४२ ॥
ऐसें असतां तया स्थानी ॥ राव इंद्रशेन बोले वचनी ॥
नीर्विर्य होता आम्हा लागुनी ॥ अपेश असे ॥ १४३ ॥
शोमवंशि आम्हासि उत्पती ॥ ज्याची युगांतरि किर्ती ॥
ते आम्ही धर्ममूर्ती ॥ काये आम्हा प्रति सांगताहे ॥ १४४ ॥
क्षण न लगतां वज्रविहु भंगु ॥ कीं भुगोळ पालथा घालुं ॥
आज्ञा घेउनि कल्होळु ॥ गेला तेथे ॥ १४५ ॥
प्रथम बाणि विहु भंगिला ॥ दुसरा बाण कोठे टाकु पुसता जाला ॥
तें देखोनि संतोषला ॥ शांतनादित्य ॥ १४६ ॥

हस्तिणि धावोन आली ॥ माळ कंठि घातली ॥
देविं पुष्पवृष्टि केली ॥ स्वर्गी होउनिया ॥ १४७ ॥
ॐ पुण्या वेदमंत्रे जालें ॥ नाना वाद्यें वाजो लागलें ॥
राज्य सर्व अर्पिलें ॥ राया चंद्रसेनासी ॥ १४८ ॥
सोहळा संपादिला आनंदें ॥ दाने वांटिली अगाधें ॥
राज्य करिती स्वानंदे ॥ शांतनादित्य आणि इंद्रसेन ॥ १४९ ॥
तेथे इंद्रशेनाची परंपरा ॥ उज्जनिनगरि अवधारा ॥
ते सांगतो सविस्तरा ॥ आईका श्रोते ॥ १५० ॥

| | | |
|---|---|---|
| इंद्रसेन १ | चंद्रशेन २ | रामसेन ३ |
| महिंद्र ४ | पुरंद्र ५ | प्रतापसेन ६ |
| नीळसेन ७ | गंधर्वसेन ८ | सोभद्र ९ |
| पुरंदर १० | इंद्रसेन ११ | गंधर्वसेन १२ |

दीनमुर्ति राजा गंधर्वसेन ॥ नांदतां उज्जनिनगरि जाण ॥
कथा वर्तलि गहन ॥ ते आईका आतां ॥ १५१ ॥
कोणे येके दिवसी ॥ राजा गेला पारधिसी ॥
वनि हिंडतां तयासी ॥ अपुर्व वर्तले अवधारा ॥ १५२ ॥
अपसरा खेळति जलक्रिडा सरोवरी ॥ वस्त्र ठेवोन वृक्षावरी ॥
गंधर्वसेन ते अवसरी ॥ पावला तेथें ॥ १५३ ॥
तंव त्या देखिल्या नग्न ॥ रायासि बाणला कामबाण ॥
उभा राहिला वस्त्र घेवोन ॥ सरोवरतिरी ॥ १५४ ॥
तें देखोनि अप्सरा ॥ क्रोधें खवळल्या अवधारा ॥
शाप वदल्या दुर्धरा ॥ गर्धव होसि म्हणोनी ॥ १५५ ॥
तें ऐकुनि शापवचन ॥ हृदई खोचला गंधर्वशेन ॥
ऊशाप मागों आदरिलें त्या लागुन ॥ विनती करोनियां ॥१५६॥
मग दीधला ऊशाप ॥ रात्रि पुरुष होसि साटोप ॥
दिवसा गर्धवशरिर प्राप्त ॥ होसि निरुतें ॥ १५७ ॥
ऐसा ऊशाप ऐकोन ॥ राजा गर्धवशरिर झाला जाण ॥
सेवक विस्मय करिती मनी ॥ अपुर्व जाण ॥ १५८ ॥
दिवस तेथें क्रमला ॥ निसी होताच पुरुष जाला ॥
मग ग्रहासि आला ॥ राजा गंधर्वसेन ॥ १५९ ॥
अपुर्व सर्वांसि जालें ॥ राया शापवचन घडले ॥
नाव गर्धवसेन पावले ॥ राजेंद्रासी ॥ १६० ॥

मग राज्य भृतहरासि दिधलें ॥ तयास सिंहासनि बैसविलें ॥
त्याणे उज्जनिचें राज्य केलें ॥ संवत्सर ९० ॥ १६१ ॥
मग तेथे अपुर्व वर्तले ॥ रायासि ब्राह्मणे अमरफळ आणुनि दीधलें ॥
तें फळ रायें राणिये प्रति अर्पिलें ॥ मनोभावें ॥ १६२ ॥
मग ते अंगनसेना ॥ परद्वारि प्रवर्ते जाणा ॥
तें फळ तिण्हे अश्वदासा ॥ प्रति अर्पिले ॥ १६३ ॥
त्याण्हे तें फळ सेणपुरिसि दीधलें ॥ तिणे तें घेवोन बीजें केलें ॥
तें भृर्तहरिने दृष्टि देखिलें ॥ मग आणिलें मंदिरी ॥ १६४ ।
मग बोलावोन द्विजोत्तम ॥ फळ दाखविलें उत्तम ॥
तें देखोन आश्चिर्य जाण ॥ करि वेदमूर्ती ॥ १६५ ॥
ब्राह्मण विनवि अमृतवचनी ॥ राया तू सत्यवादी कृपापर्णी ॥
हें फळ स्वता भक्षिलें नाहि कीं ॥ हे सांगिज नृपवरा ॥ १६६ ॥
तेधवां राव खोंचला मनी ॥ म्हणे विपरित जालि हे करणी ॥
बोलाविली कामिनी ॥ सभेमाजी ॥ १६७ ॥
सत्य सांगे पतिव्रते ॥ तुज म्या फळ दिधलें होतें ॥
तें काये केलें कांते ॥ तें सांगिजे मज ॥ १६८ ॥
वचन ऐकुनि सकळी ॥ जैसी चंडवातें उन्मळे कर्दळी ॥
की जळाविण मासोळी ॥ तैसि कोमली लज्जित ॥ १६९ ॥
राया मनि खेद जाला ॥ तयातें वैराग्य आठवला ॥
शरिरि कांटाळा भरला ॥ उतरला सिंहासना खालुता ॥ १७० ॥

॥ श्लोक ॥

या चिंतयामि शततं महि षा विरक्ता ॥
शाप्यनमिच्छति जन स्व जनोन्यशक्ता ॥
अस्मिन्कृत च परितुस्यति काचिदन्या ॥
धिग् तां च तां च मदनं च ईमां च मां च ॥ १ ॥

मग विक्रमादित्य बोलाविला ॥ राज्याभिषेक तयासि केला ॥
आपण वानप्रस्त जाला ॥ योगअभ्यासी ॥ १७१ ॥
मग भृतहर गेला वनासी ॥ विक्रमादित्य बैसला सिंहासनासी ॥
राज्य चालविलें यथानितिसी ॥ विक्रमादित्य ॥ १७२ ॥
युद्धीष्ठिर शक सारिला ॥ आपला शक चालता केला ॥
मग शाळिवाहन जन्मला ॥ पैठण नगरी ॥ १७३ ॥
ब्राह्मणकन्येचे 'पोटी स्पष्ट ॥ शाळिवाहन जन्मला शुभट ॥

तो शकाधिकारी बळकट ॥ त्याणें विक्रमातें मारिलें ॥ १७४ ॥
आपला शक चालता केला ॥ आपण समुद्रिं राहिला ॥
मग भोजराजा जाला ॥ शोमवंशी ॥ १७५ ॥
त्याचि परंपरा उज्जनिनगरी ॥ यका पासाव येक अवधारी ॥
ते सांगतों सविस्तरी ॥ आईका आता ॥ १७६ ॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| भोज | १ | प्रतिभोज | २ | शांतनादित्य | ३ |
| काशेश्वर | ४ | विक्रमादित्य | ५ | श्रीबिंब | ६ |
| महाबींब | ७ | सुसुपाळ | ८ | केशवादित्य | ९ |
| वज्रनाभ | १० | विरुपाक्ष | ११ | धूम्रकेत | १२ |
| पद्मनाभ | १३ | अजानबाहु | १४ | वृषकेत | १५ |
| वृद्धवाहन | १६ | बत्रृ | १७ | पन्नगेश्वर | १८ |
| वैरोचन | १९ | प्रेमनाभ | २० | अयुताचन | २१ |

अयुताचन राजा दानसुर ॥ उज्जनिनगरिचा नृपवर ॥
नांदतां महापावित्र ॥ कथा वर्तलि ते आईका ॥ १७७ ॥
शामकर्ण राजा शोमवंशी ॥ नांदता पैठणदेशी ॥
पुत्र नाहि वंशी ॥ म्हणोनि वैराग्य घेतलें ॥ १७८ ॥
अयुताचन गेला पारधिसी ॥ अरण्यी देखिलें तयासी ॥
पृछा आदरिली तापसिसी ॥ राये प्रती ॥ १७९ ॥
तूं कवण देशिचा नृपती ॥ राया सांगे मजप्रती ॥
कवण देशिं नांदती ॥ पुत्रकळत्र ॥ १८० ॥
येरु बोलिला वचन ॥ आम्हि सोमवंशि जाण ॥
आम्हा छत्र सिंहासन ॥ जाण सत्य ॥ १८१ ॥
नामाभिधान आमुचें ॥ अयुताचन साचें ॥
पुत्र पांच आमचे ॥ मंदिरी आहेती ॥ १८२ ॥
इतुकें वचन आईकिलें ॥ संन्याशानें लोटांगण घातलें ॥
उठोनि हृदइं आळंगिलें ॥ तया अयुताचनासी ॥ १८३ ॥
धन्य मी आजि जालों ॥ आपलें वंशिकांसि भेटलों ॥
थोर हृदईं संतोषलों ॥ कीर्ति आईकोनी ॥ १८४ ॥
मग म्हणे तापसी ॥ शामकर्ण नाम आम्हासी ॥
सांडिलें पैठणराज्यासी ॥ संतान नाहि म्हणोनी ॥ १८५ ॥
तरि आतां माझी विज्ञापना ॥ राज्य द्यावें तुमचियानंदना ॥
धर्मपुत्र मज सामान्य ॥ हा चि अर्थ राया ॥ १८६ ॥

इतुकें वचन ऐकोनी ॥ प्रधानासिं बोलावोनी ॥
विचारतां जाला अयुताचन मनी ॥ कैसें करावें ॥ १८७ ॥
प्रधानासि मानलें ते वचन ॥ ईतर नव्हे आपला वांशिक जाण ॥
मग करोनियां सन्मान ॥ शामकर्ण मंदिरी नेला ॥ १८८ ॥
अर्घ्यपाद्यें पूजा केली ॥ भोजनविधी संपादिली ॥
अष्टगंधें चर्चिली ॥ येथानिगुती ॥ १८९ ॥
विडे घेतले सकळि जाण ॥ पालाणिले चातुरंग सैन्य ॥
आले सर्व मिळोन पैठण ॥ प्रधानवर्गी ॥ १९० ॥
राया अयुताचनाचा नंदन ॥ जो बत्तीसलक्षणि संपूर्ण ॥
धनुर्धरविद्या दारुण ॥ पवित्र पुण्यशिळ ॥ १९१ ॥
ब्राह्मण मेळविले अपार ॥ दाने दीधलिं गंभीर ॥
वांटिली द्रव्याची भांडार ॥ ब्राह्मणा कारणे ॥ १९२ ॥
राज्याभिषेक केला वज्रनाभा ॥ सिंहासनि बैसविला वोजा ॥
मोहोत्सव जाला सहजा ॥ पैठणि जाणा ॥ १९३ ॥
वज्रनाभ राज्याधिकारि केला ॥ अयुताचन तेथोनि मुरडला ॥
उज्जनीनगरि येवोनि राहिला ॥ सह दळेसीं ॥ १९४ ॥
मग वज्रनाभ नांदति पैठणी ॥ परंपरा चालली तेथोनी ॥
ते आयेका चित्त देवोनी ॥ सांगतों आतां ॥ १९५ ॥

| | | |
|---|---|---|
| वज्रनाभ १ | चंद्रनाभ २ | सिंहनाभ ३ |
| रुक्मनाभ ४ | परिक्षिती ५ | वैदर्भ ६ |
| दक्ष ७ | केशवादित ८ | हरीबिंब ९ |
| बींबसेन १० | कृपाभान ११ | विक्रमादित्य १२ |
| महीपाळ १३ | यक्षदंत १४ | श्रीधर १५ |
| लक्ष्मीधर १६ | वेगुसागर १७ | वेणुनाभ १८ |
| केशवादित्य १९ | शुक्रभान २० | विमळार्जुन २१ |
| | देवगिरी २२ | |

हे राजे नांदले पैठणी ॥ यांचि परंपरा चाललि तेथोनी ॥
पुढें बोलिळा मुनी ॥ तें आईका श्रोते ॥ १९६ ॥
मणिपुर नाम नगर ॥ तेथें प्रतापसिंग नृपवर ॥
नांदत असे कृपासागर ॥ प्रतापपुरी ॥ १९७ ॥
महाक्षेत्रि दारुण ॥ धनुर्धरविद्यासंपूर्ण ॥
नांदतां तेथें जाण ॥ कथा वर्तली ते अवधारा ॥ १९८ ॥

तया प्रतापसिंगासि कंन्या नागरी ॥ गुणवति अवधारी ॥
जाली असे उपवरी ॥ राजकंन्या ॥ १९९ ॥
तिचें स्वयंवर मांडिलें ॥ भाट देशोदेशि पाठविले ॥
पत्रें नृपवरासि लीहिलीं ॥ देशोदेशीं ॥ २०० ॥
पूर्व-दिसेचे नृपवर ॥ सूर्यवंशि राजे पवित्र ॥
स्वयंवरा कारणे इंकारले समग्र ॥ महाक्षेत्री ॥ २०१ ॥
मंडप घातला हेममंडित ॥ सेना मिळालि अगणित ॥
पाहोनियां सुमुर्त ॥ हस्तिणी श्रुंगारिली ॥ २०२ ॥
नवरि आरूढालि हस्तिणी वरी ॥ रत्नमाळा घेवोन करीं ॥
प्रदक्षणा नृपांते करुन निर्धारी ॥ मग उभी राहिली ॥ २०३ ॥
अवलोकिले सकळ ॥ तेथे होता पूर्वेचा नृपाळ ॥
नांवे श्रीदत्त सिंधा केवळ ॥ तयास माळ घातली ॥ २०४ ॥
मग तयासि उचलोनि ॥ मंडपि नेला धावोनी ॥
बैसविला सिंहासनी ॥ सभे माजी ॥ २०५ ॥
सर्व सभा घनवटली ते वेळे ॥ राजे थोर थोर बैसले ॥
प्रतापसेने कर जोडिले ॥ मग विनविलें सकळांसी ॥ २०६ ॥
रायें कृपा करावी ॥ आपुलीं गोत्रकुळें सांगावीं ॥
कोण कोणा पासुन उत्पत्ति अघवी ॥ सांगा मज आणि सकळिका ॥ २०७ ॥
सूर्यवंशिचे नृपवर ॥ सांगते जाले सविस्तर ॥
द्वादश गोत्रें आम्हासि पवित्र ॥ सूर्यवंश आमचा ॥ २०८ ॥
तीं गोत्रें कवण कवण ॥ सविस्तर ऐका चित्त देवोन ॥
कुळदेवता आद्य करोन ॥ सांगतों आतां ॥ २०९ ॥

| | गोत्र | प्रवर | कुळदैवता |
|---|---|---|---|
| १ | भारद्वाज | ५ | प्रभावती १ |
| २ | पौतमाक्ष | ३ | काळिका २ |
| ३ | वशिष्ठ | ३ | महालक्ष्मी ३ |
| ४ | कश्यप | ५ | योगेश्वरी ४ |
| ५ | हारित | ७ | इंद्रायणी ५ |
| ६ | विष्णु | ५ | कामाक्षी ६ |
| ७ | ब्रह्मजनार्दन | ३ | येकविरा ७ |
| ८ | शौनल्य | ३ | अंबिका ८ |

| | | | |
|---|---|---|---|
| ९ | कौडण्य | ५ | माहेश्वरी ९ |
| १० | कौशिक | ५ | दुर्गा १० |
| ११ | विश्वामित्र | ३ | त्वरिता ११ |
| १२ | मांडव्य | ५ | चंडिका १२ |

हा निवाडा सूर्यवंशि राजे बोलिले ॥ ऋषि साक्षसि आदरिले ॥
तें राया प्रतापसेना मानलें ॥ ऋषिवाक्य सत्यमेव ॥ २१० ॥
म्हणे म्हणे धन्य धन्य सूर्यवंशी ॥ ज्याचि गोत्रें कुळदैवतें साक्षसीं ॥
ते युगायुगि सर्वासीं ॥ नांदति ऋपिभाषित ॥ २११ ॥
ईतकें आईकोनि उत्तर ॥ बोलता जाला सोमवंशि नृपवर ॥
प्रतापसेन महापवित्र ॥ प्रश्नोत्तर आदरिलें ॥ २१२ ॥
सोमवंशाचिं गोत्रें ॥ सांगतां जाला पवित्रें ॥
श्रोते ऐका दत्तचित्तें ॥ ऋषिवाक्यें ॥ २१३ ॥

| | गोत्र | प्रवर | कुळदैवता |
|---|---|---|---|
| १ | बकदालभ्य | ५ | प्रभावती |
| २ | कौंडण्य | ३ | कुमारिका |
| ३ | पद्माक्ष | ५ | जोगेश्वरी |
| ४ | साश्वन | ५ | महालक्ष्मी |
| ५ | भद्राक्ष | ७ | वज्राये |
| ६ | क्षवण | ७ | पद्मावती |
| ७ | पारश्वत | ५ | हरबाई |
| ८ | वैरक्ष | ३ | चापादेव |
| ९ | गौतम | ५ | येकविरा |
| १० | श्रीपत | ५ | चांडिका |
| ११ | वशिष्ठ | ५ | हरडाये |
| १२ | नागेश्वर | ३ | महाबाये |
| १३ | वछ | ३ | नारायेणी |
| १४ | हरिद्र | ३ | महालाय |
| १५ | त्रैबक | ५ | हरडाय |
| १६ | विश्वामित्र | ५ | ललिता |
| १६ | श्रीचंद्र | ५ | चंदनदेवी |
| १८ | अंगिरा | ५ | माहेश्वरी |
| १९ | जनार्दन | ५ | रक्तदांतिका |

२० भारद्वाज ———— ३ ———— माहेश्वरी
२१ भृगु ———— ५ ———— त्वरिता
२२ मित्राक्ष ———— ३ ———— चंद्रायणी
२३ काश्येश्वर———— ३ ———— रुद्रायणी
२४ अंबरुषि ———— ५ ———— सिंव्हाये
२५ पदकर्ण ———— ३ ———— कोल्हाये

गोत्रें कुळदैवता प्रवर ॥ शाखा आद्य करोन निर्धार ॥
सांगितला साचार ॥ निवडुनियां ॥ २१४ ॥
आलें सर्वांचियां चित्तासीं ॥ जें रुषिवाक्ये निर्धारेसी ॥
तें मानलें सर्वांसी ॥ साक्षयुक्त ॥ २१५ ॥
पुढां बोलिला नृपवर ॥ राउळें सांगावा आपुला निर्धार ॥
बोलतां जाला श्रीदत्तसिंधा वर ॥ प्रत्योत्तर आदरिलें ॥ २१६ ॥
जी आपण सिंदा शेषवंशी ॥ नव गोत्रें आम्हासी ॥
विश्वामित्र आद्यऋषी ॥ परंपरेसि आमचे ॥ २१७ ॥
प्रवर शाखा कुळदेवता ॥ सविस्तारें सांगतों आतां ॥
यावत्–पूर्व–उत्पन्नता ॥ शेषवंशाची ॥ २१८ ॥
द्वापारयुगा भीतरी ॥ मांधाता राजा ब्रम्हक्षेत्री ॥
शोमवंशी धर्ममूर्ती ॥ पुण्यशिळ जो ॥ २१९ ॥
तयाचि स्त्रि भानामती ॥ जे पतिव्रता महासती ॥
दोघे असतां यकांती ॥ विलासयुक्त ॥ २२० ॥
राजा मदनें व्याकुळ ॥ जाला असे केवळ ॥
तयेसि बोलाविलें जवळ ॥ उपेक्षा पुरवि कांते ॥ २२१ ॥
ते बोलिली सुंदरी ॥ रजस्वळा जालों असे अवधारी ॥
भोग द्यावा कवणे परी ॥ जेणें प्रायेश्चित घड ॥ २२२ ॥
जें अमान्य वेदपुराणी ॥ अधर्म बोलिला ऋषिवचनी ॥
उपर दिन असतां गगनी ॥ हें केवि घडे ॥ २२३ ॥
ऐकोन राजा कोपला ॥ राणिसी अबोला धरिला ॥
ऐसा संवत्सर येक भरला ॥ वधुवर्गासी ॥ २२४ ॥
राणी विचारि मानसीं ॥ राजा न बोले तियेसी ॥
पुढा कथा वर्तलि कैसी ॥ ते ऐका श्रोतेजन ॥ २२५ ॥
कवणे येके दिवसीं ॥ भानामति असे वाटिकेसी ॥
विश्वामित्र तया मार्गेसी जात असे ॥ २२६ ॥

ते वेळि ते सुंदरा ॥ भानामति अवधारा ॥
ऋषि बोलाविला सामोरा ॥ धावोन चरणि लागली ॥ २२७ ॥
तयास करितसे विज्ञापना ॥ सांगति जाली विवंचना ॥
मांधाता स्वामी आमचा जाणा ॥ तो करता असे चिर्त्ती ॥ २२८ ॥
तरि आतां स्वामिने कृपा करावी ॥ आमचि वीनति ऐकावी ॥
आम्हा वधुवर्गा प्रित बरवी ॥ होये ऐसें करावें ॥ २२९ ॥
वचन ऐकुनि ऋषिवर्य ॥ बोलता झाला प्रत्योतर्य ॥
जेणें राजा वस्य तुज होये ॥ तो उपाय देतो आतां ॥ २३० ॥
म्हणोन अभिमंत्रिलें जळ ॥ कुपिका भरोनियां निर्मळ ॥
देता जाला केवळ ॥ भानामतिसी ॥ २३१ ॥
ते कुपिका भानामतियें करीकमळीं ॥ म्हणे अभ्यंग करि रायाचे कुरळी
वस्य होईल तत्काळी ॥ सत्यमेव ॥ २३२ ॥
मग ऋषि गेला तथोनी ॥ तों पातिव्रता पाहे कुपिका अवलोकुनी ॥
पाहातां थेंब पडला धरणी ॥ तो शेषा मस्तकि विखुरला ॥ २३३ ॥
तेणें गजबजिला शेष ॥ म्हणे कवण ऐसा पुरुष ॥
मृत्यलोकिं असतां मज निःशेष ॥ विंधिले जेणे ॥ २३४ ॥
तैसा च उपरमला सहश्रफणी ॥ मृत्यलोकि आला टाकुनी
दृष्टि देखिली कामिनी ॥ भानामति ते ॥ २३५ ॥
ते सर्व लावण्याचि मुस ॥ कळे बाणलि राजस ॥
मुर्छना आलि शेषास ॥ तये वेळीं ॥ २३६ ॥
तें देखोनि भानामती ॥ करि उचलिला शेषमूर्ति ॥
पुढां धरिता वेढा माजेसी ॥ घातला शेषे ॥ २३७ ॥
मग ते गजबजिलि सुंदरा ॥ न करवे कांहिं अवधारा ॥
शेष रातला ते अवसरा ॥ अमोघ प्रबळ ॥ २३८ ॥
मनि शंकलि कामिनी ॥ शेष गेला निघोनी ॥
गर्भ संभवला तिये लागोनी ॥ तये अवसरा ॥ २३९ ॥
मग ते आलि मंदिरी ॥ विचारि पडिली सुंदरी ॥
तों विश्वामित्र ऋषि ते अवसरी ॥ आला तेथें ॥ २४० ॥
रुषि नेला मंदिरासी ॥ अर्घपाद्य पुजिलें तयासीं ॥
वृत्तांत सांगितला ऋषिसी ॥ मुळा पासुनि आद्यंत ॥ २४१ ॥
तेणें दिधलें नाभिवचन ॥ चिंता न करावि जाण ॥
तुझे उदरि क्षेत्रि महादारुण ॥ होईल तो त्रिभुवन जिंकिल ॥ २४२ ॥

मात जाणविली रायासी ॥ होणार जे गति ऐसी ॥
कवण जाणे ईश्वरचरित्रासीं ॥ लिळालाघवि तो ॥ २४३ ॥
मग प्रसूत जालि सुंदरा ॥ भानामति अवधारा ॥
जन्मला शेषवंशि ते अवसरा ॥ भरथखंडी ॥ २४४ ॥
विश्वामित्रें केलें नामाक्षर ॥ श्रीधर नाम ठेविलें मनोहर ॥
उपदेशिलें बीजाक्षर ॥ सीद्धिमंत्र ॥ २४५ ॥
मग तो वाढला कुमर ॥ राजया पाडिला विचार ॥
मग बोलाविला विश्वामित्र ॥ पृछा आदरिली ॥ २४६ ॥
महीपाळरायाचि कन्या ॥ विश्वामित्रें सांगितली जाया ॥
मग जाला वों-पुण्या ॥ महीपाळनगरी ॥ २४७ ॥
यया रिती शेषवंश ॥ परंपरा चालिली सुरस ॥
ते आईका सावकाश ॥ चित्त देवोनी ॥ २४८ ॥

| | | |
|---|---|---|
| श्रीधर १ | गंगाधर २ | महीधर ३ |
| पुरंधर ४ | नागोधर ५ | वेणुसागर ६ |
| योनताविर्य ७ | महीदर्य ८ | हीरादर ९ |
| नामोदर १० | देववीर ११ | |

महीपाळ नगरी ॥ राजा देववीर राज्याधिकारी ॥
शेषवंशि महाक्षेत्री ॥ पुण्यशीळ ॥ २४९ ॥
गणेशमंत्र उपाशक ॥ गोत्र आस्तिकऋषि देख ॥
कुळदेवता महालक्ष्मी दैवत ॥ सत्य जाण ॥ २५० ॥
तो असतां तया नगरी ॥ कथा वर्तलि पुढारी ॥
तें ऐका ऋषिवैखरी ॥ वदली असे ॥ २५१ ॥
त्या महीपाळे वर्तलें अपूर्व ॥ राजा देववीर नृपवर्य ॥
वह्याळि खेळतां अस्त सूर्य ॥ जाला तेथें ॥ २५२ ॥
तंव त्या महावना माझारी ॥ राजा देववीर राहिला अवधारी ॥
तों माध्यानरात्रिचे अवसरी ॥ आलि राक्षसिणी आईका ॥ २५३ ॥
महाविक्राळ सोंग ॥ बाबरझोंटि उघडें आंग ॥
शब्द महाप्रचंड ॥ केला तिणे ॥ २५४ ॥
शरिर दिसे दुर्धर ॥ घोर शब्दें गर्जालि निशाचर ॥
तें देखोन थोरथोर ॥ वीर भयाभित पैं जाले ॥ २५५ ॥
राजा देखोन तितें नयनी ॥ क्रोधें खवळला महा अग्नी ॥
धनुष्य टणत्कारिलें संजोगोनी ॥ गुण चढविला ॥ २५६ ॥

गुणि लाविला बाण ॥ करितां जाला संधान ॥
तंव ते बोलिली वचन ॥ निशाचरी ॥ २५७ ॥
राया तुं कवण होसी ॥ कवण देशिं नांदसी ॥
सत्य सांगे मजसी ॥ नृपवरा ॥ २५८ ॥
येरु बोलिला वचन ॥ मी शेषवंशि निर्वाण ॥
तुं मज पुसावया कैचे ज्ञान ॥ राक्षसि म्हणोनी ॥ २५९ ॥
येरि बोलिली उत्तर ॥ मी सिंधाळनगरिची सुंदर ॥
जांघेळकुळि उत्पति साचार ॥ मनोहर नाम माझें ॥ २६० ॥
मग ते राक्षसी ॥ मानववेश नटलि परियेसी ॥
जालि लावण्यरुप षोडशी ॥ सकुमार अनुपम्ये ॥ २६१ ॥
तेजें जैसी विद्युल्लता ॥ कोटि–दीनकर–प्रभा फांकता ॥
राजा जाला देखतां ॥ अति अपुर्व वर्तलें ॥ २६२ ॥
ते महासुंदर राजसी ॥ लावण्यरुपाचि रासी ॥
उपमा न ये देतां तयसीं ॥ माईक अनुपम्य ॥ २६३ ॥
तिते देखोनि नृपवर ॥ कामे विव्हळ देवदत्त वीर ॥
बोलता जाला प्रत्योत्तर ॥ तिये प्रती ॥ २६४ ॥
तुवां मोहिलें मजसी ॥ आतां आईके विनतीसीं ॥
सर्वश्व देईन तुजसी ॥ जरि वरिसी मज लागी ॥ २६५ ॥
इंतुकें वचन ऐकुन ॥ बोलति जालि मनोहरा आपण ॥
जरि राणियां भितरि वडिलपण ॥ नुलंघसि वचन माझे पैं ॥ २६६ ॥
ऐसि जरि देसिल भाख ॥ तरि वरिन तुजसिं देख ॥
येरु तत्काळ देता झाला तये प्रत ॥ बेत्याळिस सत्यवाचा ॥ २६७ ॥
ऐसे जालें सत्यवचन ॥ तंव सूर्योदय जाला जाण ॥
मग ते आणिलि नगरा लागुन ॥ मनोहरा राक्षसी ॥ २६८ ॥
असो ते मनोहरा ॥ प्रसवलि अमित्य कुमारा ॥
शेषवंशि नृपवरा ॥ जे क्षेत्रि दारुण ॥ २६९ ॥
ते मनोहरा सिंधाळदेशिची ॥ तेथोनि नाम सिंधे शेषवंशी ॥
तें चालत आलें भुमंडळासी ॥ सिंधे म्हणोनी ॥ २७० ॥
या नंतरे अवधारा ॥ शकाधिकारि शालिवान जन्मला ॥
शेष ब्रह्मकुमरिसी रातला ॥ भविष्य चारित्र ॥ २७१ ॥
तो राहिला कुंभार शाळेसी ॥ म्हणोन शाळिवान नाम तयासीं ॥
गोत्र वछ महाऋषी ॥ कुळदेवता येकविरा ॥ २७२ ॥

पैठणी जाला उत्पन्न ॥ मृतिका अव्हानिली संपूर्ण ॥
दळ वारु हस्ति दारुण ॥ असंख्य केले ॥ २७३ ॥
तें कळलें विक्रमासीं ॥ तेणें वेताळ पाठविला हेरसी ॥
तों फिरत आला पैठणासीं ॥ तेथे तयासिं देखिलें ॥ २७४ ॥
विचार पाहतां मानशी ॥ शकाधिकारि जाला परियेसी ॥
चारित्र देखिलें नयनासी ॥ मग तेथोनि मुरडला ॥ २७५ ॥
गेला उज्ञनि-नगरी ॥ म्हण विक्रमादित्यासि अवधारी ॥
कथा सांगितलि सविस्तरी ॥ शाळिवानाची ॥ २७६ ॥
ऐकोन राजा सिद्ध जाला ॥ आपुल दळेसिं चालिला ॥
नदिपैलपारि राहिला ॥ मग पाठविला शिष्ट ॥ २७७ ॥
येवोन शाळिवाना जाणविलें ॥ युद्धासि चालावें वहिलें ॥
ऐकोनि निरोप दिधले ॥ शाळिवाने ॥ २७८ ॥
मग स्मरिला सहश्रफणी ॥ त्याणे नवनाग पाठविले तेथोनी ॥
अमृतकुपिका घेवोंनी ॥ शाळिवाना जवळ आले ॥ २७९ ॥
ते कवण कवण ॥ नांवें तयाचि जाण ॥
तीं ऐका सावधान ॥ श्रोते-हो ॥ १२ ॥

| | | |
|---|---|---|
| काळदंत १ | सोमदत्त २ | विख्यात ३ |
| हेमरक्त ४ | कृतांत ५ | विरुदंत ६ |
| येक्षदंत ७ | काळकोट ८ | शुभ्रमणी ९ |

हे नवनाग येवोनी ॥ संजिव केलि बाहुलिं त्याणी ॥
मग युद्धासि जावोनी ॥ चक्रचुडामाणि गंगे तिरीं पावला ॥ २८० ॥
मग जालि आदळाआदळ ॥ युद्ध जालें तुंबळ ॥
पैलतिरी विक्रम सबळ ॥ राहिला असे ॥ २८१ ॥
सैन्य मारिलें शाळिवाने ॥ विक्रमावरि केले पेणे ॥
नदि उतरतां सैन्य ॥ उमळे शाळिवानाचे ॥ २८२ ॥
तेधवा शाळिवान विचार करी ॥ मृतिका विरालि जळीं ॥
नवनाग धाविल ते वेळी ॥ शाळिवान रक्षावया ॥ २८३ ॥
मग पावला पैल तिर ॥ विक्रम लक्षिला समोर ॥
बाण लाविला खडतर ॥ विक्रमादित्य तेणें उडविला ॥ २८४ ॥
तो उज्जनि-नगरि पाडिला ॥ तेथें मुक्ति पावला ॥
शाळिवान शकाधिकारि जाला ॥ पैठणासी ॥ २८५ ॥
मग ते नाग नव जण ॥ आज्ञा मागोन निघाले जाण ॥

शाळिवान विनवि त्यां लागुन ॥ तें अवधारा ॥ २८६ ॥
नावेक राहावें स्थिर ॥ आळंगिले सत्वर ॥
तुम्हा वेगळा आम्हासि कोण ॥ आहे येथे ॥ २८७ ॥
मग ते राहिले तेथे ॥ कार्य करावि समर्थे ॥
म्हणे शेषआज्ञा आणिन सत्य ॥ तुम्हा कारणे ॥ २८८ ॥
तुम्ही राहावें सावचित्त ॥ मनिचा सांडोनि संकल्प ॥
विनति माझी दत्तचित्त ॥ आइका स्वामी ॥ २८९ ॥
मी तरि शकाधिकारी ॥ शेष—अवतार महि वरी ॥
कलयुगिं धर्मरक्षणाईत कुमारिकाउदरी ॥ येणे जाले ॥ २९० ॥
या उपरि आइका श्रोते ॥ कथा वर्तलि सत्य ॥
ऋषि वदला वाक्य ॥ वागेश्वरी ॥ २९१ ॥
मग शाळिवान राज्ये करितां ॥ तयासि कोपलि पाताळदेवता ॥
शाप दिधला तत्वता ॥ शाळिवाना लागी ॥ २९२ ॥
मग तो अश्वा सहित ॥ समुद्रि रीघाला साक्षांत ॥
पुढां कथा वर्तलि सत्य ॥ ती आईका आतां ॥ २९३ ॥
पैठणि राहिले नव जण ॥ शेषवंशि जाण ॥
त्यांचि कुळगोत्रें येधुन ॥ कुळदेवतायुक्त ॥ २९४ ॥

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| काळदंत | १——— | गोत्र हरिद्र | १——— | कुळदेवता हिरबाय | | १ |
| सोमदंत | २——— | गोत्र हरित | २——— | कुळदेवता हरबादेवी | | २ |
| विख्यात | ३——— | रेणुक | ३——— | कुळदेवता जांगेश्वरी | | ३ |
| हेमरक्त | ४——— | कपिल | ४——— | कुळदेवता काळिका | | ४ |
| कृतांत | ५——— | कपिलध्वज | ५——— | कुळदेवता वज्राये | | ५ |
| विरुदंत | ६——— | कासेश्वर | ६——— | कुळदेवता येकविरा | | ६ |
| येक्षदंत | ७——— | आस्तिक | ७——— | कुळदेवता महालक्ष्मी | | ७ |
| काळकोट | ८——— | विरोध | ८——— | कुळस्वामिण वज्राय | | ८ |
| शुभ्रमणी | ९——— | नृसिंह | ९——— | कुळस्वामिण येकविरा | | ९ |

ऐसिं सांगितली कोजें कुळदेवता ॥ १२५ वर्षे भरलिं पैठणि नांदतां ॥
या परि शेषवंशउत्पनता ॥ विश्वामित्रवाक्यें ॥ १ ॥
पुढा परंपरा चालिली ॥ कथा सविस्तारें सांगितली ॥
साक्ष ब्रम्होत्तरी दिधली ॥ विश्वामित्रवाक्यें ॥ २ ॥
स्वधर्म शेषवंशाक्षी ॥ द्वादश वरुषिं संस्कार तथासी ॥
गणेशमंत्र जपमाळिकेसी ॥ सांगितला असे ॥ ३ ॥

पुराणमंत्रि क्रियाकर्म ॥ वर अश्व आसन ॥
बाहुटा आरक्तवर्ण ॥ छत्र येक ॥ ४ ॥
सोहोळा दिवस नव ॥ करावा लग्नउत्साव ॥
शेषवंशिचा निर्वाह ॥ सांगितला सत्ये ॥ ५ ॥
पुढां लोमक प्रतिलोमक ॥ ज्ञाति जाल्या अनेक ॥
त्या भविष्योत्तरपुराणि सकळिक ॥ सविस्तारे सांगितल्या ॥ ६ ॥

इति श्रीब्रम्होत्तरखंडे भविष्योत्तरपुराणे महाऋषिसंवादे
वंशाविंवचनाधर्मस्थापननाम द्वीतियोध्याय: ॥ २ ॥



श्रीगणेशायनमः

॥ श्री कुळदेवतायनमः ॥ श्रीगुरुचरणकमलेभ्यो नमः ॥

स्वस्ति श्रीनृपविक्रमार्कसमयांतिसंवत ११२५ तत् राजिंद्रचक्रचूडामणी शालिवान–शके १०६० शशीरुतौ महामांगल्यमामोत्तम–माघमासे शुक्लपक्षे ५ सोमवासेरे तद्दिनी अहिनळवाडपाटण तत्समीप चांपानेरपच्यासि प्रगणे मुख्य माहालें तेथें राजा सूर्यवंशी प्रतापबिंब गोत्र भारद्वाज पंचप्रवर शाखा कात्यायनि कुळदेवता ॥ प्रभावति त्याणे जेष्टबंधु जवंळोन्न मुहिम करों आदरिली ॥ ते वोळि जमा सेनादिपति नाइकराव व सरकारकोन रघुनाथपंत बोलावोन दढाव केला ॥ जरि चढाये कोकाणि करावी ॥ तत्–समइ राजगुरु हेमाडपंडित यजुर्वेदि माध्यान वाजास्नि–शाखा भार्गव–गोत्र त्रिप्रवरराान्वित कुळदेवत चंडिका सप्तश्रृंगि उपनावं चामरे ॥ त्यांसी विनंति केलि जरि स्वाामिने कृपा करोन आमचे समागमि यावें ॥ तेधवां सुमुर्त राजा प्रतापबिंब १० सहस्त्र अश्वासि चालि केलि ॥ राया समागमि सरसुभेदार ॥ केशवराव सोमवंशि ॥ गोत्र बकदालभ्य ॥ कुळदेवता पद्मावती ॥ आणि सरसबनीस शेषवंशि आनंदराव ॥ गोत्र हरित ॥ कुळदेवता हीरबादेवी व सरचिटाणिस गंभिरराव सूर्यवंशि ॥ गोत्र वशिष्ट ॥ कुलदेवता काळिका ॥ व हवालदार सोमवंशि पुरुषोत्तम ॥ गोत्र गौतम ॥ कुळदेवता नारायणी ॥ व मुजुमदार सोमवंशि ॥ गोत्र विश्वामित्र ॥ कुळदेवता ललिता ॥ व कोटवाल पटवर्धन गंगाजी ॥ गोत्र रेणुक ॥ कुळदेवता योगेश्वरी ॥ व मुख्य प्रधान बाळकृष्णराव सोमवंशि ॥ गौत्र कौंडण्य ॥ कुळदेवता कुमारिका ॥ हा सर्व समुदाय घेवोन चाल केली ॥ राजा प्रतापबींब सहकुटुंबि पैठणि आला ॥ तथं राजा विक्रमभोम सूर्यवंशि त्याणे अतिथ्य विशेष करोन राया प्रतापबिंबास सन्मानिल ॥ विनति करोन रायास पैठाणि स्थिरावलें। वर्षे २ राजा प्रतापबिंब पैठणी राहिला ॥ ईतक्यांत मुख्य प्रधान बाळकृष्ण राव बोलता जाला ॥ जर लस्कर खाजना लघु जागोन मुहिम कोकाणि अनमानिली ॥ बुद्धा रायासिं मानली ॥ तेधवां हंकारा कला सैन्य चालिलें ॥ तेधवां पैठणा होउन दशल हरवाज राया समागमीं आपले परिवारें निघाले ॥ व बाळाजि सिंधा राया समागमी आपल परिवारे ॥ सरजमातदार राजयुद्धी प्रखर जाणोन राया विक्रमभाम पानपटि देवोन पाठविला ॥ सहश्र दोन घोडे ताबी

रायान दिधले ॥ दक्षणे चालि केली ॥ ते येवोन दवणे प्रविष्ट जाले ॥ तेथ राजा काळोजि सीरण्या त्यास हेर पावतां च शरण तो जाला ॥ लोढि दवण यावत् चिखली काविज केलि ॥ मुलुख उद्दस देखोन रायें विचार केला ॥ रम्य स्थळ समुद्रतीर देखोन संतोषला ॥ तेथे कुळकर्णिक हरबाजि कायस्त ठेविला ॥ आपण राजा दळेसि चाल केली ॥ तारापुरा पासोन यावत् माहिकावती प्रविष्ट जाले ॥ तेथे राजा विनाजी घोडेल ॥ त्यास दुर करोन ॥ राजा महिकावतिस राहिला ॥ देशाचि जमा पाहिली ॥ देश उद्दश ठाइं ठाइं अतिशुद्र घोडेल निचयाति उघडे लोक देखोन विचार मांडिला ॥ जर या देशिं भले लोक असते तर देश वसाईत होईल ॥ ईतक्यांत मुख्य प्रधान बोलता जाला ॥ जरि स्वामिने आपले दृष्टि प्रथम देशाचि जमि पाहावी ॥ कीतिक प्रगाणे माहाले स्थापणे ॥ त्या प्रमाणे केलें जाईल ॥ बारा सहश्र फौजीस आदा पाहावा ॥ मग जो विचार केला तो केला जाइल ॥ वचन रायासिं मानलें ॥ बोलता जाला जर तुह्मी दळ घेवोन मोहिम करावी ॥ देशाचि जमी पाहावी ॥ यावत् वाळुकेश्वरि जावें ॥ देश काविज करावा ॥ मुलुख पाहावा ॥ त्या प्रमाणे केलें जाईल ॥ म्हणोन मुख्य प्रधान बाळकृष्णरावसंन्निध जाब केला ॥ जर आज्ञा प्रमाण स्वामिची ॥ विडा रायें दिधला ॥ हंकारा केला दळ सर्वे दाहा सहश्र ॥ देवोन रवाना केला ॥ मग महीकावति होन प्रधान निघाले ॥ थेट हाटदळ पापडि पावले ॥ तेथोंन ठाणे—कोकणा प्रविष्ट जाले ॥ तेथे राजा येशवंतराव त्यासि युद्ध जालें ॥ येशवंतराव मारिला ॥ राज्य घेतलें ॥ कंळव्यांत ग्रामस्त कोकाख्या तो हि शरण आला ॥ प्रगाणा पाहिला ॥ चित्तास आला ॥ मग तेथोन मठास गेले ॥ तेथे देवालय हरबादेवि ग्रामदेवता ॥ आणि मुक्तेश्वर देव ॥ तडाग ब्रह्मकुंड ॥ ये साव्या पासुन जुहु ॥ यावत् वाहिनळें ॥ राजण फार पाहोन वाळुकेश्वरि गेले ॥ बाणगंगा देखिली ॥ हनुमाप्रतिमा लक्षिली ॥ तेथें स्थिर जाले दिवस ५ ॥ मग तेथोन जमि पाहिली ॥ गणति जमिची पाहातां ॥ यावत् वाळुकेश्वर महिकावति मध्य ॥ विलाथ अगणित पक्के कोस २८ महाअरण्य उद्दस जाणोन ॥ कागद राया प्रति लीहिला ॥ जर अवघि जमि देशाचि पाहिली ॥ गणति कोस २८ पक्के जाणिजे ॥ आज्ञा प्रमाण रायाचि ॥ जे विलाथ उद्दस जाणोन जें विनवाल तें केलें जाईल ॥ पत्र महिकावति प्रविष्ट जाले ॥ रायानें वाचिलें ॥ वर्तमान मनास आणिला ॥ तेथवा राजा आपण ॥ महिकावति होवान ॥ हंकारा केला ॥ ठाणेयासि येवोन राहिला ॥ विलाथ आपले दृष्टि पाहिली ॥ ते चित्तास आली ॥—

तेथोन वाळुकेश्वरि गेला ॥ मुख्य प्रधानासि भेटला ॥ तेथोन मग विचार केला ॥ जे येथे लोक भले आणावे ॥ देश वसवावा ॥ ऐसा विचार केला ॥ मग पत्र अहिनळवाडा पाटणि ॥ व पैठणि लीहिलीं ॥ जर हा देश उत्तम स्थळ जाणोन रहित पंचाइत पाठवावी व चीरंजीव बिंबदेवास पाठवावें ॥ मुजा देश वसवावा ॥ म्हणोन पत्रें प्रविष्ट पैठणि जाली ॥ तेथोन अहिनळ-वाडा पाटणि पत्रें प्रविष्ट जाली ॥ राया गोवर्धनबिंबा प्रति पावलीं ॥ वाचुन अभिप्राव मनास आणिला ॥ मग बिंबदेवा प्रती निरोप दिधला ॥ तेधवा बिंबदेवाचे समागमीं कुळे ६६ देवोन रवाना केला ॥ तीं कुळें कोण कोण ॥ सोमवंशी कुळे २७ सूर्यवंशि कुळे १२ शेष वंशि कुळें ९ आणि पंचाळ-कुळें ५ मनुमाया २ सीलीक ३ त्राटक ४ देवाज्ञ ५ घोडेलकुळे ७ गुर्जरवैस्यकुळे ६ लाड १ दशालाड २ वीसालाड ३ मोड १ दसामोड २ विसामोड येवं अवघिं कुळें ६६ राजा बिंब घेवोन पैठणि आला ॥ आणि पैठणा होउन ॥ राया समागमे ब्राह्मणसमुदाय यजुर्वेदि माध्यानदिन भेद वाजस्निशाखेचे ॥ शास्त्रधारि वैदिकः पंडितः आचार्य उपाध्येः जोतिर्विदाख्यः प्रोहितः नाइकः हा समुदाय राया समागमे पैटणा होऊनः मुख्य गंगाधर नायक सांवखेडकर गोत्र पौतमाक्ष त्रिप्रवर ॥ कुळस्वामिण यकविरा ॥ सेनादिपत्य मेघडंबर सुर्यापान ॥ वीरगांठ हा राज्य मान्य ॥ व कुळगुरुत्व सिंधे शेषवंशिकाचे जाणुन सहकुटुंबि ॥ व विश्वनाथपंत कांबळे राजप्रोहित ॥ भास्कर पंडित चामरे ॥ गोवर्धनाचार्य देवधर प्रधान ॥ अनंत नायक छत्रे ॥ केशवराम घोडे ॥ इत्यादिक मोगरे॥ जाधवे:हेमटे ॥ हा देशस्तब्राह्मणसमुदाये ॥ राया समागमि आला॥ यांस मुख्य ठिकाण॥ पसपवालि इनाम गंगाधर नायकांस॥ विश्वनाथपंतास पाहाड ॥ यां संमतें सर्व वृति धरून दुजे गावोंगावि राहाविलें ॥ आपण ठाण्यास येऊन वालकेश्वरि रायास भेटला ॥ उभयांस भेट जालि ॥ आलिंगनवृत्ति संपादिली ॥ स्वस्तिक्षेम पुसोन साषष्ट कुळे जीं आलिं ॥ त्यांहीं राजा प्रणामिला ॥ व ब्राह्मणि आशिर्वाद संपादिला ॥ जाणोन राजा फार संतोषला ॥ मग दिवस ५ तेथे क्रमिले ॥ मागे सर्व समुदाये आपण वाहिनळें राजण फरास उत्तम ॥ जागा जाणोन वसाइत केली॥ दुसरि बसाईति मरोळि स्थापणे ॥ माहाळजापुर ॥ मालाड स्थापणे ॥ नरसापुरिं हि करविली ॥ प्रधान येत समई कान्हेरि योगेश्वरि ॥ महाकाळभैरवि ठीकाण ॥ सिद्धाश्रम ॥ राया हें हि कौतुकें सांगितलीं ॥ तीं रायें दृष्टि अवलोकिलीं ॥ कान्हेरिस राज्यधामे जाणुन तेथे वस्ति केली ॥ समुदाये आपला तेथे मेळविला ॥ देशा आलिया कुळास वृति दीधल्या ॥ सूर्यवंशि राज्यधामि

भाहिमी स्थापिले ॥ शेषवंशि सिंधे कुळें ९ नव त्यासि चवघले व मुख्य करोन दिधले ॥ धारापुरकर बाळकोजी १ व दुसरा विठोजी गव्हाणकर २ व तिसरा थेवखंडकर ३ व चवथा पाचघऱ्या ४॥ या उपरात सोमवंशि रखमाजिराव देशले २७ कुळाचे ॥ व या खालते चौघले ॥ येशवंतराव प्रथम १ सिवाजीराव २ गोपाळराव ३ मुकुंदराव ४ हे मुख्य टिळ्या विड्या चे ॥ यानंतर सूर्यवंशि कुळे १२ ॥ त्या मध्यें राजगोत्रि देसाये ॥ चौघले दामोदर १ बाळसेन २ श्रीदत्त ३ लक्ष्मीधर ४ हे मुख्य टिळ्या विड्या चे ॥ गुजर बखाल गावोंगावि दुकाने मांडावि ॥ तीन संवत्सर मोफत दुकानास मसाला नाहि ॥ उदिमी सुकडा नाहिं ॥ हरदेशिचा उदिम आणावा ॥ त्यास जखात नाहि ॥ संवत्सर ३ ॥ मग बंदिस्त होईल ॥ ऐसिं खत राया बिंबाने दिधलीं ॥ तेथवां पटवर्धन उभे राहिले जर आम्हि येथिचे स्थळगुरु ॥ आह्मास राजराजश्रीहि वृत्त आमाचि आम्हास द्यावी ॥ मग राजा बोलिला ॥ तुमचि वृत काढि ऐसा कोण आहे ॥ जी तुमचि वृत आहे ति तुह्मी सुखें खावी ॥ गावें वसवावी ॥ हे जे काहि नूतन आले आहेत आमचे समागमि त्यांचे हि मुळगुरु आले आहेत त्यासिं तुम्हासि तालुका काहि लागत नाहिं ॥ ऐसा निवाडा जाला ॥ गावोगाविं राहित स्थापिली ॥ ब्राह्मण येजुर्वेदि पळसौलिग्राम वृति ईनाम दीधला ॥ ते पळसौलिस राहिले ॥ या नंतर रखमाजिराव मरोळखापण्यासिं स्थापिला ॥ हवाला माहालें दिधली ॥ नव हजार सजगाणि वर्षास रायासी द्यावें ॥ त्याचे ताबिस गांव मरोळखाप-ण्या खालीं ॥ मुळगांव १ चाचाळे २ कालिणे ३ कुराळे ४ माहार ५ कोडि-वटे ६ राजवोळ ७ परतापुर ८ दळगांव ९ मोरवोळ १० वरवसं ११ तुगवे १२ सांखळी १३ चेंदरली १४ कोपरी १५ पोंवै १६ साहि १७ पळस-वलि १८ कोसिंबे १९ माहाळजास २० गोरखगांव २१ आरे २२ हीं गावें मरोळा खालि ॥ याच देशले ॥ रखमाजिराव ॥ यांहि गावांचा वसुल करावा ॥ यैसें खत दिधलें ॥ रखमाजीराव देशला मरोळा स्थापिला ॥ या उपर गंगाधरराव मालाडि स्थापिला ॥ दाहा सहश्र सजगाणिस खोति त्यासी दिधली ॥ त्याचे ताबिस गावं कोणकोण ॥ मालाड १ चिंचघर २ डिंडोसी ३ कुन्हार ४ पाहाड ५ वीलवड ६ वोळणे ७ मालवण ८ कांध-वळी ९ सिंपोवली १० येकसर ११ बोरवळी १२ कणेरी १३ माघठाण १४ पोईसर १५ दाहिंसापुर १६ नरसापुर १७ फोंजिवरे १८ लाजीवरे १९ अव्हेलि २० केतवली २१ विराळि २२ ऐसें बाविस गावें मालाड खापण्या खालिं ॥ गंगाधर या गावांचा देशला ॥ वसुल जमा करावा ॥ ऐसें खत

राया हस्ति साक्षसि दिधली ।। या रिती देशलें स्थापिले ।। छ ।। या उपरांत सिंधे शेषवंशि खलक पाईक गणाति सहस्र ३००० त्या मध्यें मुख्य बाळाजी सिंधा ।। शेषवंशि त्याचे हवालें बंदराकि चौफेर दिधली ।। त्या मध्यें पांच गावं ईनाम ।। वरकड सा हजार सजगाणि राजपैकि मसाला ।। ठीकाण उत्तना ।। उत्तन १ गोराई २ मनोरी ३ सावरी ४ वाडा ५ हीं गांवें ईनाम ।। ईतर मसाला ।। येरगण १ आगसं २ पढ २ येरावं ४ आंवौलि ५ बावौलि ६ आंधेरी ७ ईळे ८ पाटळे ९ तुरेर १० खारी ११ दांडे १२ जुहूं १३ कपामे १४ लाजुरलें १५ वसारे १६ डोंगरी १७ यवं गावें स १७।। मसाला ६ सहस्र सजगाणि ।। ऐसें खत रायें सिकाबंद दीधलें ।। बाळाजि सिंध्या कारणे ।। विडा पाटिलिकिचा रायें दिधला ।। यापरि तो पाटिल सर्व आपले खुमाचा ।। त्याणें उत्तनास चउक बांधिला ।। त्याचा निजांग पुतण्या तो जुहांस स्थापिला ।। त्यास हि पाटिलपद जाले ।। खाशाचा पुतण्या म्हणोन तो हि पद पावला ।। त्याणे जुहांस चउक बांधिला ।। नावं पोमाळ ठेविलें ।। त्याचे ताबिस काबिले ५० त्यांहि जुहा घरबंद केला ।। दुराठि वसविली ।। यावत् तारावर बंद केला ।। या उपरांत सूर्यवंशि गंभिरराव सरचिटणिस गोत्र वशिष्ट ।। कुळदेवता काळिका ।। त्यासि ईनाम वराळि पद पुरो देवोन आपले खुमासि स्थापिला ।। या उपरांत राजा तेथोन प्रभावतिसी आला ।। दीर्घी-पाळिसिं माहाल बांधिले ।। नावं माहिम ठेविलें ।। राजा माहिमा राहिला ।। संवत्सर ९ माहिमा राज्य केलें ।। राजपुत्र महिबिंब तो ठाण्यासि राहिला ।। त्याणे ठाणे वळकाविलें ।। समागमि विठोबा सोमवंशि सर फौजदार ।। त्याणे पांच पाखाड्या मसाल्यासिं घेतल्या ।। मसाला महीबिंबासि द्यावा ।। हजार ४ सजगाणि खत घेवोन पांचपाखाडि माहाल बांधोन राहिला ।। ताबिस राउत ५०० ।। आणि सिंधा शेषवंशि धर्मोजि आवल्या दळासिं चेंदणि राहिला ।। मसाला सहस्र ३ ।। चेंदणी १ माघेरी २ टेंभ ३ उतळेश्वर ४ ही चार गावें मसाला कबुल करोन ।। धर्मोजिराव उतळेश्वरि राहिला ।। माहाल बांधिला ।। पद वरातदार ।। या रिती धर्मोजिस वरातदार पद जालें ।। राज्यास वरात मसाला सहस्र ३ सजगाणी ।। या उपरांत कोलभाट वसविली ।। पाईकाहि ते सोमवंशि ।। त्याहि नांव कोलभाट ठेविलें ।। तेथे राउत राहिले ।। त्या उप-रांत सरफोजदाराचा गुमस्ता हरबाजि तोरणा ।। त्याणे माहाल हवाल्यासिं गावें १३ तेरा कबुल केलीं ।। सरकारजमा सहस्र ६ सजगाणि खोति खत घेतलें ।। गुदगांव १ व्याडि २ नाउर ३ भांडुप ४ मुलुंद ५ हरोळे ६ चिख-रवाळे ७ कानझुरें ८ कोंदरें ९ किन्होळ १० तुरभे ११ माडळे १२ मानी

१३ ॥ त्याणे आपला समुदाये घेवोन व्याडासी तटाकातिरी गांव रचिला ॥ गुद-गाव तो हि वसविला ॥ या उपरांत सरसबानिसाचा गोत्रज देवनरे ॥ तागाइत बारा गावें खोति केली ॥ बारा सहश्र सजगाणि खत घेतलें ॥ आपण देवनऱ्या राहिला ॥ देवनरे १ चेभुर २ वाडेवली ३ ह्याउल ४ घांटे ५ कोंपरे ६ चउक ७ चिल्हाणे ८ पारडि ९ बोरलें १० तुरफें ११ कोळगांव १२ हीं बारा गावें गंगाधरराये करोन आपण देवनऱ्या आपल्या समुदायें गावें वसविलीं ॥ तो तेथे राहिला ॥ या उपरांत राजा माहिमा होउन ॥ आपला कुळकर्णिक त्यास घोडबंदर ईनाम दिधलें ॥ तो घोडबंदरा पाठविला ॥ त्याणे नदीथडिचे गावं खोति ४० सहश्र सजगाणि खत घेतलें ॥ राजसिका घेवोन घोडबंदरा आला ॥ डोंगर चौफेर पाहिला ॥ उदक उत्तम जाणोन सेकनाड वसविलें ॥ तेथे शेषवंशि दादराव आपुलें समुदायें स्थापिला ॥ आपण घोडबंदर वसविलें ॥ ताविस गावें गणाति पाहातां ॥ घोडेबंदर १ बोरभाट २ सेकनाड ३ चेने ४ वडवोळी ५ कावेसर ६ वोंवळे ७ वाळखंभ ८ माझिवडे ९ केबळी १० घोडगांव ११ खराळें १२ कासिमिरे १३ चादवोळ १४ भाइंदर १५ गोर-देव १६ पाडेखल १७ सारवडी १८ नवघर १९ रेपवडे २० आगठो २१ माडलि २२ मुडघे २३ मोरवे २५ गोगरी २६ पाल २७ तारवडी २८ पाटालि २९ ह्मारवड ३० राये ३१ हीं गावें येकातिस ॥ तुरफे ३२ कोलसेद ३३ घालोन गावें तेतिस ॥ सरसबानिस आनंदराव ॥ शेषवंशि ॥ गोत्र हारित ॥ कुळदेवता हरबाये ॥ यांहि मसाला कबुल करोन आपले पैकि सत्तेसि राहिले ॥ इतक्यांत राजा प्रमादला ॥ रायाचि राणि सती निघाली ॥ मग बिंबदेवानें राज्य केलें वरुषे ६५ ॥ तेधवां चंपावति नगरी भोजराजा त्याणे चाल केलि ॥ उरणा पासोन शाहाबाज प्रगाणा मारित कळव्या कटक आले ॥ खबर राया बिंबदेवासि कळली ॥ तेधवां बिंबदेवें देशाला हकारा केला ॥ गावोंगावि पत्रें प्रविष्ट जालिं ॥ दळ मिळालें जमा जालें सहस्र ८००० ॥ कळव्या उतरोन युद्ध थोर जालें ॥ संवत १२४५ ॥ तेधवां भोजराजा मारिला ॥ दळासि मोड जाली ॥ तेधवां भोजरायाचा प्रधान साउमा जाला ॥ तें देखोन सिंधा शेषवंशि केशवराव उठावला ॥ युद्धासि दोघे प्रवर्तले ॥ युद्ध थोर जालें ॥ मग प्रधान मारिला ॥ मग रायाचा पाळकपुत्र उठिला ॥ त्या वर हंबिरराव मरोळचा देसाये ॥ उठोन युद्ध जालें ॥ हंबिरराव भोजाचा पाळकपुत्र मारिला ॥ उरलें कटक पळोन गेलें ॥ मग राजा मासवद्या तळयावर आला ॥ तेथें देसायाला वृती दिधल्या ॥ तेधवां शेषवंशि केशवराव नांवाजिला ॥ पदक गळयाचे दिधलें आणि पद चाधरि पावला ॥ या रिती केशवराव चोधरि जाला ॥ या उपरांत

देवनरेचे पाईके नामुस केला ॥ म्हणोन पद ठाकुर पावला ॥ मरोळचा देसाये थोर झुंजला म्हणोन काहाळा दोन श्रुति ॥ या उपरांत नाईकराव थोर युद्धी म्हणोन वाद्ये विराणे आणि वीरगांठ सावखेडकर पावले ॥ आणि रघुनाथपंत थोर झुंजला ॥ म्हणोन निशाण आणि सरदेशकि पावले ॥ उतनाचे बारा राउत पडले त्याचे कुळास पद राउत जालें ॥ कांधवळिचे १० पाईक पडले म्हणोन उरले कुळास पद चवघले जाले ॥ च्यार मान च्यार टिळे हातकडि पावले ॥ साहारकर हातकडि पावले ॥ कोडिवटिकर कुशळ जाणोन शाहाने हात-सांकळ्या घातले ॥ देवनरकर जुनाई झुंजार म्हणोन सरनाईकी-पद पावले ॥ चेंभुरकर ठाकुरपद पावले ॥ उतन गांहारास मोहोरिसिंग नरसापुरकर विरगांठ ॥ ऐसें पदें हे देणे राया बिंबदेवाचें ॥ पदे पानपटि टिळे देवोन देसाय गावोगावि गेला ॥ राजा माहिमास आपुले कुटुंबि गेला ॥ तेथे राहिला संवत्सर ९ ॥ मग पोटि पुत्र जाला ॥ धर्म बहुत केला ॥ या उपरांत राजा बिंब प्रमादला ॥ राजाची राणि कामाई ॥ पुत्र वरुषा ५ नावं केशवदेव ॥ या उपरांत कामाईचा अभिळाष प्रधानें करों आदरिला ॥ तेधवां कामाई आपले मनि खोंचली ॥ जर यासि कैसें करावें ॥ तेधवां माहिमाचा आपला अधिकारि बोलाविला ॥ त्यासि वृत्तांत सांगितला ॥ जरि प्रधान दुष्टबुद्धी त्यास कैसा यत्न करावा ॥ हरद पुरो अधिकारि बोलिला ॥ जर तुं आमचि माता ॥ तुज पाहे ऐसा कोण आहे ॥ मग दिविपाळिचे राउतासिं स्वशा केलि देश मिळविला ॥ वाडिया दाहा मध्यें परिवारु मेळावा मिळाला ॥ खुशालि केलि ॥ कुसुंबा भांग प्याले ॥ सूर्यअस्त होतां च माहाल प्रधानाचा वेढिला ॥ तेथें युद्ध जालें ॥ पाहाल्या पाहाल्या प्रधान मारिला ॥ सीर घेवोन कामाई जवळ गेले ॥ राणि खुस्याल जाली ॥ हरद पुरो आधिकारि आळंगिला ॥ देसला नावाजिला ॥ मग देसायाला वृति दिधल्या ॥ दीविपाळिचे राउताला वृति वाडिया दाहा बकसिस ॥ प्रथम मान टिळा विडा अधिकारि यांस ॥ सर्वेपणाचि प्रौढि तयाला ॥ मग अधिकारियान देसायाला हंकारा केला॥ मरोळकर मालाडकरांला येकसरकर पोईसरकर उत्तनकर सिंधे इत्यादिक सर्व देसाय मेळाविले ॥ आणि पळसवलिकर ब्राम्हण राजगुरु पाहाडकर वनेवाळकर समस्त ब्राम्हण बोलावोन ॥ केशवदेवासि अभिषेक केला ॥ राजासिक्के गळा घातले ॥ मग केशवदेवें कामाईस मिळोन देसायांला वाणे दिधलीं ॥ मरोळकर माधवजि देसले त्यासि वृत ९ स्यां फद्यांची ॥ त्या खालते चौघले त्यांसि फद्या ५ स्यां पाच ॥ त्या खालतें म्हातारे यांस फद्या ४ स्यांचि ॥ त्या खालते साहाणे फद्या ३ ॥ तैसे च मालाडखापणे देसला कमाजिराव ॥ त्यास हि वृत्त फद्या १० ॥

त्या खालते चवघले त्यासि फद्या स्यां ६ ॥ ह्मातारेयांला फद्या स्यांचि ॥ साहाणे यांला फद्यां ३ ॥ येकसरकर बोरवाळि तेथिचा पाईक पामराउत तयाला वृत फद्या ९ ॥ येरगळकर सिंधा त्यासिं उत्तनजुहुचे पाटेलकी बकसिस वृती ५ ॥ ठाणेकरांला वृति बकसिस ॥ चेंदणि उतळश्वरकराला टेम बकसिस ॥ सिंधा शेषवंशि हरवा राउत आणि पाटेल दोघे मिळोन वृत टेंम बकसिस ॥ हें देणे राया केशवदेवाचें ॥ मग केशवदेवें ठाण्यासिं राज्य केलें वरुषें १२ ॥ तेधवा धारेसिं भोज या जवळ गेला ॥ राया केशवदेवाची पदें बाखाणिली ॥ पितामोहो यैसि गद्यपद्य म्हणता जाला ॥ तेधवा राजा भोज कोपला ॥ कालिचें पोर एसा अभिमान धरिला ॥ दळवै बोलाविला ॥ आज्ञा दिधली जर सेना सिद्ध करावी ॥ हल्ला ठाणे कोंकणि ह्मणोन ॥ दळ सिद्ध जालें ॥ मुहिम केली ॥ थेट कळव्यास आलें ॥ परदळ देखतां हाहाकार जाला ॥ येक केशवदेवा प्रति सांगो आले ॥ जर कटक भोजरायाचें आलें ॥ देसायांला हंकारा केला ॥ देसाय देसाय देस मिळाला ॥ सिंध्याचा जमाव थोर जाला ॥ नगाऱ्या घाव घातला ॥ करणे बांके सिंगे डफ काहाळा विराणी वाजली ॥ पाईकापाईक जालि ॥ कळव्या युद्ध थोर जालें ॥ तेधवां देवनरेचे विनायक ह्मातारे याणे राया भोजाचें छत्रिची खिळ विंधोन छत्रि पाडिली ॥ दुसरे बाणे सीरिचा गंगाळटोप पाडिला ॥ युद्ध थोर जालें ॥ राजा भोज अपेसि जाला ॥ या नंतर भैसेदुर्गाचा राव त्या भोजासवें आला होता ॥ तो हि युद्धी मिसळला ॥ त्या वर येकसरकर पाईक उठावला ॥ तो सिंध्याहि वारिला ॥ मज असतां बापुडें म्हातारें युद्धी दबाजा करिताती म्हणोन संभाजी पाटेल शेषवंशि उठावले ॥ युध्या लागि प्रवर्तले महामारि पेटले ॥ दळ भोजाचें भंगिलें ॥ आणि भैस्यदुर्गांचा राव जीवंत धरिला ॥ मग आपलें दळ आलें ॥ केशवदेवासि भेटलें ॥ बंद हवाले केला ॥ या रिती केशवदेव येशवंत जाला ॥ भोजराजा शरण आला ॥ मग केशवदेवें तयासि बहुत मान केला ॥ पांच लुगडि सीरपाव दिला ॥ तैसें चि आनंदरावासि पैराविलें ॥ तत्समइं भोजरायें भोगाईत ठाण्यासि रचिलें ॥ या उपरांत केशवदेवें सिमल ह्मातऱ्यासिं वाहाते यंत्र आळा दिधला ॥ येकसारची पाखाडि बोखाळि तेथिचा पाईक ॥ त्यासी विरगांठ दिधली ॥ आणि वृत्त पोमदे राउताला बकसिस ॥ आणि सिंध्यासि अफदागीर दिधलें ॥ रायें केशवदेवाही ॥ सर्व आपुलें दळ पैराविलें ॥ मग राजा ठाण्या होऊन केझमरिस गेला ॥ ठिकाण कान्हेरिस केलें ॥ राजा कान्हेरि राहिला ॥ राजा भोज आज्ञा मागोन धारेसि गेला ॥ या नंतर येक

दिवसिं भोजराजे आंबे केशवदेवासिं धाडिले होते ते मार्गि देवगिरिचे राया जश्वयान घेतले ॥ वेठे रिते दवडिले ॥ ते येवोन राया केशवदेवासि भेटले ॥ वृतांत सांगते जाले ॥ आंब्याचा वृतांत ऐकोन केशवदेव कोपला ॥ प्रधान बोलाविला जर यासि येत्न हा चि भाट पाठवावा ॥ ततक्षणि रवाना केला ॥ जर कोंनिमित्य आमची भेट लुटावी ॥ भले हो चोरि करावी ॥ बेईजति लोक तुह्मी ॥ ऐसें जावोन भाट बोलिला ॥ आईकोन जस्वद्या कोपला ॥ त्याणे भाट परता केला ॥ जर माझ्या दुर्गास येवोन नाथ फोडावी ॥ या वचना भाट परता जाला ॥ येवोन केशवदेवांसिं भेटला ॥ वृतांत सांगितला ॥ आई-कोन केशवदेव कोपला ॥ देसाला हंकारा केला ॥ आला देस सर्व मेळविला ॥ सर्व जमा जाला ॥ नगाऱ्या घाव घातला ॥ निशाणे उभारिली ॥ सिंधे शेषवंशि आपले निशाणे आले ॥ सूर्यवंशि आपले निशाणे आले ॥ सोमवंशि आपले निशाणे सन्निध जाले ॥ नाईकराव आपले परिवारे साह्ये जाले ॥ दळ हंकारले ॥ भैस्यादुर्गा वरि चालिले ॥ वेढा घातला ॥ चौऱ्यासि दुर्गे पालटिली ॥ किल्ला अवगड हाति येत नाहिं ॥ ह्मणोन डेरा दुर्गा खालिं घातला ॥ राज्याचा निश्चये ऐसा जर गड घ्यावा ॥ वरषें भरली १२ ॥ चिंचवणि खादले ॥ त्या चिंचोऱ्याचे वृक्ष जाले ॥ त्याच्या चिंचा खादल्या ॥ ईतके दिवस राहिले ॥ परि गड हातिं येत नाहिं ॥ या नंतर आंधेरिचा ह्मातारा त्याचि वृत देसल्यान काढिली ॥ ह्मणोन ता पळोन त्या गडा वरि पाईक राहिला होता ॥ त्याणे राजयास पालती दिधली ॥ नाथ पडे ऐसें उपकर्म केले ॥ घरचा भेदु म्हणोन पालत जाली ॥ द्वादश वरुषा उपरांत पाईका पाईक जालि ॥ भैस्यागड घेतला ॥ राजा जश्वंद्या जिवंत सांपडला ॥ शर-णांगत म्हणोन रक्षिला ॥ आपले ताबि मध्यें ठेविला ॥ आणि त्या आंधे-रिचे गोजब्रासि ह्मातारा पद दिधलें ॥ वृति तीन बकसिस केल्या ॥ कापासे ॥ सिवार ॥ डोंगरी ॥ ऐशा वृति दिधलिया ॥ मग सर्व मिळोन नवसारिस आले ॥ तेथ राजा मदमस्त गोव्रराव त्यासिं युद्ध थोर जालें ॥ त्यासि ही हारविलें ॥ नवसारि घेतली ॥ तेथे आपले सेनेला नावाजिलें ॥ वाण थोर थोर वांटिलीं ॥ सिंधे शेषवंशि यांसि तुरे मोत्याचे दिधले ॥ सिरपाव बहुत वांटिले ॥ आणि माहिमकर विनाजि ह्मातारा ॥ त्यास हि वाण दीधलें ॥ थोर नावाजिलें ॥ देवनरकर गोपाळजि ह्मातारा तो हि नावाजिला ॥ तेथे चि पोईसकर त्यासि काहाळा दोन श्रृति॥ साहारकर बळकट ह्मणोन पटे दिधले॥ उत्तनकराला मोहोरसिंग ॥ गोहारिकराला विरगांठ आणि सर्वपणाचि प्रौढि ॥ येकसारकराला ॥ मोहोरसिंग तयाला ॥ येसांवकराला नावाजिलें ॥ येर-

गणकर श्रावनवीर यैसे सर्व आपले परिवारेसिं ठाणयांसि आले ॥ देसाला आज्ञा दिधली ॥ सर्व आपले घरोघर गेले ॥ त्या उपरांत राज्य केले संवत्सर ५ ॥ मग अकस्मात राजा केशवदेव यास देवआज्ञा जाली ॥ तेधवां तें राज्य करावयास राज्यवंश नाहि ॥ म्हणोन प्रधान जनार्दन राजि बैसविला ॥ देशे देश मिळाला ॥ तेधवां आपण प्रधान बोलतां जाला ॥ जर नवां तपयासि आपण राजा ॥ सर्वा हि मान्य ॥ माझिया वचनि राहावे ॥ वचना खेरीज जो होईल तो दसाखेरिज ॥ आणि चवदा माहालांचे दाम आह्मांसि भरावें ॥ जे देतिल नाहि ते मी पाहिन ॥ व ज्यासि वृति केशवदेवान दिधल्या आहेत त्या सुखें त्याहि भोगाव्या ॥ त्यासि कोणाचि बळात्कारि होईल त्यास स्यास्त आपलें देईन ॥ यैसा निर्वाह सांगितला ॥ तो सर्वासि मानला ॥ पान-पटि वांटिली ॥ टिळा सर्वासि जाला ॥ सर्व देसचे आपले घरांसिं गेले ॥ तें राज्य जनार्दनें केले संवत्सर ४ ॥ त्या उपरांत घणदिवा होवोन नागरस्या राजा वैश्य ॥ गणेशमंत्र उपाशक ॥ गोत्र कपिल ॥ कुळदेवत सोमनाथ ॥ राजा नागरस्था आपलें दळें दवणे प्रगट जाला ॥ संवत १२२८ तत् राजिंद्रच-क्रचुडामणौ शालिवान शके ११६३ माघमासे शुक्ल पक्ष ७ भौमे ते दिवसिं राजा नागरस्या कोकणि आला ॥ सवें पुरोहित देवदत्त यजुर्वेदि माध्यान-दिन ॥ कुळकर्णिक कायेस्त रखमाजि । सरजमातदार गंगाजि नाईक ॥ सर-सबनीस येशवंतराव ॥ या उपरांत पाईक येवोन ठाण्या प्रगट जालें ॥ जनार्द-नासि युद्ध जालें ॥ तेधवां जिंतिला ॥ मग आपला प्रधान केला ॥ राज्य काबिज केलें ॥ माहिमा आपण नागरस्या जावोन राजमहालिं राहिला ॥ मग सर्व देसचे मेळविले ॥ देसाये चवघले चोधरि ह्मातारे साहाणे पाटिल ॥ हवा-लदार ॥ माहालदार ॥ हाटखाल ब्राह्मण सर्व खुमे आपले समुदायें खतें कागदें पट घेवोन राजभेटीसि गेले ॥ सिरपाव जाले ॥ बैसकार सर्वासी दिधला ॥ देसायांसी मुलुक विचारिला ॥ जर हा देश कितिक प्रगाणे माहालें आदाय जमा विचारिला तेधवां सर्व खतें कागदें हिसाब चवदा प्रगाणे चवदा माहाल दोन खापणे ॥ चौफेर हिंसाब रायासिं दिधला ॥ जमा खजिना १४ लक्ष गबर उपज आहे ॥ हिंसाब दिधला तो राया नागरस्यास मानला ॥ या नंतर देसलिकीचा पटा केशवदेवाचे सिक्यासी ॥ देसला भाई ठाकुर पोई-सरकराला उंचि ओहाणे भाग ५ ॥ कांधवळकराला ओहाणे भाग ४ ॥ येकसारकराला ४ खाडिया ४ त्यांचि नावें सेरी १ पाहुडि २ बोवळि ३ वादळी ४ या च्यार खाडिया खतं मझरी ॥ या उपर उतनकराला सुकडा नाही ॥ यैसि खतें दाखाविलिं ॥ सिक्का केशवदेवाचा ॥

श्लोक

बकदालभ्यं यदा गोत्र प्रभावति कुलदेवतः ॥
ठाणे स्थाने कृतं राज्यं मम मुद्रा विराजितं ॥ १ ॥

ऐसिं खतें राया नागरस्याने पाहीली ॥ त्या वरि आपण हि सहि घातली ॥ त्यांचि त्यांपें दिधली ॥ मग पाठविले घरोघरीं ॥ त्या उपरांत राणि कोनि नीघाली ॥ पुत्र जाला तेधवां नागरस्यानें बहु धर्म केला ॥ ठाण्या हवालदारासिं पत्र लिहिलें ॥ धर्म लक्ष दामाचा ॥ माहिमा जोतिषि वतोळा करोन नामाक्षर केलें ॥ नाम त्रिपुरकुमर ठेविले ॥ ब्राह्मणासि लक्ष दाम दिधले ॥ त्या उपरांत चेउल चंपावति तेथे राजा भोज तो प्रमादला ॥ त्याचे हि कुळि पुत्र नाहि म्हणोन तें हि राज्य नागरस्यासि जालें ॥ मग दळ रायें नागरसें आपुले देशोदेशि ठेविलें ॥ ते संख्या ॥ चेवलास राजप्रधान आणि दळ घोडे २००० हस्ति १४ ॥ सजणगांवी ठेविलें घोडे ९०० हस्ति ६॥ सैलान ठेविले घोडे २०० हस्ति ५॥ चिखलिनवसारि ठेविले ५० ॥ प्रदापुरा ठेविले २०० हस्ति १ ॥ मुळगांवि ठविलें १०० ॥ ठाण्या ठेविले १००० हस्ति ५ ॥ एवं अवघे दळ चार सहश्र नवस ॥ हस्ति ३० ॥ या उपरांत मेहुणा नागरस्याचा बोलिला जर तुह्मि अवघा देश काबिज केला सत्ता आपुलि चालविता तर मी जो काहि तुमचे समागमि आलों मला काहि ठिकाण द्यावें ॥ जें मी नेमिलें आहे तें सांगतों ॥ ठाण मालाड व मराळ हे तीन गावें आपणासिं द्यावें ॥ तेधवां नागरस्या बोलिला जर अवघा देश तुमचा आहे ॥ परंतु हे तीन ठिकाणे सांडोन दुसरिं पाहिजतिल तीं सुखें घ्यावी ॥ तेधवां शब्द अमान्यता दिसोन आला म्हणोन तिघे भाव फिरावण जाले ॥ ते तेथोन निघाले ॥ ते देवगिरिस जावोन रामदेरायासी भेटले ॥ वृतांत सांगितला जर अवघे कोकण यावत् चंपावति राज्य नागरसें घेतलें ॥ आमचे बळें ॥ आतां फिरावण जाला ॥ आम्हासि दवडिलें ॥ ह्मणोन शरण तुजला ॥ जर आम्हास साह्य तुह्मी व्हावें ॥ राज्य नागरस्याचें घ्यावें ॥ आईकोन रामदेराव आपले दळे त्यांसि साह्य होवोन नागरस्या वरि चाल केलि ॥ कटक ठाण्यासिं आलें ॥ खबर राया नागरस्यासि कळली ॥ तेधवां चेंदणिकर पाटेल आपले दळे रामदेरायासि भीडला ॥ युद्ध थोर जालें ॥ ठाण्या होवोन कळव्यास पिटाळोन रामदेराय घातला ॥ जहर केला ती खबर राया नागरस्यासि पावली ॥ जे चेंदणिकर पाटेल आपलें परिवारें युद्ध केले ॥ तवं राजा ठाण्यासि आला ॥ सर्वांसि भेटला ॥ चेंदणिकर पाटेल बोलावोन आणिला ॥

सभे माजि नावाजिला ॥ छत्र सुवर्णकळसाचें दिधले ॥ मग नागरस्याचा पुत्र त्रिपुरकुमर पित्रु—आज्ञा घेउन शेषवंशाचि बहु योजोन युद्धि प्रवर्तला ॥ युद्ध थोर जालें ॥ मग त्याहि काढावा काढिला ॥ माहुलि प्रवेशले ॥ तेथे ही त्रिपुरकुमर पावला ॥ दळाधिपति हेमपंडित हारविला ॥ दळ भंगिलें ॥ ऐसें नागरस्याचे पुत्रास जालें ॥ नानोजी ॥ विकोजी ॥ व बाळकोजी हें हि हारविलें ॥ मग त्रिपुरकुमर येशस्वी आपुले गांवि आला ॥ रायासिं भेटला ॥ तेधवां माहिमकर म्हातारा दादपुरो थोर झुंजला ॥ ह्मणोन रानवटकर पद राणे पावला ॥ राणेपद राया नागरसें दिधले ॥ हें दणें राया नागरस्याचें ॥ व पाटेकर अनमानिले ॥ दळवाडियेसि नव-अर्बुदे नाव ठेविलें ॥ दुसरे बहु झुंजले त्यासि नांव बहुतका पदाचिं दीधली ॥ पाटकर आणि राणे हे पूर्वसंधि ह्मणोन पालवण कडु-पद चालोन आले ॥ साष्टिचा देसला आपले दळें बहुत झुंजला ॥ त्यासि सरचौक आधिकारिपद जालें ॥ गोहारिकरा पाईकाला विराण दिधलें ॥ नाउरकरांला नेजा काहाळा ॥ कांधवळकरांला घोडा दिधला ॥ साहारकरा पाईकां पाटवृंदे ॥ हें देणे राया नागरस्याचं ॥ छ ॥ ॥ छ ॥

त्याउपर देवगिरिचा राजा रामदेराव त्याणे जोडा अहिनळवाडापाटाणि लिहिला जर राजश्री जयसिंगदेवो जर केशवदेव निमाला ॥ ह्मणोन राजा नागरस्या घणदिवा होवोन येवोन राज्य घेतलें ॥ देश आपला केला ॥ त्याचे मेहुणे नानोजी व विकोजि व बाळकोजी माहाल म.गतां त्यास अमान्यता केलि ॥ म्हणोन आम्हास शरण जाणोन आपण हल्ला केला ॥ तो निर्फळ गेला ॥ म्हणोन तुह्मास लीहितों ॥ जर साह्य आपण होवोन चढाये करावी ॥ राज्य घ्यावें ॥ आपले व्रत शरणांगतास रक्षावें ॥ ह्मणोन लिहितों कीं पत्र देखतां मुहिम आदरावी ॥ आह्मि सीद्ध असों ॥ पत्र प्रविष्ट हातां च राजपुत्र आनंददेव दाहासहस्र अश्वासि अहिनळवाडेपाटणा होवोन निघाला तो देवगिरिस आला ॥ रामदेरायासिं भेटला ॥ तैसि च फौज कोकणा आलि ॥ वेसावे प्रथम घेतलें ॥ तेथोन आंधेरिसी आले ॥ तेथे युद्ध थोर जालें ॥ बावण सिंध्याचे पावले ॥ मारामारि जाली ॥ तेथे अहिनळवाडे-पाटाणिचा राजपुत्र पडला ॥ त्याची स्त्रि आंधेरिस सती निघाली ॥ तेथोन मोड जाली ॥ छ ॥

तें आईकोन नागरसें आंधेरिकरांला छत्रि दिधली ॥ वारने वांदरें नावाजिले॥ त्यासि हि छत्रि दिधली ॥ साहारकरांला आणि पालवणकरां हात सांकळ्या पावले ॥ त्या उपरांत देसालिक हादपुरोचा बंधु सोम ठाकुर देसला जाला ॥ मालाडि प्रवर्तु लागला ॥ आणि मरोळा कान्हा ह्मातरा त्याचा

पुत्र कुंडम्हातरा देसला जाला ॥ हे देसले मालाड व मरोळा प्रवर्तु लागले ॥ त्या उपर त्या नागरस्थान जैतचुरी बोलावोन आणिला ॥ धर्मपुत्र म्हणोन दळाचि नाईकी दीधली ॥ आणि येसावें चौफेर बंदरकी ते ही प्राप्त जाली ॥ जैतचुरी वेसावें आपुलें मत्ते प्रवर्तु लागला ॥ या उपरांत दीह्लिचा राजा दिल्लेश्वर तेथे तुर्क अवतार म्लेछ जन्मला ॥ तो गोवळा होवोन प्रवर्तु लागला ॥ तो कैसा वंशवृद्धि पावला कवणे परी ॥ द्वारका–नगरी गुजराथ-पदरी नगरसेठ विठलदास ॥ वर्ण वैश्य ॥ गणेश उपाशक ॥ त्यास संतान नाहि म्हणोन सर्व देशिचे ज्योतिषी विद्यार्थि बोलाविले ॥ अतित संन्यासि सर्व जमा जाले ॥ पृछा सेठान केली ॥ जर काहिं उपदेश पाहावा जेणे-करोन पुत्रसंतति होये ॥ यैसा प्रश्न आरंभिला ॥ तेधवां धर्मशास्त्र पाहिलें ॥ सोमयाग आणि ठाकुरजीचें देवालय बांधावें ॥ यैसा निर्वाह सांगितला ॥ तो विठलदासास मानला ॥ त्या उपरांत वर्ताळा केला ॥ तेधवां म्लेछ उत्पन्नता सांगितली ॥ जर दिल्ही मध्यें सुलतान उपजला आहे ॥ तो पातशाहि करिल ॥ तेधवां धर्म लोपेल ॥ देवालय भंगिल ॥ राजे देशो-देशिचे शरण म्लेछांसि होतिल ॥ म्लेंछधर्म वृद्धी पावेल ॥ कलयुगभाषित भविस्यार्थ आहे ॥ यैसि वाग्वाणि आईकान पृछा पुन्हा सेटे केली ॥ जर यासि येत्न पाहिला पाहिजे ॥ तर आपण दीह्लिस जावोन त्या सुलतानखत आणितों जर देवालय चिरायु राहेल ॥ ह्मणोन द्रव्य उटें च्यार घेवोन विटलदास द्वारके होवोन दिह्लिस गेला ॥ पृछा आदरिली जर सुलतानका डेरा काहां ॥ पुकारित जात येक खोपटि देखिली ॥ त्या मधोन ह्मातारि वृद्ध आलि ॥ विचारों लागलि जर सुलतान माझा बेटा ॥ तुम्हासि काये दरकार पुसाव-याची ॥ आईकोन सेट बोलिला जर त्याचि भेट घेणे आहे जरुर ॥ त्या योग्य काम जाणोन आलों आहे ॥ ती म्हणो लागलि जर सुलतान गोवांरे घेवोन चारायास नेलें ॥ त्यासि गोठाणि भेट होईल ॥ तेधवां त्या म्हातारिस समागमे घेउन गोपचारा पाहित गोठाणि गेले ॥ तेधवां त्या सुल्तानें काये आरंभिलें तें ॥ आपण धोंडि वर आसन घातलें आहे ॥ गोवंळे चौफेर उभे केले आहेत ॥ बोलणे मंजुळ दृष्टि कुर्म पाई पद्म शुभलक्षणें मंडित ॥ विठलदासें देखोन मनि गांठ घातली जर हा छत्रपति होईल ॥ तेधवां सेटे अर्ज केला ॥ जर मी मागेन तें दीधले पाहिजे ॥ तें आईकोन सुलतान बोलता जाला ॥ तर आम्हि गोवंळे पशु राखावीं ॥ आह्माजवंळ काये आहे तें तुमचें ॥ जाणोन मागणे नलगे ॥ आह्मा आज्ञा प्रमाण ॥ मग सेट बोलता जाला जे तूं आज गोवळ-

परंतु पातशा होसिल ॥ राज्य पृथ्विचें करिसिल ॥ तरी येक माझें मागणें ॥ जर आपण देवुळ द्वारकेस बांधितों ॥ तें कोण्हि भंगावें नाहि ॥ यैसें खत तुज पें मागतों ॥ तें दिधलें पाहिजे ॥ मग प्रतिउत्तर केलें ॥ जर माझे देणे या युगांत चालेल तें देतों ॥ तर देवालय सुखें बांधावें ॥ परी आकार वरि मसिधिचा करावा ॥ जे दुसरे पातस्याहि होतिल ते हि पाळितिल ॥ यैसें आपले हातिचें खत सेट विटलदासाल दीधलें ॥ मग त्या वाणियान सुलतानास द्रव्य उटें दोन दीधली ॥ आपण परतला ॥ द्वारकेस आला ॥ देवालय बांधिलें ॥ उपर सुलतान घरि आला ॥ द्रव्याचि गणित पाहिली ॥ द्रव्य ८ लक्ष हुन जाणोन हर्षला ॥ आपलि ज्ञात जेथे होति तेथोन बोलावोन जमा केली ॥ ५ सहस्त्र जमा जाली ॥ त्या उपरांत येक दिवस राजा दिल्लेश्वर पारधिसिं गेला ॥ दळ सर्व गेलें ॥ तें देखोन ईश्वरि इछा शक होणार ह्मणोन सुलताने चढाये केलि ॥ जावोन किल्ला घेतला ॥ रायासि कळलें ॥ तेथें युद्ध जालें ॥ राजा मारिला ॥ या परि पातस्या सुलतान तकतिं बैसला ॥ पातस्याहि करों लागला ॥ त्यासि पुत्र जाला ॥ नावं मुलतान आलावदिन नाव ठेविलें ॥ त्याणे निकामलिक वजिर केला ॥ त्या उपरांत दिल्ली होउन भाट कोकणि आला ॥ माहिमा राजा नागरशा त्यासि देखोन, पातस्या जीवें, मुलतान आलावदिन ॥ पद वाने वाखाणिलें ॥ तें आईकोन त्रिपुरकुमर कोपला ॥ ह्मणे हा दुर करावा ॥ नासिक छेदावें ॥ ग्रामा बाहेर देशि हाकलावा ॥ तो अपमान पावोन भाट दिल्लीस गला ॥ जावोन पातशासि अर्ज केला ॥ पातस्या जीवें, कोकणि अपेश पावलों ॥ तें देखोन आलावदिन कोपला ॥ मग निकामलिक पाचारोन हुकुम केला हिंदु चढया घोड्यासि फत्ते करावें ॥ राजे दक्षणेचें घ्यावें ॥ सर्व दळ घोडे १२०० फौज चालिली ॥ अमदाबाजीस आले ॥ चापानेर पाटणी राजा जयसिंग त्याचे राज्ये घेतलें ॥ ते हि समागमि घेवोन कोकणि आला ॥ कळव्या पावला ॥ तेथोन ठाणे काबिज केलें ॥ तेथें युद्ध थोर जालें ॥ तेथोन सिवां उतरला ॥ माहिमास गेला ॥ तवं राणिने गलबला आईकिला ॥ सेवक रायासिं पाठाविला ॥ वाळुकेश्वरि राजा गेला होता ॥ मग राणिन युद्ध केलें घटिक १० ॥ समरंगणि राणि पडालि ॥ मग राउळ लुटिलें ॥ तेथोन भाईखळ्या येतां रायासिं भेट जाली ॥ भाईखळ्या युद्ध जालें ॥ तेथें राजा मारिला ॥ राजा राणि मारिली ॥ निका मलिकें राज्य घेतलें ॥ मग तेथोन निका मलिक परतापुरि आला ॥ राउळ उत्तम देखिले ॥ तेव्हां जैतचुर्‍याचा पुत्र भागडचुरि प्रथम निका मलिकास भेटला ॥ देसाची जमि सांगितली ॥ माहाले प्रगाणे खापणि गावे वोळी ॥ हवाले मसाले हाट बखाल आदाय

खर्च ॥ सर्व निका मलिकास सांगितलें ॥ तें आईकोन निका मलिक मेहरवान होउन भागडचुरि हुजुरमजलासि-पद दिधलें ॥ मग निका मलिक परताबपुरि राहिला ॥ मग तेथोन पत्रें दिल्लीस पाठविलीं ॥ खबर दिधली ॥ जर कोकण घेतलें ॥ तेधवां निका मलिकाचा बंधु मलिक आलावदिन नामजाद केला ॥ त्यास हि कोकणि पाठाविलें ॥ तो टाण्यासिं आला ॥ निका मलिक बंधुसि भेटला ॥ देश ईनाम पातस्यान केला ॥ मग निका मलिक आणि मलिक आलावदिन दोघे राज्य करों लागले ॥ ईतुक्या उपर कजीया भाईदरकरा वर घातला ॥ जे हे आपले गावांचा हासिल खात आहेत ॥ ते पाटेल धरोन आणिले ॥ ते दस्त केले ॥ तें देसल्या सोम ठाकुरास कळले ॥ मग जावोन अर्ज केला ॥ जर हे हरामखोर होति ॥ जे जामि दिवानीचि त्याचा मसाला खातिल ॥ तें आईकोन निका मलिक कोपला ॥ हिसाब केला ॥ जर यांहि हिसाबीं ३२००० सजगाणि देणे ॥ मग तीं सोम ठाकुरें देवोन सोडविले ॥ तेंधवां भागडचुऱ्यान निका मलिकास उडविलें ॥ जर हा सोमठाकुर कुफ-राणदार ॥ यास शासन कांहि योजावें ॥ आणि मातबर फार जाला आहे ॥ पैका फार आहे ॥ तें आईकोन त्या सोमठाकुरास बोलावोन त्या वर १६०० हजार दाम काढिले ॥ जर तुं आह्मास देणे आहेत ॥ तो ह्मणो लागला तुं दिवान आहेस ॥ आपण कोण्हास कव दणे नाहीं ॥ मग निका मलिकें त्या देशल्या वर हट धरिला ॥ मग जैतचुऱ्याचा पुत्र भागडचुरी बोलावोन देश-लिक देशाचि देवीं आदरिली ॥ ते वेळि भागडचुरि बोलिला जर देसला सोमठाकुर आणि पांपरुत असतां कैसि चालेल ॥ हे जर माराल तर केलि जाईल ॥ हे असतां होत नाहीं ॥ मग निका मलिकें विचार केला ॥ पात स्यायास कागद लिहिला ॥ जे आपण सायेबि हुकुम ह्मणोन या कोकणि आलों ॥ तेधवां हा भागडचुरि येवोन सर्व देशाचि जमी सांगितली ॥ त्यांतिल जमी हे देसाये विकितात ॥ लांच हि खातात ॥ कांहि ह्मणावें तर देश मोडों पाहतात ॥ या करितां हे हरामखोर हिंदु ॥ साहेबि बोलावोन न्यावे ॥ जें शासन घडेल तें करावें ॥ पत्र देखतां दिल्लीस देसले नेले ॥ त्यां मागे लाच हि पातशायासि पावला ॥ तेणे करोन पातशा हि कोपला ॥ देसल्या जवळ पुसता जाला ॥ जर जामि आपसंतोषें विकावि ॥ गईबत करोन ॥ भय नाहि ॥ दुसरोन विलाथ मोडु पाहाता ॥ जाब काठिण आईकोन सोमठाकुरें कुडु प्रत-विला जर काबिला कादावा येथे अनर्थ आहे ॥ या उपर देसला सोम ठाकुर मारिला ॥ पायरुताचि खाल काढिली ॥ सोमठाकुराचें पोट चिरोन आता-ड्याचि वात करोन रक्ताचें तेल करोन दिवा जाळिला ॥ नांदुराखिचे झाड-

खालिं रक्तें दिवा जाळिला ॥ परि हरामखोर न दिसे ॥ तेधवां पातशा विचारि पडला ॥ तर देसलें व्यर्थ मारिलें ॥ हा सोमठाकुर ॥ याचे उदरि जो पुत्र असेल तो सर्वांचा दीप आणि मुगुट ॥ ऐसि दुवा बोलिला ॥ मग भाटि तो हि वाखाणिला ॥ पत्रें कोकाणि पावली ॥ जर देसले मारिले ॥ तें ऐकोन निका मालिकें भागडचुरि बोलावोन आणिला ॥ देसलिकीचा विडा देवों आदरिला ॥ तेधवां गावोंगावि मनुष्य धाडान सर्व देश जमा केला ॥ त्या प्रत श्रुत केलें ॥ जर देसले पातस्यायें मारिले ॥ तर हा भागडचुरि आज पासोन चवदा प्रगाण्याचा देसला ॥ याचे आज्ञेन सर्वांहि राहावें ॥ याचि आज्ञा जो मोडिल शासन त्यास आपण लाविन ॥ ऐसें बोलोन विडा देवों आदरिला ॥ तेधवां चहु गाविंचे उभे राहिले ॥ न्याव केला ॥ जर आमचा देसाये सोमठाकुर आणि पांपरुत ॥ त्या मागे त्याचा वंशिक जो असेल तो ॥ त्या विरहित कोणि सत्ताधारि आम्हास नाहीं ॥ या उपर तुं दिवान आहेस ॥ परंतु आमचे ज्ञातिस न्यायास आमचा असेल तो आम्हास ॥ या उपर हुकुम दिवान करितिल तर अवघा देस माफिल आहे ॥ ऐसा निकर चहु गाविंच देसले बोलिले ॥ पोईसकर ॥ उतनकर ॥ येकसारकर ॥ आणि कांधो- ळकर ॥ उठोन चालते जाले ॥ ते निघोन गेले ॥ तेधवां निका मलिकें भागड- चुऱ्यास जाव केला ॥ जर घोणिस पाये ८४ ॥ चहु पायां करितां घोण लगडि नव्हे ॥ तुला अवघा देश माफिल आहे ॥ म्हणोन विडा दिधला ॥ भागडचुरि देसला केला ॥ तेधवां भागडचुरि देसला बोलिला ॥ जर माझि दुराये देतां अवघ्याहि बोळगे यावें ॥ न याल तर तुमचे पालवणपद काढिन ॥ बोलणकराना देईन ॥ तें आईकिलें ॥ येकसारकर बोलिले जर हें आमचें पद काढि ऐसा कोण आहे ॥ मग चहु गाविचे येकत्र मिळोन विचार केला ॥ जर हें बरें नव्हे ॥ आणि त्या भागडचुऱ्यान दुष्टादुष्ट धरिली ॥ भल्या भल्यांच्या स्त्रिया बळत्कारें कर्म आचरिला ॥ ते हि नीका मलिकास कळलें ॥ त्याणें हि आज्ञा चहुं गावि दिधली ॥ मग ते चहु गाविंचे येकत्र मिळाले ॥ विचार दृढ केला ॥ मग ठाण्यास गेले ॥ तेथोन दादरुताला वृत्तांत सांगितला ॥ अवघ्यांचा विचार दृढ जाला ॥ मग ठाण्या होवोन सर्व जमा पाहाडिस आले ॥ आंबनाईकास भेटले ॥ मग तेथे राहिले ॥ ते च दिवसि भागडचुऱ्याचा बंधु कमळचुरि विराणे वाजवित परतापपुरि जात होता ॥ तों वाद्यांचा गजर दादरुतें आईकिला ॥ मग पृछा केलि जर हे विराण कोण्हाचें ॥ पाहाडकर ब्राम्हण बोलिले जर कमळचुरि भागडचुऱ्याचा बंधु परतापुरि जात आहे ॥ आईकोन दादरुत बोलिला जर हे विराण फोडि ऐसा कोणि आपल्यामध्यें

आहे ॥ तेधवां पहाडकर ब्राह्मण बोलिले जर पोईसरकार आपलि भाख देतिल तर आम्हि भंगु ॥ मग पोईसरकारि आपुलि भाख दिह्ली ॥ मग ब्राह्मण धांवले ॥ विराणे फोडिले ॥ त्या उपर देसला आपुले गावि आला ॥ उपरि वरि बैसला ॥ चहु गाविंचे मिळोन काहाळा वाजविल्या ॥ सोळासें वोडणखांडे मिळाले ॥ देशांत लुट करों लागले ॥ तें देखोन पहाडकरि ब्राह्मणि वारिले ॥ जर जो खर्च होईल तो आम्हि देवों ॥ त्या उपर हेर धातली ॥ तर भागडचुरि हरवादेविचे यात्रेस गेला होता ॥ इतक्यात पाहाडकरि चुऱ्यास निरोप पाठविला ॥ दादरुत गावांस आला आहे ॥ जमा लोक मिळाले आहेत ॥ म्हणोन तुह्मी दाडिये सुखासनि येतां हुशार होणे ॥ या उपर चहु गाविंच मिळोन बाहुटा उभारिला ॥ जर जे भागडचुऱ्या सर्वे असतिल ते गांवा खेरिज ॥ अवध्या हि देसल्या दादरुता जवंळ यावें ॥ न याल तर देसा खेरिज ॥ तेधवां मालवणिचे तटाकी वेंटनाइक स्वयंपाकी होत॥ बाहुटा आईकोन चऱ्हविया टाकोन लोक सारे दादरुता कडे मिळाले ॥ भागडचुऱ्याचे सर्वे राहिले नाहीं ॥ जे स्वांग जिवाचे होते १२० तीतके राहिले ॥ मग भागडचुरि पांचवा देविस आले ॥ दृष्टाद्रुष्टि जालि ॥ सीमल ह्मातरा सन्मुख होवोन भागडचुरि हडकिला ॥ तो हि साउमा जाला ॥ दोघांचे दळ दोघांचे पाठिस राहिलें ॥ पूर्वपश्चमे जालें ॥ पस्याचे हात दाखविले ॥ भागडचुऱ्यान वार केला ॥ सीमल ह्मातरा उत्पवन होउन घाये चुकविला ॥ काळवटा पावला ॥ तैसा च पस्याचा मीरका हाणितला ॥ भागडचुरि घायाळ होतां आदळा-आदळ जाली ॥ आरोळि फुटली ॥ त्या च वेगेसा जण अंगलग भागडचुऱ्यास घेवोन निघाले ॥ ते सीमल ह्मातऱ्यान देखिले ॥ मग पाठि लागले ॥ तवं भागडचुऱ्यासहित काररडाह्या पावले ॥ उड्या डाह्यांत घातल्या ॥ तवं सीमल ह्मातरा तो हि पावला ॥ तवं हे अंतरले ॥ तेधवां त्या डाह्यात तारु होतें ॥ त्या तांडलास सीमल म्हातऱ्यान हडकिलें ॥ जर तो निळे पगडिचा भागडचुरी मारिसिल तर जें तुं मागासिल तें देईन ॥ आईकोन तांडेल बोलिला जर आपली कंन्या देसिल व जातित घेसिल तर मारिन ॥ आईकोन सीमल ह्मातरा बोलिला जर तुला जातित देसल्या जवंळ सरता करिन आणि कन्या हि आपले कुळि देईन ॥ सत्य वचन दिधलें ॥ मग त्या गोमतांडलें पालकोईति हाणितली ॥ ती वर्मि भागडचुऱ्यास लागल्लि ॥ तेणे गब्बजला ॥ तवं तो गोमतांडलें ठाडि टाकोन चुडावल्याचा मारिला ॥ ऐशा परि भागडचुरि मुक्ति पावला ॥ आणिक दाहांतिल येक मारिला ॥ नव जण पार झाले ॥ ते वेल्ह्याळि उतरले ॥ मुडध्यास जावोन मायेदरासिवा वरुन जुहां

उतरले ।। तेथोंन नागाव्यांस आले ।। तेथोन वर–दक्षिणीस आले ।। तेथें माधव माळि त्याणे त्यांचें आथिथ्य विशेष केलें ।। त्यासिं विचारिलें तुह्मी कोण कोणाचे ।। त्यानी मुळकथा सांगितली ।। भागडचुरि मारिला ह्मणोन आह्मास येणे जालें ।। तरि येक विनंति आमाचि जे आमचे काबिले राहिले ।। तेधवां त्या माळ्यान आपला पुत्र पाठविला ।। तो जावोन काबिला आणि कमळचुरि घेवोन रात्रि आऱ्यास येवोन डोंगरवाटे चेन्यास आले।। तेथोन ससुफाफळी उतरोन घरि आला।। काबिले भेटविले।। वस्त्रें फिरविली ।। मोति स्त्रियांहि टाकिली ।। पुरुषाहि ह्वालि सोडिली ।। माळि वेश धरिला ।। उदिम माळियाचा सिखों लागले ।। माळिवें कमळचुरि आपला काबिला घेवोन पैलाड उतरोन केळव्यास गेला ।। तेथें दामकवाळि हाटवस्थान राहिला ।। वाडिया लाविल्या ।। त्याचि परंपरा तेथे जाली ।। या उपर नाम सावा भागडचुऱ्याचा भाणज ।। तो आगासि राये–भाट तेथे घरताचा आणि ह्मातान्याचा संग धरोन राहिला ।। त्याची परंपरा तेथे जाले ।। या उपर त्या माळियाचा सोहिरा कवाळि तो आळवाडिये तेथे निंजंग भागडचुऱ्या जावोन मलिक आलावदिनला भेटोन वाडिया १० खोति आणिल्या ।। वीस हुन दिवानि द्यावे ।। यावत मुक्तेश्वर खोति आणिली ।। आपण तेथें कुटुंबि दाद राउत माल सावा दाम राउत गोविंद ठाकुर आणि नार घरत अवघे येकत्र राहिले ।। त्यांचि परंपरा मोहोरे सांगेल ।। छ ।। छ ।।

मग भागडचुरि मारिल्या उपर त्या सोमल ह्मातरेयान त्या तांडलासि घेवोन देसल्या दादरुता जवळ आले ।। वृतांत ह्मातऱ्यान सांगितला ।। जर हा गोम-तांडेल फार उपकारला ।। यासिं आपण जातिंत घेवों केला ।। आणि यासिं कंन्या कुळिची देवों केली ।। तर तुह्मी देसले ह्मणोन दिधलें वचन पाळावें ।। जर ज्याणे कांदरडाहि उडि घालोन पालकोईतिमी भागडचुरि आणि त्याचा गुमस्ता हे दोन खुन केलें ।। तें आईकोन देसला खुसि जाला ।। तांडेल आपले मुखि वाखाणीला ।। मग आंब नाईक आणि पोस नाईक बोलावोन आणिले ।। वृतांत सांगितला ।। त्याही प्रायाश्चितें नेमिली ।। मग ज्ञातिन मरता केला ।। गोत्र दिधलें ।। दरण्याचि कंन्या त्या तांडलास दिधली ।। गंधर्व–विवाह केला ।। मग त्या तांडलाला नावं गोविंदजी दीधलें ।। गोत्र कश्यप ब्राह्मणि दिधलें ।। तेधवां त्या तांडले अर्ज देसल्या प्रत केला ।। जर मला वृत वेगाळि देणे ।। मग देसल्यान वृती बेलवडी १ खारवडी २ केतकवडी ३ ऐशा वृति देवोन तांडेल तेथे स्थापिला ।। आपल्या सरसा केला ।। या उपर पाहाडकरि आंब नाईक व पोस नाईक याहि अर्ज केला जर आह्मि खर्च १६० ळासया फद्यांचा सोंचि-लात ।। तुह्मी देसले असतां ब्राह्मणाचें चांडिम वाळावें ।। तेधवां त्या दादरुतें त्या ब्राह्मणासि सेत नवजाळें उंबरवाडि यावत् गळवंड आपखपाणख ये इतकि सेतें दिधली ।। ब्राह्मण सुखिकेले ।। यानंतर पोईसकरांला उचित होणे· भाग

च्यार ऐसें सर्वांसि सुखि केलें ॥ मग पाचवा देवि होवोन निघाले ॥ सर्व समुदाये गावि आले ॥ तेधवां तुरेल चातुरें वाजवित पुढें आला आणि मालवणिचा माळि फुलें घेवोन पुढें आला ॥ उचित देसल्या साउमा उभा राहिला ॥ त्याचे सर्व राम सावात्या माळियाचा सोहिरा तो हि देसायासि भेटला ॥ त्या देखोन देसला विचारों लागला जर तूं कोण कोणाचा ॥ जाब साव्यान केला शरण रक्षाल तरि सांगेन ॥ देशला बोलिला जो कांहि शरण त्यासी निर्भय आहे सांगतां विलंब न करावा ॥ तेधवां रामसवा बोलिला जर आह्मि भागडचुऱ्याचे सोहिरे माह्मि वृत तेथे आहे ह्मणोन येणे जालें ॥ मग त्या देसल्यान त्या माळियासि वृतिचा पैका दिधला ॥ त्यासि आज्ञा केलि जर तुं येथें न राहावें ॥ मग त्या माळियाचि कंन्या देसलें सोम ठाकुरासी देववीली ॥ ते चि सोहिरिक जाली ॥ छ ॥

त्या उपरांत सीव ठाकुर व सोई ठाकुर हे दोघे देसले जाले ॥ तेधवां पोईसरकरांसि पालवण ॥ येकसारकर कडु ॥ त्यासी कडुपण न चाले ॥ ह्मणोन नातवां भाचयांसि दीधलें ॥ ते वेळि वृत आंकुलवलिची जाली ॥ ह्मणोन कडुपण आंकुलवलिसि आलें ॥ मग नवसारिये दिवान फिरले ॥ तेणे सर्वांचा सिधावो घेतला ॥ खांडियाचें जोर जींकला ॥ बळें अधिकार केला ॥ त्याणे सीव ठाकुर व मोई ठाकुर देसले नेले ॥ त्या पासोन मालाडतपा मरोळतपा पाडलेकर यांचा खंड घेतला ॥ आणि अधकारी नेला ॥ चौघे मिळोन नवसारि खाली विलाथ जे माहिम यावत् ठाणेकोकण चवदा माहालें माहिमा खालीं त्याचा सिधावो घेतला ॥ त्या माग राज्य लाहुरस्यासिं जालें ॥ राजा माहिमासि आला ॥ लाहुरस्यें ( राज्य ) केलें वरषें ९ ॥ मग तें राज्य आलि नाखवासि दिधलें ॥ आलि नाखवा चापाणिर सांवत—राज्य माहिमचें करो लागला ॥ तेणे कोट बांधिला ॥ त्या कोटा बदल वृति वाडिया ५ बकसिस दीधल्या ॥ त्या वाडियांचि नावें ॥ तबसी १ देवळाची २ खोपेश्वराची ३ घोडभाट ४ सीरसाळी ५ ह्मातान्यासिं बकासिस दीधल्या ॥ छ ॥ छ ॥

तेधवां कडु उभे राहिले जर ह्मातारे वृत आह्मि असतां पावतिल कैसी ॥ तेधवां ह्मातारे दिवानि मिळलें ॥ तेण्हे करोन कडु वांदऱ्यास आले ॥ ते वांदऱ्या राहिले ॥ यांचे वडिल अधकारि वर्तोन गेले ॥ आणि ये हि अदकारि ॥ वानठेकर ह्मातऱ्यापैकिंचे ॥ कडु त्या खालचे ॥ यैसा निवाडा पाहातां ॥ वृति ह्मातान्यास पावतां तया न्याये दोघांचा वेवाद खुंटला ॥ वृति ह्मातान्यांस भोगल्या ॥ कडुहि ह्मातान्यांस वोळगें यावें ॥ आह्मि जेथें नसों तेथ मान्य अदकारांचा कडुवांस ॥ या उपर साष्टि मालाड खापणें तेथे देसला सिव ठाकुर त्याचा पुत्र कान्ह ठाकुर ॥ देसलिक कान्ह ठाकुरासि पित्यान स्वईछे दिधली ॥ तो चालवों लागला ॥ तेधवां होळित सिंधे खेळों निघाले होते ॥ छत्र कळसाचें लाविलें होतें ॥ तेथे

कळ कान्ह ठाकुर देसाय याणें पाडिली ॥ ह्मणोन येरगळकर सिंध्याहि देसल मारिला ॥ त्याचे शुद्धीस उधर राउत गेला होता ॥ तो हि तेथे मारिला ॥ तेधवां पोईसरकर आणि येकसारकर मुड घ्यावया धाविले ॥ त्यांसि बोलणेकारी वारिलें ॥ जर ते सिंधे खांड्याचे पाईक आपण येक विचार करों जर सर्व जमा आजि मेळवों ॥ हातेरवट समागमि घेवोन येरगळास जावों ॥ आणि कळ पाडों ॥ तेथ मुड देसल्याचा घेवों ॥ म्हणोन आपले खलकें मुस्तेद जाले ॥ छत्रि निशाण सर्व घेतलें ॥ मालवाणिसि गेले ॥ तेथे निशाण उभारिलें ॥ खबर येरगळा पावली ॥ तेधवां दादाजी राउत व पाटेल सर्व खुमाचा त्याणे आपला जमा सर्व मेळवोन निस्याण लाविलें ॥ छत्रि मुस्तेद केलि ॥ काहाळा वाजविल्या ॥ गावोंगाविचे सर्व मिळाले ॥ मग मालवणिचे तळयावर जमा जाला ॥ तेथे पाईक पाईक जाली ॥ युद्ध तुंबळलें ॥ पोईसरकर देसला मारिला ॥ मालाडकर मरोळकर हारिस आणिले ॥ निशाण आणि छत्रि सिंध्याहि नेलि ॥ देसल्याचि मोड जालि ॥ तेथोन येकमेकास हट वाढला ॥ त्या उपरांत सिंध्याचि वरात नोवरा नोवरि जुहांस जाता गोरगाविचे पाईकांहि लुट केली ॥ तें पाटलासि श्रुत जालें ॥ त्याणे ठाण्यासि श्रुत केलें ॥ तर त्या ठाणकरांहि जाब केला ॥ जर देसलयासि कंबर बांधितात आपल्यासिं अपेश येईल ॥ कां जर ते बहुत आपण जवळि असतां वाईट कां करावें ॥ ऐसा जाब ठाणकरीं दिधला ॥ त्या जाबास येरगळकर मडकर उत्तनकर आकिसेकर मखेकर गोन्हायेकर आणि जुकर हे अवघे येकत्र मिळोन विचार केला ॥ जर आह्मि शस्त्रधारि असतां अपेश शेशवंशास येईल ॥ ह्मणोन जमा होवोन दिवानि पाणिसावंता जवळ आले ॥ त्यासि वृतांत सांगितला ॥ जर आमचा अन्याय असेल तर आमचे पदरि घालणे ॥ तेधवा दिवानि देसले अधिकारि नेले ॥ त्यासिं दिवान विचारों लागला जर प्रथम कळ कोणि उभारिली ॥ तें सत्यवचानि दिवानि सांगणे ॥ तेधवां देसले बोलों लागले ॥ वृतांत सांगितला ॥ तरि देसला कान्ह ठाकुर मारिला ॥ यांसि आंह्मासीं विघडाव जाला ॥ तो साहेबि निवडितां अनर्थ आहे ॥ या बोलास दिवान उठिला ॥ दोघांसि भेट केली ॥ विडे दिधले ॥ गांवोगावि पाठविले ॥ या परि सींधे आणि सोमवंशि यांसि वैर पडलें ॥ मग पाटेल दादराउत गोत्र हरिंद्र कुळस्वामिण हीरवा–देव उपनावं गव्हाणकर आपुले समुदायें वसईस आले ॥ विनायेक–तटाकि घरबंध केला ॥ त्याचे सर्व खुमे ४ आलि ॥ ते कोण कोण ॥ राउत गोत्र हरित कुळस्वामिण हीरवादेव उपनावं सावंखेडकर ॥ पाटेल गोत्र रेणुक कुळदेवता योगेश्वरी उपनावं येवखंडकर ॥ चोधरि गोत्र कापिलमुनि कुळस्वामिण वज्राये उपनावं धारवडिपुरा ॥ या उपरांत पांचघरकर राउत गोत्र आस्तिक कुळस्वामिण येकविरा ॥ हि च्यार खुमे प्रथमआलिं ॥ अवघे आपुले समुदायें हाटवणि आले ॥ विनायकतटाकिं राहिले ॥ तेधवां कजिया येकमेकात पडला ॥ जर टिळ्यास अधिकारी सावंखेडकर ॥ तेधवां निवाडा जाला ॥

जर प्रथम टिळा चोधऱ्यांसि धारखडिपुरकरांसी ॥ पहिला मान पानपटी ॥ दुसरा रावासी ॥ गव्हाणकर अधिकारि ॥ दुसरा टिळा मान पानपटी ॥ तिसरा पाटेल थेवखंडकरांसी टिळा मान पानपटी ॥ चवथा पांचघरकरांसिं चवथा टिळा मान पानपटी ॥ या उपर सांवखेडकर पांचवा मान पानपटी ॥ ते झाजारे उपनावं ॥ सावा ठाकुरांसि मान टिळा विडा ॥ हे ठाकुर वस्ति नारतळें तथोन आले ॥ गोत्र कपिलध्वज कुळस्वामिण कालिका ॥ उपनावं चांचरे ॥ यांसि मान सावा पानपटी ॥ या खालते कुडु उपनावं पालवणकर गोत्र काशेश्वर कुळदेवता काळबा-देव यांसि मान सातवा पानपटी ॥ ७ ॥ राणे आणि पुरो हे दोघे अधिकारि ॥ सर्वेपणाचि प्रौढि तयांला ॥ टिळ्याचे आधिकारि राणे गोत्र अंबऋषि कुळस्वामिण येकविरा ॥ आणि पुरो गोत्र जमदाग्नि कुळस्वामिण त्वरिता ॥ या उपर ठाकुर हे नारतळ्यासिं पुर्वे ठीकाण गोत्र काशेश्वर कुळस्वामिण कालिका उपनावं नारतळें ॥ या उपर राउत मागें आले गोत्र अंबरुषि कुळदेवत हे मांडवगडा पासोनि आले ॥ त्यांस नावं मांडवगडकर पद जालें ॥ ते हि अधिकारि टिळ्याचे २ ॥ त्याहि कांधवळि वसविली ॥ ते कांधवळे राहिले ॥ या उपरांत ऐसें प्रकारें ही खुमे जागा टाकून आणिक जागा देशोदेश भरले ॥ बछापुरि बारा पाखाडियांस वसाईत सोळा गावीं वसाईत सोळागावकर प्रथक् प्रथक् राहिले ॥ या उपर राज्यें हें तुरकाण फार बळकट जालें ॥ म्लेंछ उत्तरपंथ पश्चमपंथ गुजराथ काबिज करित पैठणः चांपानेरः भागानगरः काबिज केलीः॥ खंबेत हि घेतली ॥ तेथें कीतिक युद्धं जालिं तीं लिहितां पध्येत फार होईल ॥ हें मात्र सकळित सांगतों ॥ येथे मज विशेष गर्ज ॥ जर पुढें भविष्योत्तर पुराणिचे संमत असे कीं हे वर्ण उत्तम फार पिडतिल ॥ वर्णावर्ण वोळख जाईल ॥ आपले कुळाची याद विसरातिल ॥ तेधवां ब्राह्मण आपला आभिमान धरुन ह्या लेखाचा संग्रह ठेवितील व जे काहि राज्यअभिमानि ते हि फार या कुळावळिस जतन करोन रक्षीतिल ॥ सत्यवंत सत्यसरश्वती हिचा शोध करितील ॥ तें प्रगट असे॥ ब्रह्ममुखिं वसे॥ राजकुळांस शस्त्रस्वरुपि रक्षित असे ॥ जे येकभावें आईकति त्यांचि पापें विलया जाति ॥ वंशउत्पाति आईकतां पुण्यपावन होति ॥ निपुत्रिका संतति ॥ नेत्र अंधास येती ॥ अज्ञान भ्रांति फिटे ॥ मज अभिमान कुळाचा ॥ धर्म रक्षावा साचा ॥ नायकोराव देसला मालाडचा ॥ त्याणे मज केशवाचार्यास नेऊन सर्व आप्तवर्गिक व देसक व मांडळिक यावत् केळवें पासुन मुंबेई परियंत मुख्यमुख्य गावोंगाविंचे जातिजातिंचे गोत्रिगोत्राचे खलक जमा तीन हजार सासें पंचावन्न गणति येकवीस दिवस परियंत माल्हजापुरि योगेश्वरि स्थानाकिं मंडप रचोन जमाईत तेथें महाप्रेत्न मनुष्य पाठवोन बोलावणि करोन समुदाये ब्राह्मण खलक संख्या पांचसें येकवीस नायक देसाये प्रोहित कुळगुरु आचार्य उपाध्ये जोशि वृति-वंत देशस्त या उपर गोवर्धन गंधर्विक ते हि सर्व मेळविले ॥ नायको—रावें फार सन्मान करुन सर्वांस यथामहत्वें फार आतिथ्य करोन सर्वांस सुखि केलें ॥ समुहुर्ति

दीवस ठराव केला होता त्या दिवसि हा प्रयोग वंशावळिचा केला ॥ जर मुख्य वडिलांच्या किर्ती ॥ हा देश यावत् दवण पासोन श्रीमुंबै परियंत काबिज करायास राजा प्रतापबिंब दाहा सहश्र घोड्याचि फौज घेवोन अहिनलवाड्या होउन येउन हा देश काबिज करून राज्यधाम श्रेष्ट माहिम देश घेतल्या वर जागोजागी आपले स्वसमागामिक सेनायिक बैसाविले ॥ जाहागिरा वतने वृती इनाम सर्वास यथामहत्वें दिधल्या ॥ त्या आज पावे तों चालतात व पुढें ईश्वर आपलें वंशिकासिं चालविल॥ परंतु येक मनि भाव जाला ॥ जर येक दिवस अवध्यां देशाईक या देशि समुदाई मिळवोन नवसभोजन देइन ॥ हे इच्छा मनी उत्पन्न होतां श्रीकुळस्वामिणीन स्वप्न दिधलें जर मनिचा हेत मी पुरवितों ॥ तु सर्व जे पुर्वि आले व या साशष्टि पासोन दुसरे केळवे परियंत फांकले आहेत त्यांचा समुदाये करून येक वंशपत्र करणे ॥ हें स्वप्न मज केशवाचार्या मुखि आपण नायकोरावें साष्टांग सभेस घालोन सांगाविला॥ हे सर्व विप्र व देशिक देखोन व आईकोन जयजयकार उदो बोलिले ॥ समस्त उभे राहिले ॥ विप्रवर्गि लक्ष्मीमुर्ती दुर्गा योगेश्वरि भगवति स्तउन नायकोराव देसला देशकि आळंगुन विप्रि आशिर्वाद दिधला ॥ जर तुं भला सोमवंशि धर्मवंत उदार प्रौढिप्रतापसागर, जर तुज देवि प्रसन्न जालि, हें कर्म वंशिक पध्यतिचें, तु जवळ होउन सर्व समुदाय मेळउन, जुने खते आज पावे तवं हिसाब पाहातां बिंब प्रारंभा पासुन वरुषें तीनसे जालि ॥ या मध्यें हे राज्यकुळ खल्लक सैनिक इनामक सर्व रईत अजम सेक आलावदिनाचि जालि ॥ या उपर देसा मध्यें ते हि बहुत यवन जाले ॥ राज्य अभिमान सांडला ॥ शस्त्रें सोडली ॥ कृषि धरिली ॥ सोमवंशि कारकोंण गांवखोति ताडमदिरेस उदिम धरिला ॥ सिंधि काहिक असति धरोन आपलि वतने ॥ काहिक सेवा करूं लागले ॥ काहिक नष्टले ॥ बहुत आचारहिन जाले ॥ बहुत गोत्र प्रवर कुळस्वामिण कुळगुरु ठिकाणे सांगतां विसरु लागले ॥ जाणोन देविने धर्म माहाराष्ट्र रक्षाया कारणे राजश्री नायकोरायास स्वप्न दिल्हें ॥ जर हा जाति मेळवा करावा ॥ आम्हास ब्राह्मणास भूदेव प्रसिद्ध जाणोन ही मेळवावें ॥ तर हा आशिर्वाद आमचा ॥ श्रीदेवि आद्यशक्ति जगदंबिका ॥ माहाराष्ट्र-धर्मरक्षिका ॥ तुम्हां सुप्रसंन्न असो ॥ श्रीरस्तु ॥ हा आशिर्वाद आयिकोन व केशवा-चार्याचें वचन ॥ स्वधर्म रक्षणार्थ श्रीदेविचें स्वप्न ॥ तीन हजार मासें छपन्न सर्व जे राजकुळि सैनिक मिळाले होते त्याहि फार ब्राह्मणासि पहिरावण्या दक्षणा दिधली॥ ते येकयकांचि नावें सांगता ग्रंथ वाढेल ॥ परंतु अवघि द्रव्यसंख्या च्याळिस हजार दाहा बाळी धर्म जाला ॥ शतचंडि नायकोरावें करायास संकल्प केला व प्रणाम्य करून सर्वांप्रति विनविलें जर कृपा करून माझें मानसिक पुरें होये हें करा ॥ ते समई सर्व देशक म्हणो लागले जर तुं धर्ममूर्ति तुझेनि योगें हें कार्ये पावेल सिद्धी ॥ या प्रयोगास विनाविजे प्रथम कुळगुरुतें ॥ जे वेदमूर्ति ऋषिवर्य आंबनायक कावळे आचार्य जोशिक वृतिवंत तुमचे ॥ हा मान्य देसला काननायकरावाचे गुरुस दिधला ॥

त्याणे धौंडि नायक सांडोरे कुळगुरु शेषवंशिकाचे वतनदार पसपवलिचे तयां नमस्कारिलें ॥ व हे श्रेष्ठ आम्हा विप्रांत म्हणितले ॥ जर हे ज्या स्थळि असतिल त्या स्थळिं प्रथम मान्य टीळा सांवखेडकरांस ॥ त्या खालते कावळे ॥ उपर आचार्य मग ॥ ईत्यादि संप्रदाये ॥ ऐसा हा निवाडा सांगितला ॥ तो सर्वांसि मानला ॥ साक्षेसिं प्रतिपदिला ॥ समंतियुक्त ॥ या उपर नाईकोराव देसला ॥ आपुल्या समुदायासिं बोलता जाला ॥ जर प्रथम मान्य देसल्याचा ठाकुर—वर्गी ॥ उपर रुत आधिकारि ॥ ते हि तत्समान मान्य आधिकारि ॥ टीळा घेतिल निर्धारी ॥ आदरें करोनी ॥ या नंतर चोधरि चुरि ॥ ते हि टिळयासिं आधिकारि ॥ भागडचुन्याचे गोत्रि ॥ म्हणोन आधिकारी ॥ मग म्हातारपक्षी टिळा ॥ यासि मान्य दिधला ॥ राउत कुळिं लक्षिला द्यावया लागि ॥ तेधवां सर्व बोलते जाले ॥ जर वर्तकिपद आह्मासिं चालोन आलें ॥ टिळा आमचा म्हणितलें ॥ माहाजना लागि ॥ राउति पुर्वपक्ष केला ॥ टिळा साक्षेसिं घेतला ॥ उपर सर्व्यासिं दीधला ॥ साक्षयुक्त ॥ या नंतरें घरथ ॥ जे टिळयाचे विभागिक ॥ उपर कवळि माळि जात ॥ आणि पठ्यार भोईर विर रक्ती भटारी महंत जात ॥ समुदाय पावति ॥ ऐसा निवाडा जाला ॥ सोमवंशि टिळा संपादिला ॥ मग शेषवंशि आदरिला ॥ टिळा द्यावया ॥ तेधवां सांवखेडकर कुळगुरु तयाचा ॥ जे वंशि आधिकारी त्याहिं आपला गुमस्ता पाचारुन टिळा द्यावा ह्मणितलें ॥ तेधवां गुमस्ता देव उपाध्या कंचोळे घेवोन संनिध जाला ॥ शब्द सिधे समुदायांस केला ॥ टिळा घ्यावा ह्मणितलें ॥ प्रथम चोधरि घारोडकरि ॥ जे टिळयाचे अधिकारि ॥ त्याहि आपले वर्गि ॥ टिळा घेतला ॥ या नंतर गोपाळराव ॥ तयासि केला गौरव ॥ गव्हाणकर दुसरा आपला संप्रदाय ॥ टिळा तयासी दिधला ॥ राउतराव पद पाटेल ॥ उपनावं थेवखंडकर ॥ हे आधिकारि तृतिय मान्य सत्वर ॥ आपले समुदायें घेतला ॥ या नंतर पांचवरे यांसि ॥ चतुर्थ मान्य परियेसि ॥ पांचवा मांडवगडकरांसी ॥ ते राउत ॥ सावा मान्य वरातदारि ॥ घेति साक्षसी झडकरी ॥ कडु त्या खालते सातव्या मान्याचे अधिकारी ॥ पद पालवण त्यांचें ॥ आठव मान्य ठाकुरांसि ॥ उपनावं नारतळें यांसि ॥ ते घेति साक्षेसि ॥ सभेमाजी ॥ त्या नंतर तारे पुरो राणे ॥ हे मुख्य अधिकारि त्याचा मान्ये ॥ ऐसि शेषवंशि खुमे संपादाणि जाली ॥ या नंतरे ईतरे जे काहि होते त्यास हि मान्य दिधला ॥ समस्तें विनंति करोनी आपलें स्थळातें हंकारिले ॥ तेथें खतें महझर लिहिले ॥ देशोदेशि दीधले ॥ जातिसमुदाये आपुलाले वर्गि घेतले ॥ हा निवाडा माहाळजापुरि जाला ॥ तो सर्वांसी मानला ॥ नाईकोरावे आपले महझरी लीहिला ॥ हे सहि ॥ छ ॥ महझर लेख हस्ताक्षर ॥ केशवाचार्य दप्तरकलमि चतुर ॥ या हस्तींचे पट लेहविले ॥ यक बाबत श्रीमहिबिंबसूत प्रतिबिंबसंमत्तें पूर्वीचि राजसिकेचिं अष्टप्रधानसंमतें श्रीकुळगुरुचें हस्तलेख त्या तालुका प्रमाणे राजपूर्वि वर्णण तैसे च

रिती व नुतन अनुसंधान सर्व वरिष्ट वर्गिक अनुमत्त प्रोहिताचें संमत ॥ या प्रमाणें खतें मझर नावं प्रसिद्ध हेमांडपतिलिपिचे लेख स्वामि मुलकाधिकारि यांचे आज्ञेन पंडित समुदायि संमत्तें करुन जे जे जयांचे आद्यपुरुष आले तयांचें नामा पासुन ज्या पेढ्या भरल्या या देशिं व जीं घरें जालीं यका पासून येकेक तयांचि नावें आद्य करुन व किति घरें वंशिक कोठे कोठे तयांस ठीकाण वास काय उद्यम पोटभरि करितां घेतला तो ॥ कैसा आचार करावा ॥ काये व्रत आचरावें ॥ कोण वृति वर्तावें ॥ उदरपूर्तिस कोण वेव्हार करावा ॥ लग्न विवाह सोहिरिका कोण कोण गोतिं संपादाव्या ॥ कोणाचि कोण्हि आणावी ॥ कोणास कोण्हि द्यावी ॥ जैसे हें देसा मध्यें संपादतें तैसें येथें यथानितिन संपादावें ॥ अपेश उणे वंशास येउं न द्यावें ॥ अकर्म जालें ह्मणजे सत्वर कुळगुरुस सांगावें ॥ तो सर्वां स्वकुळ–मंडळिक त्यांस भृत करिल ॥ जर हें यैसें अनृत्य यका पासुन घडलें तर यथाशास्त्र धर्ममार्गे कर्मकांड जो ज्या दुष्कर्मास प्रायश्चित घटे तें तीर्थविध साधावी ॥ प्रायश्चित या रीतिनें द्यावें ॥ येवढा देवदंड ॥ येवढा राज्यदंड ॥ येवढा जातिदंड ॥ देवदंड किद्दप तीर्थविधकर्मयुक्त ब्रह्मभोज्य गोदान गुरुपूजा अळंकार भूषण ॥ राज्य दंड कीदवा ॥ जे ग्रामि कर्म वर्तलें तेथें जे ब्राह्मण अतित अभ्यागत आगांतुक त्यांस राजा आपले सत्तेकरुन त्याचा विभाग शास्त्रसंमतप्रमाणं तो यांप्रति धर्म करववितो ॥ जातिदंड किदवा ॥ जातिस विभाग द्रव्य येईल त्या प्रमाणे कोण्हि भुभुक्षित वृद्ध ॥ किंवा मृत्युसुतक ॥ विध्वा ॥ अवळा अनाश्रय तयेस ॥ कीं उपवरि तयेस ॥ की ग्रहतटाक ॥ कुप व पंचब्राह्मणभोजन ॥ या रिति जें द्रव्य येईल त्याचा व्यय अध्यान संपादावा ॥ व आध्यानजातिवर्गांचे तयांहि त्या समागमि भोजन संपादावें ॥ यास पांच–ब्राह्मण–भोजन वैश्वदेव साक्षेसि ॥ हा अनुक्रम पुरुष वृद्ध ॥ त्यां पासुन ज्या पेढ्या भरल्या त्या व तयाचें गोत्र ठीकाण वतन येथिचे राजदत्त प्रवर कुळस्वाभिण कुळधर्म कुळगुरु यैसि खतें वर्णवर्णि गोत्रगोतिं मझर लेह्योन सर्व अनुक्रमे संपुर्ण पंडिती वाचुन सर्वास आयेकउन अधिकनुतन काहि नाहीं पुरातन सत्य प्रामाणिक लेहोन सव साशष्ट मझर येकेक कुळाचें करुन अवघ्या ही रुजु साक्ष सीके प्रमाणक वाचोन समस्तां मान्याधिकारि जे ज्या ज्या कुळाचे तयांस दिधलें ॥ त्याहि शिरीं वंदुन गणपतिपुजन करोन आपलेपासि ठेविलें ॥ यैसिं खतें महजर नायकोरायाचे प्रसादें सर्वास जालीं ॥ ते समई हे वंशपद्धतिलेखा संमत देउन वेदमूर्ति विप्रकुळि ब्राह्मणसंख्या पांचसें येकवीस मुख्य मुख्य धोंडि नायक व तथा आंब नायेक याहि समस्त विप्रमेळा यांसि स्वमुखें म्हाणितलें ॥ जे तुह्मी सर्व वृतिवंत वृति चालविता अष्टाधिकार तुह्मास आहेत ॥ तर नुतन–राज्ये–समागमिचे विप्र ॥ व पुरातन यादेशिचे स्थळ–गुरु यजुर्वेदि गोवर्धन व गंधर्विक ॥ तर यांस सत्ता ॥ स्थळीं घाटिका पाटा अंत्रपट गोदानमोक्ष पुजनमात्र कर्मकर्मादिक याहि संपादावि ॥ यांस हे सत्ता

स्थळगुरुत्वाचि ।। हे कोणाच्यान अमान्य करवत नाहिं ।। व जे अमान्य करितील व वृतिलोप करितील तरी कर्ता व कराविता उभये येमपुरिस जातिल ।। जे ज्या स्थळिंचे स्थळगुरु त्यांस त्यां स्थाळे लोक वसति त्यांहि त्याचे हस्ति कर्म संपादावीं ।। निर्विकल्प तर तीं कर्मे उत्तम सांग होति ।। नाही तर अकर्मदोष पदरिं पडे ।। कां जे समइं शंकराचार्य उत्पन्न जाले श्रीजगद्गुरु धर्म माराष्ट्राचे षोडशकर्माधिकारी ।। महादेवाचा अवतार ।। कलयुगांत प्रगटला ।। कारण जन्मेजय–राज्य प्रमादलें ।। विक्रमशकाधिकारि-समयिं यवनिधर्म मुळ पश्चमि रमिदेशि उत्पन्न जाला नुतन ।। अक्षरें भाषा पैराव सर्वभक्षक हा शोध राज्या विक्रमास वेताळें सांगितला ।। हें आईकोन सभा–मजकुर येक ठहाव केला ।। जर यां वर चाल करुन नीःपातावें ।। हा निश्चये संपुर्ण करुन सैनिक नायक यांस राजआज्ञेन सैन्य मुस्तेद करउन मुहुर्त उत्तम जोतिषी गुरुदिनि चाल करावी हा निश्चये केला ।। येसें असतां राजा निजधामी सुखशयनि नीद्रिस्त असतां स्वप्न जालें ।। जर तुज तया म्लेंछासि जैत नाहिं ।। व तुह्मी इछा धरिलि असे तर आवंत शकाधिकारि याचा येईल तो तुज जिंतिल ।। हें स्वप्न होतां राजा जाग्रत जाल्या वर चिंतातुर फार जाला ।। जर हें स्वप्न काये विपरित ।। शीव शीव नामस्मरणि जाग्रत राहिला ।। पुरोहितास बोलाउं पाठाविलें ।। सेवकिं पुरोहितास निरोप दिधला ।। जर राजाज्ञा तुह्मास बोलाविलें असे ।। हें श्रुत होतां स्नान देवपूजा संपादुन नित्यकर्महि सत्वर पुरोहित राजालयिं आला ।। राजयानें देखतां साष्टांग प्रणिपात करोन आसनि बैसविला ।। अर्घ्य पाद्यपूजा संपादुन संनिध जाला ।। ते समइं प्रोहितें आसनि राजयास बैस म्हाणितलें ।। आशिर्वचन मुक्त उच्चारोन आशीर्वाद दिधला ।। पानपठ्या विडे पुरोहितास दिधले ।। ते समइं पुरोहितें पुसिलें जर किंनीमित्य राउळि सत्वर बोलाविलें ।। हें वचानि राजयान पूर्ववर्तमानकथा व रात्रिस्वप्न तें मुखवचानि साकल्य पुरोहिता प्रति सांगितलें ।। हें पुरोहित आईकोन मनी आणोन ज्ञानि पाहोन भाविष्य बोळखोन राजेंद्रा प्रति म्हणितलें ।। जर शास्त्रसंमति कलयुगिं सा शकाधिकारि भविष्योतरपुराणिचें ऋषिवाक्य आहे ।। यास अन्यथा कोण करिल ।। तर तुह्मा मागें शकाधिकारि शाळिवाहन जाणुन मज दिसोन येतें ।। जर निर्माण जाला तर शोधिस वेताळास आज्ञा दिजे ।। हा शब्द आईकतां च चित्ती राजयान वेताळ स्मरतां च वेताळ प्रगट जाला ।। राउळि प्रणिपत्य करोन बध्वांजुळि काये आज्ञा ।। हे विनंति राये आईकोन वेताळास आज्ञा दीधलि कीं ।। पृथ्वी शोध करावा ।। कोठे शाळिवाहन उत्पन ।। हेर घेऊन येणे ।। आज्ञेप्रमाणे तो हेरिस गेला ।। मागें म्लेंछा वर स्वारिचें पुरोहितें सांगितलें ।। जर ते पश्चमदिसे बहुत राजे आहेत ।। तेथ फार तयांचि युद्धें परस्परि होतिल ।। सांप्रत या देशिं न येतिल ।। सर्वास निर्वाह इश्वरि इछा ।। ऐसें ह्मणत आहेत तवं वेताळ हेर पैठणा होउन आणिली ।। शाळिवाहन सेने सहित मुस्तेद तुह्मा वर चाल केलि ।।

हे आईकोन दळ मुस्तेद केलें होतें तें ॥ स्वारि इकडे जाली ॥ दोघांचा आदळ जाला ॥ श्रीविक्रमादित्य शालिवाहन हस्तें मृत्य पावला ॥ कांहि मध्यें काळ क्रमल्या उपर देविशापें शालिवाहन अश्वारुढ समुद्रि प्रवेशले ॥ छत्रपतिपद वरुणावति राज्याधिकारि जैदेवराणा यास पद असे ॥ देशोदेशि राजे आपले राज्य करोन आहेत ॥ येसें असतां मध्यें लोहोळें श्रावक जती नानकपंथ साबरिपंथ कमिपंथ तुरकी महमदी इभ्रमी ईसाइ सिखछेदक केशछेदक सर्वभक्ष तांत्रिक पध्यत ऐसि मेदिनि याहि वरुषेंशता १२ मध्यें व्याप केला ॥ फार अनाचार प्रवर्तला ॥ विप्रांस देवांस विरोधी ॥ बहुत जन भ्रष्टविले ॥ ऐसें असतां श्रीमहादेव धर्मरक्षणिक रंडाकोल्हापुरी अवतार घेतला ॥ वादि लोहोके श्रावके जती जिंतिले ॥ अकर्मि त्यास जिंतिलें ॥ पण केला होता जर जो हारेल तयास तैलाचे कढयेत टाकावें ॥ सोम आपा राजयाचे मदसित घटांत सर्प कोण्हा न कळतां घालुन आछादिला होता ॥ राजा लोहोक्या याहि वस्य केला होता ॥ येक राणि द्वीजा कडे व काहि प्रजा ॥ सेवट वृति द्विजांचि बुडावी ॥ ऐसा पण जाला ॥ राज्यान ह्मणितलें जर जो तुह्मा उभयां मधुन या घटा मध्ये जे वस्तु आहे ते प्रसिद्ध नांव सांगेल व काढुन या प्रजेस दाखविल तो वृतिचा अधिकारी ॥ व त्याचें रुप ईश्वरि ॥ तो आम्हास मान्य ॥ हें राजवचन सर्वांस मानलें ॥ वेत्रकरिं विप्रांसि व लोहिकीयांसि सांगितले ॥ तर लोहिकीं विप्रांस ह्मणितलें जर तुह्मी भूदेव व वृतिवंत पुरातन विद्येची सत्ता अभिमान वेदशास्त्रपरायण तर हें वृंद आज पावे तवं मांगता त्याचि प्रचित आज खरि करा ॥ हें वचन आईकोन जोतिषी विध लग्न पाहातां अंधयोग जाणुन फार चिंता वर्तलि ॥ आपले मंडळिकी विचार करुन दाहा दिवसान्चे अवधिन सांगु हा जाब दिधला ॥ तो रायास व सर्वांस मानला ॥ विप्रास आज्ञा केली ॥ येर समस्त येक नेमे देविद्वारि येउन उपोषणि बैसले ॥ तेथे सदा उपोषणे होतां शंकराचार्य अवतार उत्पन जाला ॥ त्याणे सर्व विप्रवर्गास अस्वासन दिधलें ॥ दाहावे दिवसी आपण समागमे सर्व ब्राह्मणसमुदायिं वेदध्वनि करित राजसभा प्रवेशले ॥ राजे आद्येकरुन समस्ती प्रणाम्य करोन नैमस्कार विप्रास दीधला ॥ विप्रि वेदघोष सूक्त आशिर्वचनि संपादिला ॥ घट शंकराचार्यें नेत्रि अवलोकिला ॥ वेत्रधारिं पुन्हा मजकुर केला ॥ ते समई शंकराचार्य ह्मणितलें जर लोकि प्रथम या सभेंत जे घटात आहे त्याचें प्रगट उच्चार करावा ॥ जर तयाचें वचन प्रचित येईल तर आज पासुन वृति तयांस व आह्मास तैलकढय अवलोकणे ॥ जर त्याचे शब्द मागें आह्मि मुखीं म्हणु तें च घटांतुन दाखउं तर सत्य भूदेव स्वाईत अनादिसीद्ध ब्राह्मणवृतिचे स्वामी राजयाचे व प्रजेचे श्रीगुरु ॥ हें खरें च साक्षेस येतां लोहिक यांस जे त्या कढय मध्ये प्रवेश करवावा ॥ हा शब्द सर्वांस मानला व राजयाचे चित्तास आला ॥ लोहोक्यांहीं मानिला ॥ ते समई सर्प आहे घटा मध्यें हे लोहिकि यांचे गुरुन बोलिलें ॥ तें राजयाचे चित्ती आलें ॥ व राजयान राणिस

अवलोकिलें ॥ उभयता समजलीं ॥ राजयान श्रीशंकराचार्याजि यां प्रति ह्मणितलें जर आतां तुह्मी सांगा ॥ कीं सांगितला शब्द खरा करा ॥ तर वृतिचे स्वामी ॥ हें आइकोन श्रीशंकराचार्य हिरण्यशुक्त ह्मणोन अक्षता घटा वर टाकिल्या व आपले मुखवचनि श्रावकगुरुस पुसिलें जर या घटांत काये असे ॥ तरी तो ह्मणे सर्फ फणिवर कृष्ण असे ॥ हें आईकोन राजयास व राणिये प्रति व समस्त प्रजे प्रति ह्मणितलें जर लोहोकें असत्य ह्मणितलें ॥ घटामध्यें नवरत्नाचा हार असे ॥ हें आईकोन राजाराणी विस्मित जाली ॥ ते समइं श्रीशंकराचार्यी ह्मणितलें जर भूदेव वचन खरें घट सोडुन पाहावें ॥ राजयान आज्ञाशब्द ह्मणितला जर तुह्मी घट सोडावा ॥ सत्वर सोडिला ॥ मधुन नवरत्नखचित हार काढिला ॥ सर्व जनि देखतां जयजयकार जाला ॥ राजाराणि फार संतोषली ॥ येवोन चरणि लागलीं ॥ शंकराचार्यें अस्वासिलीं ॥ सत्वर राजसत्तेन सेवकांस आज्ञा केली ॥ जतीः लोहकेः श्रावकधर्मिक गुरु–समुदायः तैल कढयेत घालविले ॥ ऐसे दंड-स्थानि केल ॥ बहुत राजे शंकराचार्य शुद्ध केले ॥ स्वधर्मि रक्षिलें ॥ ब्राह्मण वृति स्थापिल्या ॥ वर्णावर्ण भेदाभेद निराळेनिराळे अनुमत्तें ॥ वेदिककर्म विप्रासि ॥ पौराणिकमंत्र व्याशोक्त क्षत्रियांसी ॥ तांत्रिक पध्यत शुद्रादि करोन ईतर ज्ञाति अष्टादशपर ॥ लोमक प्रलोमक क्षतार यांस ब्राह्मणवचनि कर्म तें मान्य ॥ ते शब्दीं देविरुप तयास मानावें ॥ ब्राह्मणहस्तें पूजा ॥ पार्थिव विष्णु शिव सूर्य गणपति अंबाघट यंत्र ब्राह्मणहस्तें पूजाविध करावी ॥ पूजा आराध्य-दैवताचि संपुर्ण मंत्र–पुष्पांजुळी संपादुन ब्राह्मणपुजन करावें ॥ आमान्यदक्षणा दान-संकल्प सोडुन ॥ विप्रचरणअंगुष्टोदकतीर्थ घेउन ग्रहस्तें अभिवंदन करावें ॥ सर्वग्रहि संप्रदा ॥ त्रित्रीआच्मानि सर्व शुद्ध होती ॥ येक मासाचें प्रायश्चित टळे विप्रो-दकीं ॥ सामासाचें प्रायश्चित जाये स्थळगुरुचरणोदकीं ॥ संवत्सराचें प्रायेश्चित जाये कुळगुरुचरणोदकें ॥ तीर्थगुरुचि तीर्थी महिमा ॥ स्थळगुरुचि स्थळी महिमा ॥ कुळगुरुचि सर्वत्र महिमा ॥ जाणुन कुळगुरुस न विसरावें ॥ तयास बहुत मान्य असे ॥ हे कथा धौंडिनायक सांडारे व तथा आंबनायक कावळे याहि मुखवचनि नायकोराव देशाय आद्य करोन ग्रहस्त–समुदाय विप्रसमुदाईकास श्रुत केलि ॥ हे आईकोन नायकोराय आद्य करुन श्रीकुळगुरु शोमसूर्यवंशाचे व शेषवंशाचे यासी ह्मणितलें ॥ जर बरावि कथा श्रुत आह्मास केलि ॥ तर सेवट आमची यें गोत्रावितें छेदिलीं ॥ तांडल्या करितां व उभयवंशि वैर वाढुन पर-स्परें युद्ध करुन कुळक्षय केला ॥ प्रतापराया मुक्तेश्वरिं स्नानास जातां आंबेरिस देशक मिळोन मारिला ॥ आमचे जातिचीं यज्ञोपवितें छेदिलीं ह्मणोन ॥ व पोशनायक स्वामिचे वंशिकाचे चांपानेरीं जाउन मुलतान दिनास सांगुन जर कावळयाचा वंश शमला ॥ आह्मी भाचे त्याचे ॥ त्यासि वृत ईनाम आह्मास पावे ॥ या रितीन पत्रें घेउन आले ॥ सरदेसाई–पदमदें मस्त होउन दुःकर्मे केलिं ॥ तीं

तुह्मास ठाउकि ॥ जाणुन दमक मळउन त्यास मारिलें ॥ त्याच्या स्त्रिया हि पाहाडिन गृहास अन्न लाउन त्या मध्ये निमाल्या ॥ येक यका बंधुचि स्त्रिस गर्भ ॥ आगासिकर गौतम–गोत याचि कन्या ते माहिमास नळदव याचे गृहि राहिली ॥ तेथे ते प्रसूत जाली ॥ तयाचा विप्रवंश हेमटे तेथे असेत ॥ यैसि ब्राह्मणहत्या व ब्रह्मस्त्रिहत्या व राजहत्या या आमचे शिरीं जाल्या ॥ व पुरो पैकि राणे पौके दरणे पैकि प्रभु पैकि सूर्यवंशियांचिं यज्ञोपावितें गेलिं होति तर तुह्मी तयांस मंत्र–उपदश केला व आह्मास नाहिं॥ तर याचा निर्वाह करा॥ सर्व ब्राह्मणमंडळिक असा ॥ ऋषि-वर्य ॥ या उपर समस्त कुळादिक ग्रहस्तजात आहेत ॥ तर हा आमचा मजकुर नीट करुन दिजे ॥ हें वचन धौंडिनायकें व आंबनायकें नायकोरायाचें आयकोन प्रतिवचन केलें ॥ जर पुरातन कर्म स्थापायास बहुत द्रव्य पाहिजे ॥ जातशुद्धतेस ॥ कां जर शास्त्र–मार्ग ॥ द्वादशवरुषे क्रमलीं ॥ येक प्रायश्चितास ॥ ह्मणजे तो निराळा मंडळिक जाला ॥ तर येथे दोहा शता वरुषांचि गणणा जाली ॥ तर सत्यमेव आयिकाल तर शैयाद्रिखंडिचे संमतें शास्त्राचे आधारें श्रीशंकराचार्यजगद्गुरुहि जें कर्म स्थापिलें असे, यावत् श्वेतबंधरामेश्वरा पासुन यावत् काशि व द्वारका श्रीतुळ-जापुर परियंत, मध्यें देश पुंण्यक्षेत्र, देवांचि दशावतारिक जागा, माहाराष्ट्रधर्माचें स्थान ॥ कोटि तीर्थांचें महिमान॥ येथें हा धर्म ॥ कल्की नारायण अवतार धरिल॥ तेथ परियंत राहेल ॥ दुसरे देश केवळ म्लेंछमये होती ॥ ब्राह्मण पंचायतनाचे नावं विसरती ॥ येउन याहि देशिं मीसळती ॥ व या धर्माचा द्वेष करितील ॥ कित्येक आपले त्या च प्रमाणे होतिल ॥ या स्तवं धर्म सुगम शास्त्रधारिकांस स्थापिला तो सर्वी आइका चित्त देउन॥ पश्चम–देशीं गुजरात प्रांति लंबैत परियंत उत्तर हेंदुस्थान राठवड देश घेतला ॥ या रितिन ते राजे सूर्यसोमवंशि ब्रह्मक्षेत्रि॥ परब्रह्म उत्पन तयाचे वंशि ॥ जाणुन ब्रह्मक्षेत्रि म्हणिजे तयांचा नेम ॥ कुकुटश-ब्दापासोन उठावें ॥ शौच्य स्नान संपादावें ॥ देवपुजन नित्यकर्म आचार्य–संयुक्त पंच–ब्राह्मण–संयुक्त भोजननैवेद्य ब्राह्मण–उचिष्ट ॥ धर्म–निति–शास्त्र–अनुमत्तें पंडितमुखीं न्याय संपादावा ॥ हा खटाटोप करायास पुराण प्रत्यहि आयकावें ॥ ऐशा प्रसंगि यवन आपुले समुदाइं युद्ध करायास संनिध होउन कावित्रें करुन हेर काढुन या ऐशा प्रसंगिं राज्यास मारावें व राज्य हिरोन घ्यावें यैसें करुन बहुत देश नेला व आपला केला ॥ हें पाहुन दुसऱ्या राज्याहि आपले पुरोहितीं मजकुर केला जर आचार्य आपले हस्तीं पुजाविध संपादुन श्रेय राजयांस द्यावें ॥ साहसहस्त्र मुस्तेद होउन आपले मंडळिकीं मिळोन भोजन संपादावें ॥ येक मात्र स्नान ॥ खुणेस यज्ञोपवित ॥ राणे टकर सींग इत्यादिकीं शस्त्र कमर बांधुन भोजनास बैसावें ॥ यैसा नेम केला ॥ ते समइं म्लेंछाचे तयांसि चालत नाहिं ॥ मागें बहुत युद्धसंपादिलीं ॥ म्लेंछ तहास आणिले ॥ जागोजागेचे राजे आपले वळकटिन तुर्क इरिस आणिले ॥ परंतु दिलिपतितक्त तयांचे हस्तिं पडलें ॥ तेधवां तह जाला ॥

जर रजपुत्रांचि कन्या यवनाम द्यावि ॥ वाम अंगुष्ट कुंकुमटीळा सवा फतेसिंगि राजमहाराजनाम तयां कुळिं त्याहि करावा ॥ ते समई तो छत्रधर सार्वभोम नाम तयास ॥ या रिती उभयराज्य येकमत्तिं वर्तु लागलि ॥ ऐसा संकळित–मात्र स्वज्ञा ॥ कां जर बहुत देशदेशिंच्या कथा लीहितां फार विस्तार होईल ॥ या मध्यें बहुत वेळ्या तुर्कांच्या गुजरल्या ॥ यैसे प्रसंगि धर्म शंकराचार्यी रक्षिला ॥ श्रीगेरिस मठ स्थापिला ॥ दुसरा मा + संप्रदाय मठस्थापना श्रीपाद कनोजि ब्राह्मण मठाधिकारि व धर्मरक्षणार्थ शंकर अवतारीं दक्षणप्रांति राहिले ॥ कानडा रामराजा कुटुंबस्या तयाचा पाळेकर असतां दैवि इछा पंचवरुणा मध्यें वैर उत्पन्न होतां नवा लक्षाचि सैनिक ससागमे असतां तया हस्तें मृत्य जाला ॥ सेवट टीकाणे टिकाणी जे जेथे होते ते राज्य अधिकारि जाले ॥ यैशा कथा वर्तल्या ॥ सर्व देश बहुत राजे जाले ॥ ते शाहाणव कुळिंचे ॥ तुव्हेरि भोसले चव्हाण जाधव घोडपडे दाहाबाडे काबरे बुधले कवाड इत्यादिक जागोजागि पाटलिका देसमुख्या वतनदार जमीदार ठीकाणदार ते तयाचे मंडळिक राजे च जाले ॥ या आपले देशिं देसाये पाटेल चोधरी वतनदार इजारदार महालदार कुळावि कुळुचि म्हतारे चवघले माहाणे ॥ ऐसे रतीन उद्यमी ताड–माड–सरा काढायास राउत सिंधे पैकि आचार धरिला॥ कितिक कडु म्हातारे पाटेल चोधरि चोरघे ठाकुर परभु ऐशा नवकुळया हा उदिम धरिला ॥ नीमित्या यां शस्त्रधारियांस कविले वाढले ॥ उपार्जित थोडि ॥ समुदाय खर्चिस वतने न पुरत ॥ या करितां हा उद्यीम धरिला ॥ कौळी सर्व सावे चूरी चोधरी राउत वर्तक म्हातारे देसमुख नायक भोईर माळी या बारा कुळ्या ॥ याहिं वाडिसळे–केचा उदिम धरिला ॥ कोळायसिलायचे कुळिंचे यांहि सिल्पिक उदिमि आणिक दुसरे मध्यें प्रवेशले ॥ पुरो राणे दरणे प्रभु याहिं कारकोन–मत्त धरिले ॥ शेषवंशि बहुत कुळे ॥ शोमवंशि देशले म्हतारे नायक रुत राउत चोधरी पाटेल वर्तक पुरो ठाकुर साण्हे कौळी माळी सुतार दरणे पुरो यात हि असत ॥ यैस्या या कुळया ॥ या ससंति कृषि धरिली ॥ हा संप्रदाय निराळा जाला ॥ सेतिसंप्रदाये निराळा ॥ कांसार संप्रदाय निराळा ॥ तांबट पोगार निराळे ॥ लोहार गाडघडे निराळे ॥ बाहारे निराळे ॥ मासि नीराळे ॥ वैति नीराळे ॥ कोळि सोनकोळि नीराळे ॥ ढोरकोळि नीराळे ॥ आगरि खुम नीराळें ॥ खारु नीराळे ॥ डोंबळें निराळे ॥ सर्वां वर्णावर्ण नट भाट बुरुड चर्मक अंत्यज जाति ॥ यास सर्व माराष्ट्र ॥ सर्वांस ब्राह्मण श्रेष्ट ॥ वर्णभेद, गोताचे कर्म भिन्न, वर्तणुक आचार भिन्न, पहि-राव भूषण भिन्न, भाषा भिन्न ॥ भीन्न भीन्न देशिंचे देशाचार आहेत ॥ कुळाचार आहेत ॥ वंशाचार आहेत ॥ देवशास्त्राचार आहे ॥ तो श्रेष्ट व कुळाचार देशा-चार श्रेष्ट ॥ श्लोक ॥ स्वधर्मे परमं श्रेष्टं परधर्मो भयावहः ॥ ऐसे हे भगवद्गीतेचें वचन ॥ तें असे ॥ जर आपआपले धर्मि असावें ॥ गुरुवाक्ये गुरुसि मानावें ॥ देव गुरुरुपें सर्वांसरक्षिता ॥ सुख देता ॥ दुष्कर्म दुर करिता ॥ अंति सायुज्यता

मुक्ति देता ॥ तरि हा धर्म सर्वधर्माचा जीव ।' मुळधर्म माराष्ट्र स्नान गुरु-उपदेश मंत्रजप प्रत्यहि करावा ॥ जे गुरु संख्या सांगेल त्या प्रमाणें सुर्यास नमस्कार सूर्य-व्रत आचरावें ॥ विशेषें करोन सूर्यवंशि व सोमवंशि गणेशचतुर्थि संकष्टि यथानेमे कराव्या ॥ शेषवंशि सोमवार–व्रत महादेवाचें करावें ॥ कुळस्वामिची तीथ यथानेम उपोषण ब्राह्मणहस्तें पुजन तयांस आमान्य दक्षणा द्यावी ॥ कामिकव्रतें आचरावी ॥ वार्षिकी नवचंडिका उपोषणें करावी ॥ घटस्थापना ब्राह्मणभोजने घालावीं ॥ जातीभोजने घालावी ॥ सोहाळे गर्भाधान पुंसवन चौळ चुडाकर्ण मंत्रउपदेश व्रत-बंध विवाह महोत्छाव कीलालकर्म ग्रहशांतिक ग्रहप्रवेश विद्यारंभ वाणिज्य कृषि सर्व हि कर्म प्रारंभ ॥ श्रीगुरु कुळाचा ॥ व स्थळगुरु स्थळाचा ॥तीर्थगुरु तीर्थिचा ॥ त्रिगुणात्मक गुरुमूर्ति ॥ ब्रह्माविष्णुमहेश इति त्रिगुणात्मकरुप ॥ पर-ब्रह्म परमेश्वर अनादिरुप परमेश्वर याखिला विरंचि श्रृष्टि ॥ हा धर्म सर्व–ब्राह्मण-अनुमत्तें नायकोरावास व सर्व समुदायास संनिद्ध ॥ हे सर्व महाजन ॥ हे वाग्वो-त्तरी ॥ थोंडि नायक, पौतमस–गोत्री, त्रिप्रवर, यजुश्याकि, देशस्त, ग्रामक्षेत्रकर, कुळस्वामिण यकविरा, सेनादिपति, कुळगुरु शेषवंशाचे, वतनदार पसपवलि, वस-इचे स्थळगुरु, सांडोपारवाडि वतन ईनाम बाहदरस्या पादशायाचा, वैद्यराज बादश्यायाचें, रामनायकपासोन ३ तीसरि पेढि ॥ व तथा आंबनायक कावळे, यजुशाकि, देशस्त, पैठणकर, गोत्र भारद्वाज, पंचप्रवर, कुळस्वामिण येकाविरा, सरदेसाय चवदा प्रगाण्याचे, वतनदार पाहाडग्रामाचे, ईनाम श्रीबिंबाचे, वृतिस्थळ मालाडखापणे, कुळगुरु सोमसूर्यवंशाचे, रघुनाथपंतापासोन चवथि पेढि ॥ केशव रामाचार्य देवधर, प्रधान, यजुशाकि, पैठणकर, गौत्र सारंग, पंचप्रवर, कुळस्वा-मिण येकविरा, राजप्रधान ॥ व विठोबा नायक छत्रे, यजुशारवी, देशस्त, सौनक गोत्र, त्रीप्रवर, कुळस्वामिण योगेश्वरी, वृतिवंत मुंबैचे ॥ वामन पंडित चामरे, भार्गवगोत्रि, पंचप्रवर, यजुशाकी, देशस्त, पैठणकर, पुरोहित राजवंशिकाचे, वृति-वंत कांवेठाणेचे ॥ आणिक वृतिवंत ठाईठाईचे देशस्त व गोवर्धन व गांधर्विक ॥ ह्या समस्त विप्रांचे संमते हा धर्म सांगितला ॥ ते समई नायकोराव मालाडचा देसाय, व जिवाजी देसला मरोळचा, दादसावे आगासिचे, पोम ठाकुर बेलवडिचे, दादचुरि केळवेचे, रतनसावे मुळगांवचे, केशव पाटेल दादरुत, माहिमचे रामपा-टेल नाम राउत, देवचोरघे पापडिचे, सोमजी ठाणेकर, विठोजि सुतार वडकर, बाबु राणा, रघु पुरो मुकुंदप्रभुचे, मुख्य नामांकित द्रव्यवंत व समस्त आद्य पेढि-जाद यांस सर्वांस धर्म सांगितला ॥ मानला ॥ फार संतोषि जाले ॥ कुळगुरुस अर्घ्यपाद्यपूजा केली ॥ वस्त्रें अळंकार दिधलें ॥ सर्व ब्राह्मणास यथापत्र दक्षणा वांटिल्या ॥ क्षेम आलिंगने जालीं ॥ पहिरावण्या येकमेकास संपादिल्या ॥ त्या सांकल्य सांगतां लेख फार होईल ॥ हें सर्व केशवाचार्य हस्ताक्षर वंशपध्धति या संमति पूर्ण जाली ॥ संवत् पंधरासें पांच व श्रीराजेंद्रचक्रचुडामणि-शालिवाहन–शके

एकसहस्र व तीन वरुषें सत्तर माहे फाल्गुन वसंतरुतौ हा संप्रदायें माहालजा-पुरि मिळोन महजर सर्वांसि दीधले ॥ व हें वंशावळि लीहविली या उपर दुसरा वृतांत जाला असे तो लेख आतां मांगतां या प्रतिवर ते हि प्रत चढेल ते आईकाः ॥ छ ॥

त्या उपरांत सोई ठाकुर व शिव ठाकुर हे दोघे देसले जाले ॥ तेधवां पोईसरकर पालवण येकसारकर कडुपण न चले च ह्मणोन नातवा भाचियास दीधलें ॥ त्यासि वृत आंकुलवलिची जाली ॥ म्हणोन कडुपद-अंकुल–वारिस आलें ॥ मग नवसारिये दिवान फिरले ॥ तेणें सर्व आपलि सत्ता केली ॥ सीव ठाकुर व सोईठाकुर देशले नेले ॥ मालाड-खापणें मरोळखापणें ईले–पाडलें सत्तावन गांव ५७ त्याचा खंड घेवो आदरिला आधिकारि चौव्रले नेले ॥ मग सर्व मिळोन नवसारि खालि विलाथ माहिम यावत् ठाणे–कोकण चवदा माहाले दोन खापणे प्रगणें १४ या विलाथिचा सीध वो भरिला ॥ माहिमचें राज्य लाहुरशासि जालें ॥ तें राज्य लाहुरसें माहिमा केलें वरषें २ ॥ मग देसल्याचि कुळि यका पासोन येक ॥ शीव ठाकुराचा कान्ह ठाकुर ॥ त्यासि पुत्र २ ॥ वाड पुत्र देव देसला ॥ धाकुटा वाल्ह देसला ॥ याचि वंशावळि ॥ देव देसल्याचा पुत्र बाण देसला ॥ त्याची माता केमाई ॥ तिचा पुत्र नाउरचे ठायाचा आईतोळा ॥ त्याचें नावं नाग म्हातरा ॥ या ठायां आला ह्मणोन ह्मातारेपण पालटलें ॥ नावं ठाकुर जालें ॥ त्याचा पुत्र परसोजी ॥ बाण ठाकुराचा पुत्र शीव टाकुर ॥ तो दिगंबर जोगियाचा प्रसादु ॥ त्याचा पुत्र कान्ह ठाकुर ॥ त्याचा बाळ देसला ॥ त्याचा हरीपाळ देसला ॥ त्याचा कान्ह देसला ॥ त्याचा गणपत देसला ॥ तो गणपत देसला देसलिक हरठाकुरासि वीकित होता ॥ तेधवां पालवणकर पोईसरकर आंकुलवलिचे कडु ॥ गोंद राउत आंब राउत ॥ येकसारकर देसला पोस म्हातरा ॥ कांधवळिचे चोधरि समस्त व ब्राह्मण पोस नाईक व आचार्य यैसे समस्त घेवोन गणपत देसल्याचे घरि येवोन हर देसल्यान बरवा मुहूर्त पाहोन गणपत देसल्याचे घरि गेले ॥ पाहाडकर व पसपवलिकर समस्त मिळोन पाट पासवडिला ॥ गणपत देसला पाटावर बैसविला ॥ समस्तें म्हणितलें जर हा देसलिक तुह्मांसि च उक्त, तुह्मी असतां दुसरा कराल तेधवां आमचें वृंद वेथें ॥ ह्मणोन अक्षता लाविल्या ॥ ब्राह्मणि आशिर्वाद दिधला ॥ मग सर्वांहि ह्मणितलें जर कडु पालवणकर देसले रहीत या सर्वांहिं गणपत देसला मानावा ॥ याचे शब्दाखेरीज जो होईल तो देसा खेरिज ॥ ऐसें बोलोन मुख्य देसायाहि गणपत देसला जोहारिला ॥ मग समस्तांहि जोहारिला ॥ हरदेसाय व समस्त देस पालवणकर कडु समस्त मिळोन गणपत देसल्या गंधाक्षता भरिल्या ॥ ब्राह्मणे आशिर्वाद केला ॥ समस्तांहि नमस्कारिला ॥ ऐसा गणपत देसाय देसला जाला ॥ समस्तांसि टीळा विडा जाला ॥ आज्ञा मागोन देसले घरोघरि गेले ॥

या उपर माहुलिचे राणे पैकिळ कान्होजी ३०० मनुष्यांसि मरोळास आला ॥ पाणि सांवतासि भेटला ॥ स्थळ मागता जाला ॥ जर आपण राणे पै कि ॥ राज्याचा अधिकारी आपण ॥ येथें राहोन आपल्यास ठिकाण घर बांधावयास जागा घोडसाळ आणिक माहार पाखाडि ॥ आहारवाडि आंतिचा पटक त्याची कंन्या तिचे उदरि पुत्र दोन जाले ॥ ते परवंशा ब्राह्मणाचे ॥ केशवरावाचे प्रधानाचे ॥ त्यासि ब्राह्मणें संध्यासूत्र सांगितलें ॥ त्या दोघां पासुन वंश चालिला ॥ तो सांगितला असे ॥ सांप्रत वंश ह्मणोन नामाभिधान पराब्रिज ॥ छ ॥

आतां नाईत्या रायाचि कुळि सांगेन ॥ आबु नाखवे कोकणि राज्य केले वरुषें १२ ॥ तयाचा पुत्र पाणि सावंत ॥ तेण्हे राज्य केले वरुषें १३ ॥ त्याचा पुत्र हंबिरखांन ॥ तेणे राज्य केलें वरुषें २७ ॥ त्याचा पुत्र मुरंगन ॥ तेण्हे राज्य केले वरुषे ३२ ॥ त्याचा पुत्र नसिलखां ॥ त्याणे राज्य केलें वरुषे ३६ ॥ त्याचा पुत्र हंबिरखां ॥ त्याणे राज्य केलें वरुषें ४० ॥ त्याचा पुत्र डफरखां ॥ त्याणे राज्य केलें वरुषें ३० ॥ त्याणे माहिम पालटिलें ॥ तो ठाण्यास राहिला ॥ त्या उपर मलिक धुरदार त्याणे माहिमा राज्य केलें वरुषें १० ॥ त्याउपर मकासिदसीग आरबा भाद्रपद निरोधे ईजार ३५ ॥ तत्समंई माहिमा राज्य मीर गुजराथिचा पातस्या सुलतान आह्मदस्या त्याचा पुत्र डफरखां त्यासि नामजाद केलि ॥ माहिम ठाणे घेतलें ॥ माहिमा ठाण्या कोट बांधिला ॥ त्याण्हे राज्य केलें सही ॥छ॥छ॥छ॥

वरुषें २५ ॥ देव चरित्र डफरखान प्रमादला ॥ तेधवां मुलना हाफिस काजी लोक माहाजन खलक मिळोन डफरखान कबरेत घातला ॥ लोक घरोघर आले ॥ राजा बरा जाणोन लोक फार दुःखि जाले ॥ जर डफरखान पडला ॥ मग माहिम भंगलें ॥ मग राज्य गुजराथिचें सुलतानास जालें ॥ त्याचि पेढि सांगतों ॥ पहिला सुलतान आलावदिन पातस्या शहर गुजराथ चांपानेर पाटण तखत अमदाबाज ॥ त्याचा तोगिलखां २ ॥ त्याचा सुलतान पेरोजस्या ३ ॥ त्याचा सुलतान गिलयादिन ४ ॥ त्याचा सुलतान बादुरस्या ५ ॥ त्याचा सुलतान आमदस्या ६ ॥ त्याचा सुलतान माहामद बेगिड ७ ॥ त्याचा सुलतान मुदफरस्या ८ ॥ त्याचे पुत्र ५ वाड सिकादिर १ बाधुरस्या २ माहांमदस्या ३ चांदखां ४ मुलतान आहमदस्या ५ ॥ हे पातस्या ॥ मुदल कवज ॥ सुरल मारिवाने सीदर ॥ वजीर मारीगाने नहजर॥छ॥छ॥

त्या उपरांत बाहादुरस्या मीराचे विलाथे फाकिरा मध्यें होता ॥ तेथें फरमान धाडोन आणिला ॥ मग वजिर राहिमा मिळोन छत्रें धरिलीं ॥ बाहादुर आणि सुलतान या दोघांसि दुवा सर्व माहाजन वैश्य वाणि वजिर प्रधान खलक सर्व मिळोन दुवा बोलिले जे हे पातस्यायें माहामद दोघे बंधु बुध असतो ॥ सही ॥छ॥

त्या उपर निका मलिक अंबर पातस्याही त्याणे वजिर बाहादुरस्याचा धरिला॥ ती खबर बाहादुरस्याला कळली ॥ तेधवां बाहादुरस्यान हेजिब पाठविला ॥ जर आमचा वजिर धरला काये म्हणोन ॥ तो लवकर पाठवणे ॥ नाहितर युद्धास उभें

राहाणे ॥ हें आयकतां निका मलिकें जाब केला ॥ जर जो वजिर धरला आहे तो देत नाहिं ॥ तुह्मी काल येणे असेल तर आज येणे ॥ हा जाब आईकोन सुलतान आणि बाहादुर हकारले ॥ वजिर उंबराव लस्कर ४५००० दक्षणे वरि चाल केलि ॥ बाहादुर दिवान निघाला ॥ ही खबर निका मलिकासि कळलि ॥ तेणे राज्य सांडिलें ॥ यावत् दक्षणेचि पातस्याहि काबिज केली ॥ तेधवां निका मलिकाचा पुत्र स्याहुसेन बाहादुरस्यासि भेटला ॥ शरण म्हणोन सलाम केली ॥ पातस्या बाहादुर खुसि जाला ॥ त्या शाहुसेनाला नावाजिलें ॥ मेघडंबर सुर्यापान छत्रि दिधली ॥ जवळ बोलावोन खेम घेतली ॥ पाठ थापटिली ॥ आणि नावाजिला ॥ मग सिंद गुजराथ अहिनळवाडा पाटण उरफ चांपनिरेत तखत अमदाबाज माहाराज राजाधिराज सुलतान बाहादुरस्या देखिला ॥ अनाइति राया पैकिं लाविला ॥ ठाणकोकण साहाबाज उडंगण माहिम बिंबस्थान यावत् देश काबिज केला ॥ भोंगळ मारिले ॥ अमर वसई खालि जाली ॥ अमर हवाले जाली ॥ बाहादुरपुरा वसविला ॥ खान हांटदाळिं दिवान राहिला ॥ ते समई खानसाहेबे हवालदार व जमीदार देसाये वर्तक पाटेल चवघले अधिकारि चवदा माहालाचे लापाणि गावोंगाविंचे बोलाविले ॥ सर्व रयेत आईकोन खुसि जालि जर पातस्या दिवान आला ॥ तेधवां खानबाहादुर बोलता जाला जर विलाथिचो जमी आदाये सांगावा ॥ तेधवां अधिकारि हर पुरो राणे पैकिं जाब केला ॥ सर्व जमी सांगितली॥ चवदा प्रगाणे माहालें आदाये हिंसाब सर्वांहि दिधला ॥ खाने आईकोन सर्वांसि नावाजिलें ॥ बिडे द्यावया आदरिले ॥ खाने विडा हातिं घेवोन देवों लागला ॥ तेधवां आगासिचे वर्तक उभे राहिले ॥ विड्याला हात वोडविला ॥ तेधवां माहिमचा राणेपैकिचा हरद पुरो अधिकारि बोलिला ॥ जर खानसाहेब जाब जीसका मान उसकु बडे कों बडा ॥ तेधवां खाने हात आटोपिला ॥ पुसता जाला ॥ जर प्रथम विडा कोण्हास ॥ तें देखोन आगासिचे वर्तक अधिकारि यांसि वेवाद लागला ॥ वर्तक म्हणति हम बडे ॥ हरदपुरो अधिकारि म्हणे मै बडा ॥ हें आईकोन खानसाहेबासिं अजब वाटलें ॥ आगासिचे वर्तक जानीक सावा व अर्जुन सावा आपलिं खतें दाखवों लागले ॥ जर यावत् महिकावति व वसई आमचा हवाला ॥ पहिला विडा पहिला मान आमचा ॥ या उपर हरदपुरो अधिकारि बोलिला ॥ आपला मझर खानास दाखविला ॥ जर माहिम बिंबस्थान राणे पै आमचा जन्म व चवदा माहालें माहिमा खाली माहिम वडा ॥ ऐसा मझर खाने पाहातां निवाडा केला जर माहिम बडा ॥ हुजुर मजलसि दफतर पाहातां, जील्हे कागद पाहातां, निवाडा राजीणि सीक्के तलबे सिक्के माहिम, कसबे सिक्के माहिम, प्रगाण सिक्के माहिम, ऐसा मझर पाहिला ॥ तेधवां खान म्हणे माहिम वडा ॥ मग हरदपुरो अधिकारि यासि राणे पैकि आगरतपे—याचा विडा हरदपुरोसि दीधला ॥ आतां खान म्हणे

कोण्हाला ॥ अधिकारि बोलिला राजतपे–याचा ॥ पोस पुरो वानठेकर त्याला दिधला ॥ त्या उपर खान म्हणे आता कोणाला ॥ तवं मालाडतपेयाला व मरोळतपेयाला ॥ दोघां देसायांला विडे दिधले ॥ मग वसईचा वर्तक नागचुरी त्यासी विडा दिधला ॥ मग आगासिचे वर्तक अर्जुन सावा व नामसवा त्यासी विडे दिधले ॥ तेधवां चुऱ्याचे पुर्वपक्ष हरदपुरो अधिकारि बोलता जाला ॥ खान-साहेबा प्रत सांगता जाला ॥ जर चुरि आद्य वर्तक ॥ नामजा देसायाचि परंपरा ॥ पुर्वि पातस्या सुलतान तोगिल त्याचा सुलतान आलावदिन दिल्लीचा पातस्या हि त्याचा वजिर कोकणि आला ॥ नाम निका मलिक ॥ पैठणा जवळ चऱ्ही गावं तेथोन जैतचुरि निका मलिकें आणिला ॥ तो विराळि मालाड पुर्व दिसेस तेथे स्थापिला ॥ विराळि पाखाडि मालाडची इनाम दिधली ॥ त्याचा पुत्र भागड-चुरि गोत्र विश्वामित्र कुळस्वामिण हरबा देव ब्रम्हक्षेत्रे रुद्रउपाशक गुरु केशवपंत मांवखेडकर ॥ त्याणे साशष्ट गावांचि देसालिक चालविली ॥ सर्वांचा देसाये प्रव-र्तला ॥ तेधवां कांजिया देवोन बनला ॥ मग तो भागडचुरि देसाये दादरुत आणि सोमल म्हातारा मीळोन तो भागडचुरि मारिला ॥ त्याचे पुतणे दोघे पैलपार जाले ॥ येवोन वसई राहिले ॥ नामचुरि व भीवंचुरि ॥ हे या स्थळि वर्तकिचे आधिकारी ॥ त्यासी ठिळयाचा अधिकार ॥ त्या खालते रावराउत गोत्र अंबऋपि कुळदेवत येकविरा ॥ या उपर म्हातारे सवे घरथ आणि इतर ॥ आतां चुऱ्याचा वंश ॥ नामचुरी १ ॥ त्याचा गोविंदचुरी २ ॥ माधवचुरी ३ ॥ गोपाळचुरी ४ ॥ रामचुरी ५ ॥ सीवचुरी ६ ॥ दादचुरी ७ ॥ कृष्णचुरी ८ ॥ केशवचुरी ९ ॥ मुकुंदचुरी १० ॥ रणसोडचुरी ११ ॥ विटलचुरी १२ ॥ हे वर्तक नाम जादे ॥ विटलचुरी घरथाळयान बुलभाट यावत् बोरवाडी घर बांधोन राहिला ॥ त्याचा निजांग पुतण्या आगासि देववाडि वर्तला ॥ त्याचा वंश ॥ रामचुरी १ ॥ त्याचा गोविंदचुरी २ ॥ त्याचा दामुलचुरी ३ ॥ त्याचा सीवरामचुरी ४ ॥ त्याचा वंश न वाढे म्हणोन सीवरामचुरि केळव्या गेला ॥ त्याचा वंश केळव्यासि जाला ॥ तो हाटवटा हांटदळिं राहिला ॥ त्याचा वंश तेथोन ॥ आणि या नागचुऱ्याचि कंन्या साव्याचे घरिं दिधली होती ॥ त्या कंन्ये पासोन धोत्तरवंश म्हणोन आपुले वर्तकि पद आगासिचें त्या देवदत्त सव्यासी दीधलें ॥ त्यासि वर्तकि पद चालतें जालें ॥ त्या पासोन सीवाजी सव्याचा पुत्र गोविंद सवा ॥ तो द्रव्यमदे दिमाक थोरावला ॥ दिवानि येणे जाणे त्यायासि ॥ त्या वेगळे आमानता सर्वांसी ॥ तेधवां त्याणे अतिसयें पाय सोडिले ॥ लोक त्याणे फार दमिले ॥ तेधवां आमचे पुरो-पक्षि अमान्यता करो लागला ॥ तेधवां पुरो आगासकर विऱ्हारकर सोपारकर हे मिळोन शोध चुऱ्याचा केला ॥ तेधवां चुऱ्याचा वंशिक भीवंचुऱ्याचा नातु केळ-व्यास होता तो या पुरो हि आपण मनुष्य धाडोन त्यास आणिलें ॥ त्या जवळ हेर घेतली ॥ जर तुज कांहीं विदित आहे जर तुझे वाड वर्तक होउन गेले त्यांचे

हातिचें खत अथवा काहि पत्र असेल तर आह्मि तुज वर्तीके या देसाचि देवों ॥ तेधवां तो बोलता जाला ॥ जे पुर्विचा मझर निका मलिकाचे हातिचा आहे तो आणितों ॥ तेधवां विठलचुरीं केळव्यास जावोन मझर आणिला ॥ सहि किताब घेतला ॥ या सर्वांचे विस्वास आला ॥ मग त्या विठलचुऱ्यासि घेवोन दिवानि खानसाहेबा जवळ आले ॥ सलाम करोन उभे राहिले ॥ जाब केला ॥ जर हा विठलचुरी वर्तक आदखानि ॥ याचि हि वर्तकी हा सवा चालवितो ॥ हें सत्य असत्य पाहावें ॥ जर कवणाचि हि वर्तकी खती मझरीं पाहावी ॥ या जाबा खान पुसतां जाला जर कोण्हाचि हि वर्तकी हें साकल्य सांगावें ॥ खतीं मझरि दाखवावीं ॥ मग या बोला जाब विठलचुरीयान केला जर आदखानि वर्तक चुरि म्हणोन मझर दाखविला साहेबि नेकी पाहावी ॥ मग खाने मझर वाचविला ॥ तेधवां खत चुऱ्याचे नावें, किताबत शिका पातस्याहि, सुलतान आलावदिन, सीका वसई चुरी आदखानि वर्तक सही ॥ तें देखोन खान सव्या जवळ विचारों लागला ॥ जर तु जवळ खत मझर असेल तर दाखवावा ॥ तेधवां सवा बोलिला जर ही वर्तीकि चुऱ्याची हें सत्य, परंतु आह्मि चुऱ्याचे नातु अवलाद ह्मणोन आज्यान आह्मास दीधली ॥ अवलाद ह्मणोन चालवितों ॥ तेधवां खान बोलिला जर त्याचा वंशिक असता तुज वर्तीकि न पावे, जेधवां त्याचे कोण्हि नसतें तेधवां चालती ॥ मग खाने चुरि नावाजिला ॥ आपल्या पासि ठेविला ॥ व सव्यासि बोलिला जर चौधलें पद चालवावें ॥ ह्मणोन खाने सव्यासि चौधला केलें ॥ खत आपले हातिचें दीधलें ॥ तो हि मुखि केला ॥ मग त्या चुऱ्यासि निराश्रय जाणोन घर घरथा वे वाडि ईनाम यावत् रान मुक्तश्वर रेणुकास्थान ईनाम दीधलें ॥ तो घरथाळयास स्थापिला ॥ या परि चुरि वर्तक जाला ॥ दिवानि दीमक जाला ॥ सवा तो हि वर्तों लागला ॥ त्या चुऱ्यासि कन्या नामराउतें दीधलि ॥ तो चुरि आणि राउत हे सोहिरे जाले ॥ राउत गोत्र अंबऋषि कुळस्वामिण येकविरा ॥ त्या राउतास सोहिरा घरथ गोत्र श्रीचंद कुळस्वामिण कालिका ॥ येसे वर्तों लागल ॥ येसा निवाडा बहादुरस्या जवळ हरदपुरो अधिकारियान सांगितला ॥ तो खानसाहेबासिं मानला ॥ मग त्या चुऱ्यासी सिरपाव दिला ॥ अधिकारि देसाये चौघले पहिराविले ॥ सर्वांसि आज्ञा दिधली ॥ सर्व देसाय गावोंगावि गेले ॥ मग बहादुरस्याने राज्य वसई केलें वरुषें २५ ॥ या उपरांत कथा वर्तलि सही ॥ छ ॥

मझर ॥ संवत् ११२५ बिंबदेवा सवें कुळे सोमवंस २७ ॥ त्या मध्यें मुखें इतर जात ॥ मुख्य कुळें ॥ राव १ राउत २ रुत ३ ठाकुर ४ ठकर ५ ठाकरे ६ चुरी ७ चोधरी ८ चोरघे ९ ह्माले १० ह्मातारे ११ कडु १२ महंत १३ रत्तमि १४ पुरो १५ राणे १६ राज १७ माहाणे १८ जीत १९ सींग २० सीळ २१ घरथ २२ मघर २३ दुमोघ २४ मठी २५ पदक २६ सव २७ ॥ हीं खुमे मुख्य ॥ तयासि गोत्रें कुळस्वामिणी ॥ या उपर जात ॥ कवळी १ दरणे २ मोईर ३

मध्या ४ माळी ५ घरटी ६ भटयारी ७ सांखळे ८ उभार ९ नाइते १० गाण ११ विर १२ ॥ ही बारा खुमे जात ॥ यास गोत्रे देवनाम ॥ या उपर ईतर ॥ छ ॥

या उपर नवकुळें शेषवंशि ॥ राउत शस्त्रधारि इनाम खातात ॥ पुर्वि विंबा समागमि आले ॥ तयांचा संप्रदाय या वसइंस बहुत असे ॥ ताड माड उद्यमी खुमाइत ॥ तीन हजार सजगाणी पुर्वि खत भोगळे हस्तिचे पंधरासें हुनाचें ईजारा करुन सर्व संप्रदाइ बारा पाखाडिया आगर वसइ मुख्य हांटदळा जागे-जागे राहोन आपल्यात पाटेल जाले ॥ बारा करुन राहिले आहेत ॥ हा यिजारा वरसास स्वामी मुलुखाधिश यास सांगावा ॥ दुसरें काहि लागत नाही ॥ जर यांस शस्त्र धरायास हा बकसिस केला तर जैसा पुर्वि होता त्या प्रमाणे साहेबि चालविला तर युद्धास सादर होतिल ॥ हे हेर विठलचुरि यान सांगितली ॥ हें आयकोन खानसाहेबि आदा केशव राउत सर-पाटेल खुमाचे त्यांस बोलाउं पाठ-विलें ॥ प्यादा पाटलाचे घरि जाउन दिवानचा निरोप दिधला ॥ जर खान-साहेबी तुम्हास हुजुर बोलाविलें असे ॥ केशव राउतें कबुल केलें व निरोप प्याद्यास दीधला जर बडि फजर साहेबके कदम पोसि करनेकु हुजुर खडे होउं ॥ हा निरोप प्याद्यास दीधला ॥ उपर विचार केला ॥ जर आज दिवस पांच जमाईत मद-लसिस होतों तेधवां काहि पुसाति विचारणि न केलि व आज बोलाउं पाठविलें यास कारण काय ॥ जाणुन आपला पुत्र रामराउत समागमी मनुष्य देऊन सिर-पत नायक स्वकुळगुरु व दिवान हाकिम जाणुन मांडळैस बोलाउं पाठविलें ॥ त्यांहि रामराउत देखिला ॥ केशव राउताचा आमंत जाणुन सत्वर समागमि आले ॥ देखता च केशवराव प्रणिपत्य करुन चरणि लागले ॥ इयेरिं आशिर्वाद देउन आळंगिले ॥ उभये डोहोलारि बैसले ॥ येव्हडे रात्रि आमंत सत्वर कां हे साकल्य व्रतमान सांगितलें ॥ ते समई सिरपतनायक बोलिला ॥ जर मी दरबारास असतां विठल चुरि आला होता ॥ खानसाहेबांसी बहुत मजकुर करित होते ॥ परंतु मज तुह्मा विर्सी बोलतां काहि आइकिले नाहि ॥ परंतु मज तर्क दिसोन येते जर बाहादुरपुरा वसवायास इछा खानाची असे ॥ कांहि तुह्मा पासुन समुदाय कराविल तर तुह्मी या समइं आपले कुळाचा अभिमान धरुन बाहादरपुरि वसा-ईत करा व सरपाटेलकिचे पद खानसिक्यांसि महजर करुन घ्या ॥ तथे बहुत युक्ति आहेत त्या मजलसित आह्मि पुर्वपक्ष करुन निट करुं ॥ हा विचार केशवराउतास मानला ॥ सूर्योदई मदलसिस केशवराउत आपले खुम वसइत आले ॥ खानसाहेब जोहारिले ॥ खानि बैसकार दिधला ॥ विठलचुरि आपले समुदाई खान जोहारिस आले ॥ सर्व जमाईतदार मिळाले ॥ मदलसि भरली ॥ या उपर केशवराउतें तसलिम करुन खानसाहेबा प्रति अर्ज केला ॥ जर साहेबि सेवकास काल निरोप पाठविला, जाणुन कदम हुजुर असे, फरमाईस केलि

पाहिजे ॥ हें आयकोन अंतरि खुशाल जाला ॥ जर राउत दक्ष देखिला ॥ जाणुन बोलता जाला ॥ जर गत मदलसित या दुसऱ्या खुमाचा निवाडा टिळा बोर पान बिडा याचा कजिया चुकविला ते समईं राउत किसवास्ते चूप रहे थे ॥ इसवास्ते आज तमारि कुल वतनाई ठिकान जागिर वतन ईनामकी खबर मेरे तें दे ॥ हें आइकतां केशवराउत उठोन तीन तसलिमा करून रजा मागितली ॥ खानी रजा देतां जाऊन सिरपत नायकाचे चरणावर मस्तक ठेवीला ॥ हें देखुन खान मनी विस्मीत जाला ॥ जर हें मोठें अपुर्व असे ॥ पण उगाच राहिला॥ त समईं सिरपत नायक उठोन तीन तसलिमा केल्या ॥ त समईं खाने समीप बैसकार दिधली॥ व पुसिलें जर सब हकिकत कहो ॥ ते समईं महजर श्रीबिंबा पासुन यावत् इफरखान जमाईत माहिमास राज्य अधिकारि तयाचे हस्तीचा महजर तो पंडितान रसनोसी दुभासया हस्तें दीधला ॥ त्याणे वाचुन खानसाहेबास दाइम कथा जर धौडिनायक सांडेरेयां पासुन पेढ्या ३ ॥ केशवनायकांस महजर त्याचे नामाचा ॥ त्या पासुन पेढी ५ हे सिरपत नायक ॥ हे त्या राउत खुमाचि कुळें नव ॥ चोधरी १ राउत २ राणे ३ पुरो ४ ह्मातारं ५ वरातदार ६ कडु ७ ठाकुर ८ ह्मतारे ९ ॥ गोत्रें कुळस्वामिण पदे सर्व समवेत ॥ हे शेषवंशि धारेचे राउत ॥ यांचे कुळगुरु तयाचे जाणुन हे सर्वांसि घेतिल ॥ ह्मणुन व आह्मा माराष्टधर्मांची नित गुरुत्व ब्राह्मण जाणुन केशवराउतें चरण वंदिले ॥ जर तयांचि उत्पती सर्व तया मुखीं साहेबास श्रुत होईल ॥ तयांहि आपला महजर दाखउं सांडोरपाखाडिचें ईनाम व कुळगुरुत्व महजर सीके पत्रीं सर्व साहेबास कळाया करितां कदमि साहेबाचे ठेविला ॥ हे आइकोन खान खुशाल जाला ॥ जर चतुर केशव राउत व तयाचा गुरु चतुर ॥ जर नितिन अकलेन ईसारतिन मान तर तुह्मी सिरपत नायक हकिम मेरे व तमारा ईनाम आज पासुन सही जाला ॥ व राउत सींधे यांस आज पासुन पंधरासें हुन बकासिस ॥ आपले मुखीं वांटुन ताडे माड बसई आगराचे कुल कमाइस करुन खावे ॥ थकटका जयाचे वाडित असेल त्यास द्यावा ॥ व माझी आज्ञा जर बाहादरपुर वसाईत नवी वसवावी ॥ तेथे पाटेल सरखुमा वर ॥ व जे प्रजा तेथे सर्व जातिची राहेल त्यांचे ही पाटेल ॥ दर घरास टका १ वरसास यांस द्यावा ॥ व याहि तीनसे राउत जमा निशाण अफदागिर माझे सेनेपुढें युद्धास मान ॥ हा महजर ईनामि खुशालिन खानसायेबि दीधलें ॥ व पानपटि दीधली ॥ येैसे सुखि करोन घरिं पाठविले ॥ मागे वसाईत बाहादरपुऱ्यास जाली॥ भंडारि सिंधे खुम घरें ५० येउन राहिलीं ॥ या कबिल्यास राउत समुदाये तीनसें नित्य मजलसिस केशवराउतें जावें ॥ ते समईं खत केलें जर या कबिल्यान माडे ताडी ३५५ वाहावि ॥ ही टाकितं दुसरिं दुसऱ्या साऱ्यांस वांटुन गावोगावि दीधली व मसाला बांधिला ॥ वरसास सासें हुन सरपाटिलांस द्यावा ॥ तयांसि जे

समई राउत खानसाहेबां समवेत कोठे स्वारीसिकारिस जातिल ते समई पाटेलाहि आपले खर्चित यांस अडेच—सेरि द्यावि ॥ हे सही

हा निर्वाह होतां गावें वसवाविं ॥ तेथवा केशव राउत वरि येवोन कागद बोलवांस पाठविला ॥ तेथोन सर्व आपला जमा मिळे शेषवंशि धारेचे पाईक से ९ समभारें आपुले संप्रदायें हांटदाळि आले ॥ केशव राउतास भेटले ॥ आज्ञा सिरी वंदुन बोलते जाले ॥ जर किंनिमित्य बोलावोन आणिलें ॥ तेथवां केशव राउत चौघलेंया प्रत बोलता जाला ॥ जर खानसायबान तलब केलि आहे ॥ जर आपला संप्रदाये अवघा आपले ताबिन ठेवावे ॥ या करितां हुकुम खानाचा तुह्मास बोलावोन आह्मि आणिलें आहे ॥ मग सर्व समुदाय घेवोन केशव राउत खाना जवळ मदलसिस नेले ॥ जमा पाईक समुदाये शस्त्रधारि देखोन खान संतोषला ॥ जर हे क्षेत्रि अवल माहामुदल ॥ मग हांटवटा यावत् हीरा डोंगरी ईनाम केशव राउतास जालें ॥ तेथवां उत्तलेश्वरी तटाक केशवराउतें बांधिलें ॥ शांतनादेवि तेथे स्थापिली ॥ आणि गोराळि तटाक बांधिलें ॥ तेथ गावं रचिला ॥ बालिवंकर हरबाजि राउत आपले खुमासि गोरीजासि घरबंध केला ॥ तेथे झातार पैकि चवघला सीवाजी झातारा राहिला ॥ ईमारथा केल्या ॥ दळवाडिये अर्बुदा नावं जालें ॥ इजारा २४ वीसदाम झातारे पैकि चालला ॥ ते झातार टिळयाविड्याचे अधिकारी ॥ राउत टिळयाविड्याचे अधिकारी ॥ येसे वर्तु लागले ॥ मग केशव राउत हांटदळि सीमगा खेळतां कच्च माळियांसि बनली ॥ ताम्रतळयासि युद्ध जालें ॥ माळियांचि छत्रि शेषवंशियांहि मोडिली ॥ ती बोंब खानसाहेबासि गेला ॥ तेथवां खाने हुकुम चोपदार पाठवोन पाटेल चोधरि झातारे राउत बोलावोन आणिले ॥ पुसो लागला जर या माळियांचि छत्रि मोडावि काय ह्मणोन ॥ तेथवां जाब सर्वांहि केला ॥ जर हे माळि आदखानियांहि आमचे मागें खेळावें ॥ मोहरे आमचे निशाण आणि छत्र ॥ त्या मागें सोमवंशि आणिक ईत्तर ॥ येसें पुर्वापार चालोन आलें ॥ तेथवा जाव वर्तक बोलता जाला जर मोहोरें तुह्मी निशाण न्यावयाचे स्वत खानसाहेबास दाखवावें ॥ की आह्मी सर्वांचे मोहोरे सोमवंशि व सूर्यवंशि ॥ त्यामागें तुमचें निशाण ॥ हा जाब आईकोन खान बोलता जाला जर पुर्वा पासोन कोणकोणास छत्रि हें साकल्य सांगावें ॥ ते वेळि केशव राउतें आपुला कुळगुरु बोलावोन खाना हुजुर मजलसिन वंदुन बोलिले ॥ जर प्रथम निशाण कोणाचें हें साकल्य खानाप्रत प्रविष्ट करावें ॥ तेथवां देवदत्त नायक बोलता जाला ॥ जर सोमवंश आणि शेषवंश हे येकयकाकि अवलाद आणि अफलाद ॥ यांसि वाद व्यर्थ ॥ परंपरा येकयका पासुन अनेक उत्पति होत आहेत ॥ परंतु प्रथम निशाण सोमवंशि ॥ त्यामागें शेषवंशि छत्रियांसि आणि त्यांसहि चालोन आलि ॥ यथे निवाडा पाहातां ॥ साकल्य पुराण संमतीकथा ॥ व्यासें

कीथिली पूर्व उत्पनता ॥ तेथे निवाडा असे ॥ आतां सोमवंशासि सिंहासन आणि छत्र कैसें प्राप्त जालें तें आइकावें ॥ छ ॥

हुताशनि जवंळ ह्मणोनी खाने आज्ञा सर्वां प्रत दीधलि ॥ मोहोर निवाडा करावा ॥ अत्र ठेवोन आज्ञा दिधली ॥ त्या उपरांत कथा वर्तलि सही ॥ छ ॥ याउपर कथा वर्तलि ते बोलिली ॥ संवत् १४५९ तेधवां निवाडा केला ॥ सोमवांशि सूर्यवंशि शेषवंशि आणि ब्राह्मण मिळोन बाहादुरस्या जवळ जमा सर्व जाला ॥ अर्ज बाहादुराप्रत केला ॥ जर छत्र निशाण सोमवंशासि व सूर्यवंशासि युक्त ॥ हुताशनी खेळतील ॥ तेधवां केशव राउत बोलता जाला ॥ जर आह्मि शेषवंशि उपनावं सिंधे तर छत्र निशाण सर्वां मोहोरे ॥ आह्मि आपला समुदायें छत्र निशाण आमचें चालेल ॥ तेधवां सीवाजि चुरि बोलता जाला जर आह्मि सोमवंशि प्रथम निशाण आमचें ॥ खान आईकोन अजेब करि ॥ खतें महझर पाहातां निवाडा प्रथम सोमवंश सूर्यवंशाचि छत्रि नीशाण ॥ तेधवां सिंध्यासि खान बोलिला जर तुह्मा जवंळ खत अथवा मझर असेल तर दाखवावा ॥ तेधवां केशव राउत बोलता जाला ॥ जर खत राया बिंबाचे स्वहस्ताक्षरि स्वसिक्यासिं आहे तें साष्टि येरंगळा राहिलें ॥ तेधवां हरठाकुर बोलता जाला ॥ खत आलजी नाखवा हस्तिचें मजंवळ आहे॥ जर प्रथम निशाण सर्वां मोहोरे शेशवंशाचे ॥ युद्धी हुताशनी आमचें निशाण॥ तें खत वाचोनि पाहातां निवाडा शेषवंशाचे निशाण मोहोरे सीका आल नाखवा नवाईता माहिमचा राजा, सीका केळवी, सीका महिकावती, प्रगाण सीका सीरगावं, लकसीसीआ+र ॥ ऐसा निवाडा पाहाता निशाण सिंधे शेशवंशि मोहोरे चालतिल ॥ ते वेळे खाने ठाकुरासी वीडा दीधला ॥ खजिना हवाले केला ॥ तो आपले ताबिन ठेविला ॥ त्यासी केशवराउता जवंळ पांचवा मान देवविला ॥ आणिक अफदागीर ठाकुरासिं पद जालें ॥ ठाकुर नावाजिला ॥ तैसा सर्वांहिं शेषवंशियांहि नावाजिला ॥ टळि जाले ॥ विडे खाने सर्वांसि दीधले ॥ ईनसाफ निवाडिला ॥ सर्वांस आज्ञा दीधली ॥ त्या उपरांत कथा वर्तली सही ॥ छ ॥

श्रीगणेशाय नमः ॥ सवंत ११२५ राज बिंब अहिनळवाडिया होवोन येथे माहिम ॥ राजगोत्र भारद्वाज कुळस्वामीण प्रभावती ॥ १ ॥ या उपर सोमवांशि खुमे २७ त्याचि गोत्रें कुळदेवता व ठीकाणे तेथे आणि येथे ॥ प्रथम प्रगाणे साशाष्टि तपें मरोळ ॥ तेथे मुख्य माहादेव देशला ॥ त्याचा बंधु कृष्णजी पद ठाकुर ठीकाण पैठण ॥ १ ॥ प्रगाणे मालाड—खापणेया ठाकुरा खाली ॥ हे आद—टिळयाविड्याचे आधिकारि ॥ यांचे गोत्र पद्माक्ष कुळदेवता जोगेश्वरी ॥ २ ॥ आणि कृष्णाजी चोधरि पद चौधला वतन खुद पैठण ॥ येथे पोईसर ठीकाण ॥ गोत्र भद्राक्ष कुळदेवता वज्राये ॥ ३ ॥ आणि दामराव पद महंत वतन पैठण ॥ येथे ठाकाण परजापुर ॥ येथे आलियावर निका मलिकाचे वेळे पद पालटलें ॥ चौधलें पद निका मलिकें दीधलें ॥ त्याचें गोत्र क्षवण कुळदेवता ॥ पद्मावती ॥४॥

आणि अनंत कडु चौघला ॥ पुर्वी पासोन वतन चांपानेर ॥ येथे ठीकाण आंकुल-
वली ॥ ईनाम त्रिंबदेवा हातिंचे ॥ ५ ॥ आणि नामराज साहाणि आदखानी पद
चौघला ॥ वतन अमदाबाज ॥ येथे ठिकाण कोंदिवटे ॥ गोत्र वैरक्ष कुळस्वामिण
चंपादेवी ॥ ६ ॥ आणि केशवराव ॥ दोंहों मानाचा आधिकारि ॥ चौघला
आद्यवंत राया समागमि आला ॥ वतन चांपानेर ॥ येथे ईनाम नसरापुर ठिकाण ॥
गोत्र गौतम कुळदेवता येकविरा ॥ ७ ॥ आणि दाम महंत ॥ पद चौघला वतन
चांपानेर ॥ येथे ठिकाण येकसार ॥ गोत्र श्रीपत कुळदेवता चंडिका ॥ ८ ॥ व
नामाधिप ॥ पद चौघला वतन चांपानेर ॥ येथे ठिकाण कालिणे ॥ गोत्र वशिष्ट
कुळदेवता हिरबाय ॥ ९ ॥ आणि नाम राउत ॥ पद घरथ दाढिमे वतन चांपानेर॥
येथे ठिकाण फोंजिवरे ॥ गोत्र वछ कुळदेवता काळिका ॥ १० ॥ आणि कृष्णाजि
रक्ती ॥ वतन देव्हेरी ॥ येथे ठिकाण वांदरे रांजणफर ॥ गोत्र कौंडण्य कुळदेवता
कुमारिका ॥ ११ ॥ व नाम राउत दाढिमे ॥ वतन चांपानेर ॥ येथे ठिकाण
फोंजिवरे ॥ गोत्र बकदालभ्य कुळदेवता काळिका ॥ १२ ॥ आणि त्रिंबक रुत ॥
वतन अव्हेलि ॥ येथे ठिकाण फोंजिवरे ॥ गोत्र वछ कुळदेवता नारायणी ॥ १३ ॥
आणि दाद पुरो ॥ वतन चांपानेर ॥ येथे ठिकाण मुहिली ॥ गोत्र हरिंद्र कुळ-
देवता माहालाये ॥ पद वरातदार ॥ १४ ॥ आणि नामराज उपनावं चुरी ॥
वतन चांपानेर ॥ येथे ठिकाण मुहिली ॥ गोत्र त्रिंबक कुळदेवता हरडाये
॥ १५ ॥ आणि दामुल भिंग ॥ वतन पैठण ॥ येथ ईळें पाडळें ॥ पद म्हातार ॥
गोत्र विश्वामित्र कुळदवता ललिता ॥ १६ ॥ आणि दाम सवे ॥ वतन पैठण ॥
येथे ठिकाण मुहिली ॥ पद चौघले ॥ गोत्र अंगिरा कुळदेवता वज्राये ॥ १७ ॥
आणि दाम सीळ ॥ वतन पैठण ॥ येथे ठिकाण मुहिली ॥ पद म्हातारे ॥ गोत्र
अंगिरा कुळदेवता माहेश्वरी ॥ १८ ॥ आणि जीवाजी श्रीत ॥ पद म्हातारे ॥
वतन चांपानेर ॥ येथे ठिकाण साही ॥ गोत्र श्रीचंद्र कुळदेवता चंदनदेवी
॥ १९ ॥ आणि दाम महंत ॥ वतन चांपानेर ॥ येथे ठिकाण तुंगवें ॥ पद म्हातारा॥
गोत्र त्रिंबक कुळदेवता काळिका ॥ २० ॥ आणि चंद्र राउत ॥ वतन पैठण ॥
येथे ठिकाण वांदरे रांजणफर ॥ गोत्र जनार्दन कुळदेवता रक्तदंतिका ॥ २१ ॥
आणि हैबतराव चेऱ्हणेर ॥ वतन चेरूण्ह ॥ येथे ठिकाण वानरें ॥ गोत्र भारद्वाज
कुळस्वामिण माहेश्वरी ॥ २२ ॥ आणि जानकोजि राउत ॥ वतन निळापुर ॥
येथे ठिकाण नाळें ॥ गोत्र भृगु कुळदवता त्वरिता ॥ २३ ॥ आणि नाम चावरि ॥
वतन पैठण ॥ येथे ठिकाण कांधवळी ॥ गोत्र मित्राक्ष कुळदेवता चंद्रायेणी ॥२४॥
आणि जातलोमक प्रतिलोमक ॥ ते कोण कोण ॥ कवळी १ दरणा २ भोईर ३
पटयार ४ माळी ५ घरटी ६ भटयारी ७ सांखळे ८ उभार ९ नाईते १०
गाण ११ विसे १२ ॥ ही बारा खुमे ॥ यांस हि आधार सोमवंशाचा ॥ विभी-
चारि ह्मणोन मान्या वेगळे ॥ आणिक तांडेल आणि वहिती ये ही मान्या वेगळे ॥

जातिसमुदाई चालति ।। नीमित्य देसके घेतले ह्मणोन ।। सासष्टित चालती ।। इतरकडे अमान्यता ।। सही ।। छ ।।

श्रीगणेशाय नमः ।। श्रीसवितासूर्यवंश तथा श्रीसोमवंशोत्पाति श्रीचिंतामणी कौस्तुभपुराणे व्याख्यास्याम ।। ।।

ॐ नमोजी श्रीचिंतामणी ।। सद्भाव माझा तुझिया चरणी ।। तु सर्व सिद्धिची खाणी ।। ह्मणोन अन्योन्य नमन माझें ।। १ ।। जो सर्वश्वे ईश ।। नमिला तो आद्यपुरुष ।। कृपापणे उदास ।। तो गणाधिश वंदिला म्या ।। २ ।। विश्वासें आरंभितों ग्रंथ ।। पूर्ण करिता गौरिनाथ ।। जेणे पुंण्य आणि पुरुषार्थ ।। ते कथा मुक्तार्थ वदवि देवा ।। ३ ।। विमळोत्तरि तुष्टला गणपती ।। धर्मसंस्थाप्यता ज्ञानमूर्ती ।। अभयोत्तर दात्रव्यता भक्तां प्रती ।। निवेदी स्वयें इश ।। ४ ।। तें चि लाधले महिमान ।। ह्मणोनि शारदेसि अन्योन्यशरण ।। आदिमाता निधान ।। जोडलें मज प्रती ।।५।। ते अंबिका आदिशक्ती ।। कृपपणे तुष्टलि सरस्वती ।। वाग्विलास शब्दार्थी ।। अर्पिति जाली ।। ६ ।। म्हणोनि शब्द उन्मळला ।। आधार श्रीगुरुचा लाधला ।। शब्दार्थ पसरला ।। सिंधु जैसा ।। ७ ।। श्रोते जनी जनार्दन ।। वंदु आदरें करून ।। पुढिल कथा निरोपण ।। आईका भावें ।। ८ ।। जे पुराण–संमात कथा ।। स्वयें व्यासऋषि वक्ता ।। सविता–सूर्यसोमवंशउत्पनता ।। कथिली जि हे ।। ९ ।। ऐकतां निवति श्रवण ।। हरति दोष दारुण ।। पितरां संतोष एकोन ।। तें निवेदन करितों आतां १० ।। ह्मणोन पुढति विज्ञापना ।। हे कथा वंशसंज्ञा ।। भगवान् नंददत्त–अनुज्ञा प्रादात वाणी ।। ११ ।। कोण्हे येके सुदिनी ।। शंभु उपविष्ट सिंहासनी ।। अर्धांगि गौरि कमळलोचनी ।। विलासयुक्त ।।१२।। पृछा आदरिली महेशा ।। देवा तुं सर्वज्ञ कैलाशा ।। अपेक्षा पुरवि आदिपुरुषा ।। वंशउत्पती सांगावी ।। १३ ।। कवणा पासुन कवण ।। कैसे जाले वंशोत्पन ।। स्वामी सांगावें मुळ–कथन ।। कृपापणे ।। १४ ।। महादेव उवाच ।। गीरिजे हा संकल्प तुजसि उठावया कारण ।। तें कळलें अनुसंधान ।। युगायुगि राहेल ह्मणोन ।। तुजसि आदर जाला ।। १५ ।। तरि आतां चित्त स्थिर करी ।। उत्पती सांगतों सविस्तरी ।। जेणे संतोष सर्वांतें अवधारी ।। तें प्रत्योत्तरि वदतों आतां ।। १६ ।। प्रथम व्योमासनि अव्यक्तमूर्ति ।। जो अनादि प्रभु लक्ष्मीपती ।। तया पासोन प्रजापती ।। ब्रह्मदेवो ।। १७ ।। ब्रह्मया पासोन मरीचि अंगिरा ।। उत्पती जालि रुपेश्वरा ।। काश्यप जन्मला अवधारा ।। अवतार चराचरी ।। १८ ।। काश्यप नभाचा अवतार ।। तयासि अर्क जाला पुत्र ।। तो योमाचा अवतार ।। मार्तंड हा ।। १९ ।। तें निजब्रह्म योमासनी ।। तयाचें तेज हा तरणी ।। तया दिधली नंदिनी ।। योगमाता ।। २० ।। तियेचे नाम पुरवंती ।। ते वारिली गभस्ती ।। लक्षकोटि योगशक्ती ।। आकारलि ते ।। २१ ।। तयां दोघांचा निजशक्ती ।। चंद्रप्रभु पुत्र जाला तयां प्रती ।। जाणो अवतरला दुजा क्षिती ।। मार्तंड हा ।। २२ ।। तो जाणोनियां पुत्र ।। महाक्षेत्रि पवित्र ।। मग

मार्तंडें दीधला राजभार ॥ मृत्यलोकिचा ॥ २३ ॥ ऐसा तो महावीर ॥ महा–क्षेत्रि धनुर्धर ॥ त्या पासोनि वंश–विस्तार ॥ जाला पुढा ॥ २४ ॥ ते क्षेत्रिवंशि मुळा-वसानी ॥ कैसा विस्तारला तरणी ॥ ते कथा शुळपाणी ॥ सांगे गीरिजे प्रती ॥ २५ ॥ इति श्रीचिंतामणि - कौस्तुभपुराणे इश्वरपार्वति–संवादे वंशविवेचना–नाम प्रथमोध्याय: ॥ १ ॥

श्रीगणेशायनम: ॥ जो चंद्रप्रभु राजेश्वर ॥ सूर्यतेजे क्षेत्रि–अंगार ॥ समरंगाणि धनुर्धर ॥ पुरों न सके ॥ २६ ॥ तेणे प्राणिली इंद्रनंदिनी ॥ बळें आणिली इंद्र जितानी ॥ तो अजित त्रिभुवनी ॥ चंद्रराजा ॥ २७ ॥ तया राज्य करितां गभस्तिसुता ॥ ब्रह्मा भेटला अवचित्ता ॥ पुढिल कथा विचारिता ॥ जाला रावो ॥ २८ ॥ विनति आइके चतुरानना ॥ तुं घटिताचि जाणासि विवेचना ॥ मज कांता कवण ते कमळलोचना ॥ सांगिजे स्वामी ॥ २९ ॥ तवं तो बोलिला ब्रह्म-मुनी ॥ सुरेश्वरें आराधलासे शूळपाणी ॥ ते कथा आइके श्रवणी ॥ सांगतो आतां ॥ ३० ॥ कोण्हे एकें दिनी ॥ इंद्र पहुडला शयनी ॥ सेवा करि इंद्रायणी ॥ विलासयुक्त ॥ ३१ ॥ ते वेळि इंद्रायणी ॥ कामातुर होति कामिनी ॥ इंद्र विनविला मंजुळवचनी ॥ पृछा आदरिली ॥ ३२ ॥ हे इंद्रराया मुगुटमणी ॥ तुं तातिस कोटिचा अग्रगणी ॥ तरि मज देइं गा नंदनी ॥ महासुंदर ॥ ३३ ॥ जे करिल अष्टनायकांचें गर्वहरण ॥ ऐसें रचावें कंन्यारत्न ॥ जे मोहिल त्रिभुवन ॥ ते दीधलि पाहिजे ॥ ३४ ॥ ऐसि रचि गा मुद्रा ॥ जे भुलवों सके हारिहरा ॥ महा-सकुमार सुंदरा ॥ तेजरुपें ॥ ३५ ॥ मग इंद्र म्हणे सत्य होइल तुझें वचन ॥ मग निघाला सहस्त्रलोचन ॥ पावला कैसा स्वभुवन ॥ समस्त देवां सहित ॥ ३६ ॥ तेथे बैसुनियां ध्यानीं ॥ ह्रदइं चिंतिला पिनाकपाणी ॥ ऐसें तप करोनी ॥ इंद्रदेवें ॥ ३७ ॥ तवं तो आला विश्वनाथ ॥ भक्तकृपाळ करुणावंत ॥ तो देखोनियां सुरनाथ ॥ संतोपला मनी ॥ ३८ ॥ मग ह्मणे माग जालों प्रसंन्न ॥ तुवां येवढें कां मांडिलें निर्वाण ॥ इंद्र बोलिला सत्यवचन ॥ शंभु प्रती ॥ ३९ ॥ मज देइं गा कुमरी ॥ जाणो सौभाग्ये जैसि गौरी ॥ ते ऐकोन म्हणे त्रिपुरारी ॥ तथास्तु ॥ ४० ॥ प्रसंन जाला जाणोस शंकर ॥ मग आला तो सुरेश्वर ॥ तो च दिवस पवित्र ॥ रुतु दीधला स्त्रियेसी ॥ ४१ ॥ ते राहिली गरोदरा ॥ कंन्यारत्न आलें उदरा ॥ पुढिल कथा दातारा ॥ आइक आंता ॥ ४२ ॥ मग नवमास भरले ऐसिया परी ॥ तंव ते जंन्मलि कुमरी ॥ जाणो विद्युल्लता दुसरी ॥ लावण्यस्वरुपें ॥ ४३ ॥ ऐसि ते सकुमारी ॥ उपवर जालि इंद्रकुमरी ॥ मग गुरु पाचारोन विचारी ॥ वर तियेसी ॥ ४४ ॥ तवं बोलिला बृहस्पती ॥ स्वयंवर मांडावें सुर-पती ॥ ते ज्याचे असेल लिखिती तो वरिल तियेतें ॥ ४५ ॥ मग इंद्र मांडिलें स्वयंवर ॥ सुरवर नर मिळाले अपार ॥ तेथें जाइं तुं सत्वर ॥ ब्रह्मदेव सांगितलें ॥ ४६ ॥ जे तुजसी वरिल ॥ ऐसें आहे अक्षर ॥ ह्मणोन जाइं वेगवगात्र ॥ सूर्य-

सुता ॥ ४७ ॥ तो जाणोनियां समारंभ ॥ स्वयंवरि मिळाले सुलभ ॥ तेथे आला प्रभु ॥ अर्क नंदन तो ॥ ४८ ॥ तवं श्रृंगारिली ते नोवरी ॥ रत्नखाचित बासिंग शिरी ॥ खोपा भरिला नानापरी ॥ पारिजातककुसुमीं ॥ ४९ ॥ कर्णि कनकपत्रें नागोदरें ॥ पालव फुलें पन्नगकशरें ॥ शेषकुळें मनोहरें ॥ पवित्र तीं ॥ ५० ॥ बरवा भांग मिरवे सिंदुरी ॥ कंचुकि कासिली मुक्ताफळी ॥ तेज फांकताहे अंबरी ॥ लावण्यतेचें ॥ ५१ ॥ कपाळिं अर्धचंद्र टिळक ॥ तांबोल मिरवताहे मुखा ॥ कंठि माळा सुरेखा ॥ दिव्य रत्नाचिया ॥ ५२ ॥ बरवा नेसलिसे पीतांबर ॥ चरणि नेपुराचा गजर ॥ करि मुद्रिका तेज थोर ॥ फांकताहे ॥ ५३ ॥ ऐसि ती लावण्याचि खाणी ॥ त्या तपाचि घडणी ॥ मग आणिली श्रृंगारोनी ॥ सभे माजी ॥ ५४ ॥ मग ते बैसविली हस्तिणी ॥ जाणो दुजा दिन उगवला गगनी ॥ ते देखता जाला नयनी ॥ चंद्रराजा ॥ ५५ ॥ तवं तो धाविन्नला झडकरी ॥ आणि हरिली ते नोवरी ॥ हाहाकार जाला सुरवरीं ॥ धाविन्नले समस्त ॥ ५६ ॥ येरें धनुष्य संजोगिलें ॥ सहश्र बाण गुणि लाविलें ॥ संग्राम करों आदारिलें ॥ चंद्रसेने ॥ ५७ ॥ सुरवर शस्त्रें वर्षती ॥ जैसा प्रजन्य पडे क्षिती ॥ येरु निवारि शस्त्रशक्ती ॥ चंद्रशेन ॥ ५८ ॥ तवं धाविंनला वज्रपाणी ॥ चंद्रसेन वज्रें हाणितला निर्वाणी ॥ तवं येरे पीटिलें बाणी ॥ शस्त्राशस्त्र ॥ ५९ ॥ तरि असो हे संग्रामिचो कथा ॥ तेणं जिंतिलें सुरवरां समस्तां ॥ जो येक दावि सत्ता ॥ सर्वा ठायीं ॥ ६० ॥ जो त्रैलोक्य जाळों सके अर्क ॥ त्याचा तो बाळक ॥ तया जिंकु न सके त्रिंबकु ॥ महा-विरातें ॥ ६१ ॥ मग तयें महाविरी ॥ बळें आणिली इंद्रकुमरी ॥ हरुष जाला अंतरी ॥ चंद्रशेनासी ॥६२॥ असो भरला येक संवत्सर ॥ तवं सुमव जाला पुत्र ॥ तवं बृहस्पतिने जाणविला विचारु ॥ सोहिरीकिचा ॥६३॥ इंद्र आणि सविता ॥ हे बंधु गा अर्कसुता ॥ परी न टळे पुर्वलीखिता ॥ ह्मणोन ऐसें जालें ॥ ६४ ॥ मग तें करावया पुर्णापूर्ण ॥ पंढरि आला आपण ॥ तवं तया क्षेत्रा अष्टवदन ॥ खेळिजे देखा ॥ ६५ ॥ मग तें धरोनि रूप तापस ॥ हृदइं ध्यातसे रुषिकेश ॥ ऐसे भरले बहु दिवस ॥ तपबळें ॥ ६६ ॥ मग तेथे करोनियां विवर ॥ गोरांगणिने जाळिलें शरिर ॥ तयासि ब्रह्म अगोचर ॥ लाधलें देखा ॥६७॥ मग तें कुंडाचे स्थान ॥ तेथे जळ जालें पूर्ण ॥ तवं धाविंनला शेषशयन ॥ श्रीहरि तो ॥ ६८ ॥ तो उच्चलोनि भक्त ॥ निजस्थानि नेत अनंत ॥ तया दिधली अपरोक्ष मुक्ती ॥ अगोचर जे ॥६९॥ मग तया चंद्रावीराचा स्थानी ॥ पुंडलिक भक्त असे निर्वाणी ॥ गंगेचे गा निजस्थानी ॥ जालि चंद्रभागा ॥ ७० ॥ तें चंद्रशेनाचें क्षेत्र ॥ ह्मणोन चंद्रभागा सरोवर ॥ तें कथिताहे वशिष्ट रुषेश्वर ॥ सूर्यवंशातें ॥ ७१ ॥ जें बोलिला वशिष्ट मुनी ॥ तें आइकावें श्रोतेजनी ॥ जें सूर्यवंशा लागोनी ॥ सांगितलें तेणे ॥ ७२ ॥ तो रुषि राजगुरु ॥ परोपकारी बोलिला रुषेश्वरु ॥ जाणोनि क्षेत्रवंश पवित्र ॥ केलें कथन ॥ ७३ ॥ तो वशिष्ट महामुनी ॥

आणि संस्कृत बोलिला वचनी ॥ तें ऐकावें प्राकृत वाणी ॥ वंशाविस्तार हा ॥७४॥ मग तया चंद्रशेनाचा पुत्र ॥ राज्य करि महाविर ॥ तया जाले तिघे पुत्र ॥ महाबाळिये ते ॥ ७५ ॥ शंभु रघु ताम्र ध्वज ॥ हे तिघे सहोदर ॥ त्यां पासोन परंपरा ॥ वाढाले क्षिती ॥ ७६ ॥ त्रिवेधु १ सुसंवेधु २ त्रिशंकवेधु ३ ऐसे क्षेत्रि महाविर ॥ राज्य करिती नृपवर ॥ तवं जन्मला सावा अवतार ॥ परशराम ॥ ७७ ॥ तेण्हे वधिले समस्त क्षेत्री ॥ एक भाग राहिला रुपेश्वरी ॥ परशरामाचे निकरी ॥ वशिष्टे तेणे ॥ ७८ ऐसे वीस वेळे राखिले ॥ येकवीस वेळां पाळावे ॥ तवं विश्वामित्रें सांगितलें ॥ रेणुकानंदनासी ॥ ७९ ॥ तेणें निर्वाण केलें ॥ सर्व क्षेत्रि मारिले ॥ राखिले होते ते हि वधिले ॥ परशरामे ॥ ८० ॥ जाला जाणेनि नीर्वंश ॥ दुःखे विरोधला दिवस ॥ तेण्हे अंधकारें होउं पाहे नास ॥ चराचराचा ॥ ८१ ॥ सूर्य विरोधला थोर ॥ मग पडला अंधकार ॥ अर्का विण न चाले वेव्हार ॥ महीमंडळी ॥८२॥ असो पडिला अंधकार ॥ अर्के सांडिला वेव्हार ॥ ऐसा भरला येक संवत्सर ॥ आदित्याविण ॥ ८३ ॥ अर्का विण बहु आटले जीव ॥ हाहाकार जाला प्रबळ ॥ मग मिळाले तिन्ही देव ॥ गेले सूर्यलोका ॥८४॥ स्तविला सूर्य सर्व देवीं ॥ स्तुती केलि बरवी ॥ उदो करि गा भुमंडळी ॥ अर्कदेवा ॥ ८५ ॥ तुजविण राहिला व्यापार ॥ आणि जीवजंतु पीडले थोर ॥ आतां करि परोपकार ॥ श्रीसूर्यदेवा ॥ ८६ ॥ मार्तंड बोलिला तये वेळा ॥ मी उदो न करिं भूमंडळा ॥ जें जालें वंशकुळा ॥ तें करणें मज ॥ ८७ ॥ मज देखतां बुडाला माझा वंश ॥ तरि कवण परी म्या करावा प्रकाश ॥ मग बोलिला रुपिकेश ॥ सुर्या प्रती ॥ ८७ ॥ पुनरपि होईल तुझा वंशविस्तार ॥ मज घेणे सातवा अवतार ॥ तेणे तुझा वंश पवित्र ॥ होइल सहजें ॥ ८८ ॥ तैसें च प्रतिपादिति ब्रह्मा हर ॥ आह्मि करूं तुझिया वंशि अवतार ॥ आतां चालवि वेव्हार ॥ शृष्टिक्रम ॥ ८९ ॥ हे ऐकुनि बोलिला सविता ॥ हें मानलें माझिया चित्ता ॥ परि द्रुष्टि न देखतां सर्वथा ॥ न करि उदो ॥ ९० मग समस्त बोलिले ते अवसरी ॥ तुज पुत्र होईल निर्धारी ॥ मग तथोन आले तिरी ॥ चंद्रभागेचे ॥ ९१ ॥ तेथे आरंभिला संजिवनि–मंत्र ॥ समस्त देविं शक्ति दीधलि अंशमात्रु ॥ तेथे सचेतन जाला पुत्र ॥ मार्तंडयोसी ॥ ९२ ॥ तेणे संतोषला गभस्ती ॥ सर्वेश्वर नावं जालें तयासी ॥ तेणे उदो जाला महीसि ॥ त्रिभुवनासि उदोकार ॥ ९३ ॥ ऐसा उदो करितां सहस्रमूर्ती ॥ तेणे सुखी जाले त्रिजगती ॥ संवत्सरा येका गभस्ती ॥ देखिला नयनी ॥ ९४ ॥ तेणे आनंद जाला क्षिती ॥ नाना परिचे धर्म करिती ॥ वेदश्रुति पाठ करिती वेदमूर्ती ॥ आनंदले सकळिक ॥ ९५ ॥ येक संवत्सर अंधकार ॥ ह्मणोन लोपला होता चराचर वेव्हार ॥ तो देखिला दीनकर ॥ वरुषा येका ॥ ९६ ॥ वीनविती सुर्या प्रती ॥ जीवने देति पुर्णाहुति ॥ ह्मणति तुं साक्षांत विश्वमूर्ति ॥ नारायणा ॥ ९७ ॥ तुज वांचुनि चराचर ॥ सांडिति आपुलें शरिर ॥

तु अस्त गेलिया संव्हार ॥ होये सहजें ॥ ९८ ॥ तु त्रिकाळ त्रीमूर्ती ॥ सर्व देवांची तेजशक्ती ॥ तुझी यकादश महाभक्ती ॥ नारायणा ॥ ९९ ॥ तुं निजतेजें समर्थ ॥ तु त्रिगुणात्मक भरित ॥ कवणा कळे तुझा अंत ॥ निज—स्वरूपा ॥ १०० ॥ शिवशक्ति त्रिकाळमूर्ती ॥ विश्वव्यापका तु गभस्ती ॥ नमो जी नमोस्तुती ॥ देवादिदेवा ॥ १०१ ॥ तुं निजतेज निर्विकार ॥ यावत् प्रळइं तुझा आधार ॥ चराचराचा वेव्हार ॥ चालविसी देवा ॥ १०२ ॥ ऐसें स्तविती समस्त ॥ दाने देति बहुत ॥ धर्म जाला अद्भुत ॥ पुढिल वृत्तांत आईका श्रोते ॥ १०३ ॥ इति श्रीचिंतामणिकौस्तुभपुराणे ईश्वरपार्वतिसंवादे वंशउत्पतीकथानाम द्वीतियोध्यायः ॥ २ ॥

श्रीगणेशाय नमः ॥ मग ते ब्रह्माहरीहर ॥ त्याहि त्या सर्वरुपा दिधला राज्यभार ॥ मग तया पासोन विस्तार ॥ सूर्यवंशाचा ॥ १०४ ॥ मग तया राज्य करितां भूपती ॥ कथा वर्तलि पुण्यती ॥ तो सूर्यवंशि राजा प्रतापी ॥ महाक्षेत्रि दारुण ॥ ५ ॥ तेणे त्रैलोक्य जिंतिला ॥ सूर्यवंशी शक चालता केला ॥ तो पुराणि वर्णिला ॥ व्यासदेवें ॥ ६ ॥ ऐसें राज्य करितां सर्वस्वरुपा ॥ पुत्र नाहि तयाचिया वंशा ॥ मग रुषि बोलाविता जाला त्वरिता ॥ सर्वस्वरुप तो ॥ ७ ॥ तेथे मिळाले समग्र ॥ महारुषि पवित्र ॥ कश्यपादि थोर थोर ॥ आले तेथे ॥ ८ ॥ आला मार्तंडयो पराशर ॥ नारद अंगिरा तुंबर ॥ पौलस्ति भृगु ब्रह्मपुत्र ॥ दालभ्यरुषि तो ॥ ९ ॥ आला मरीचि विश्वामित्र ॥ येकशृंगि प्रहद अत्रि रुषेश्वर ॥ मिळाले अठ्यासि सहस्त्र ॥ महाथोर रुषि ते ॥ १० ॥ देखोनि राजा संतोषला ॥ शरणागत ह्मणोनि नमस्कार केला ॥ दंडवति चरणि लागला ॥ पुजिले अर्घ्यपाद्यी ॥ ११ ॥ चैमत्कार जाला समस्तां ॥ मग राजा होये विचारिता ॥ कृपा करोनियां ताता ॥ विनती आईका स्वामी ॥ १२ ॥ जेणे होईल पुत्रसंतती ॥ तो प्रयोग रचावा समस्ती ॥ ऐसि केलि विनती ॥ रुषि प्रती ॥ १३ ॥ तें आईकोन वचन ॥ रुपि स्थापिति यज्ञकर्म ॥ जेणे करोन राजा समाधान ॥ पुत्रसंतति पूर्ण प्राप्त होये ॥ १४ ॥ तें मानलें राजयासी ॥ यज्ञ आरंभिला त्वरेसीं ॥ सामग्री यज्ञद्रव्याची ॥ करिते जाले ॥ १५ ॥ मग तेथे आरंभिला यज्ञ ॥ नाना द्रव्यें होमिलिं जाण ॥ पुर्णाहुति करोन संपुर्ण ॥ आशिर्वाद देती ॥ १६ ॥ तें रुषिचें आशिर्वचन ॥ तेणे रायासि जालें संतान ॥ तीन पुत्र दारुण ॥ सर्वस्वरुपासिं जाले ॥ १७ ॥ पहिला तो मनोत्तम ॥ दुसरा सुदिपन ॥ तिसरा चित्रभान ॥ राजपुत्र ॥ १८ ॥ तो महाबलाढ्य धनुर्धर ॥ महाक्षेत्रि पवित्र ॥ सूर्यवंशिचे नृपवर ॥ महादारुण ॥ १९ ॥ ते महाबळिये महाविर ॥ तपें प्रसन्न केला दिनकर ॥ मग जिंतिला अमरेश्वर ॥ महाप्रौढी ॥ २० ॥ त्याहि राज्य केलें येकछत्री ॥ देव तयां वोळगती दिनरात्री ॥ महापवित्र आचरती ॥ सत्यवंत ते ॥ २१ ॥ त्या तिघा मध्यें येक पुत्र ॥ सुमध नाम पवित्र ॥ त्याणे धरिला राजभार ॥ सूर्य-

वंशाचा ॥ २२ ॥ कोणे येके दिनीं ॥ इछा उपजालि तया लागुनी ॥ सर्वश्च त्यजुनी ॥ तपश्चर्य आरंभिलें ॥ २३ ॥ चवदा सहस्र वरुषें धुम्रपान ॥ मोहन–मुख वर्जिलें अन्न ॥ तैं जाला प्रसंन्न ॥ महादेव ॥ २४ ॥ प्रसंन्न जाला त्रिपुरारी ॥ कर टेविला मस्तका वरी ॥ माग माग झडकरी ॥ प्रसंन्न जालों तुज ॥ २५ ॥ येरु ह्मणे गा विश्वनाथा ॥ युद्धीं जितावें म्या समस्तां ॥ हा वर देई गा त्वरिता ॥ देवादिदेवा ॥ २६ ॥ शंभु ह्मणे तथास्तु ॥ तुं सर्वांसि अजितु ॥ त्या वरदें राज्य केलें वहुत ॥ वसुंधरेचें ॥ २७ ॥ तेण्हे ईंदु केला वोळगणा ॥ पन्नग–गंधर्व–गणा ॥ इत्यादि समस्तासिं जाणा ॥ आज्ञा त्याची ॥ २८ ॥ तवं त्यासि जाला पुत्र ॥ सनोघ नामे पवित्र ॥ तयाचा महाभद्र ॥ सूर्यवंशी ॥ २९ ॥ आतां समग्र सांगतां विस्तार ॥ ग्रंथ वाढेल थोर ॥ मागिल कथा अंतरेल समग्र ॥ सहजें चि जाणा ॥ ३० ॥ तया महाभद्राचा सगुण ॥ सगुणाचा त्रीविक्रम ॥ नभ अनाशन महाशन वीविश ॥ तयाचा कमळाकर ॥ कमळाकराचा गोपुर ॥ गोपुराचा अवतार ॥ महाराजा तो ॥ ३२ ॥ द्वारकाचा वीविक्षु ॥ तयाचा दिपकु ॥ महाराजा विख्यातु ॥ महाप्रभु तो ॥ ३३ ॥ तयाचा प्रतापसेन ॥ तयाचा निजभान ॥ तयाचा तेजभानु ॥ महाप्रभु तो ॥ ३४ ॥ ज्ञानधराचा प्रदिप्तु ॥ प्रदिप्ताचा महादिप्तु ॥ तयाचा महाशंखु ॥ राजाधिराज ॥ ३५ ॥ तयाचा ब्रह्मसाधु ॥ तयाचा मचकुंद ॥ तयाचा प्रबोधु ॥ महाराज तो ॥ ३६ ॥ तयाचा संवेध ॥ तयाचा निष्टु ॥ तयाचा महाप्रयागु ॥ परम प्रतापि तो ॥ ३७ ॥ तयाचा जविजु ॥ तयाचा महाविजु ॥ तयाचा भोजु ॥ ब्रह्मपदांबुजि सदा रत ॥ ३८ ॥ तयाचा महिंद्रपाळ ॥ तयाचा अजपाळ ॥ अजपाळाचा दशरथ भुपाळ ॥ सूर्यवंशी ॥ ३९ ॥ दशरथासिं च्यार पुत्र ॥ राम लक्ष्मण भरथ शतृघ्न सोहोदर ॥ तया माजि राज्यधर ॥ श्रीरामचंद्र ॥ ४० ॥ श्रीरामचंद्र जेष्ट पुत्र ॥ तो साक्षांत राज्यधर ॥ पाहा सातवा अवतार ॥ अवतरला सूर्यवंशी ॥ ४१ ॥ नीर्विकार आकारलें ॥ तें अव्यक्त व्यक्तिसी आलें ॥ स्वयें ब्रह्म चि प्रकाशलें ॥ जोतिस्वरुप ॥ ४२ ॥ तो बोलिले श्रीरामचंद्र ॥ तयासि बोलिजे घटेश्वर ॥ सहश्रनाम–अधिकार ॥ तया श्रीरामा ॥ ४३ ॥ तया पासुनि परंपरा ॥ श्रोते दत्तचित्ते अवधारा ॥ सांगतों असे सविस्तरा ॥ परंपरा अनुपम्ये ॥ ४४ ॥ श्रीराम अंकुश ॥ अंकुशाते तिवे पुत्र ॥ महाबाळिये महाविर ॥ जेष्ट तया माजि मांधातृ ॥ तयाचा जनार्दन ॥ ४५ ॥ तया पासोनि धर्मराजा ॥ धर्मा पासोनि शंभुध्वजा ॥ शंभु पासुनी निव्रात राजा ॥ जे धनुर्धर बळियाढ्ये ॥ ४६ ॥ तयाचा शीवशक्ती ॥ तया पासाव येवंती ॥ जे क्षेत्री जिंको शकती ॥ भुमंडळासी ॥ ४७ ॥ येवंतिरायाचा मुनेस्वेखु ॥ तयाचा ब्रह्मभेखु ॥ तयाचा आद्येपुरुषु ॥ महाराज तो ॥ ४८ ॥ कृतायुग संपले तेरा शत नृपवर ॥ त्रैतायुगि वंश करावया पवित्र ॥ ह्मणोनि जाला अवतार ॥ सूर्यवंशी ॥ ४९ ॥ एवं संपले त्रैतायुग ॥ द्वापारिं कथा पवित्र ॥ पुढिल

आईका वंशमार्ग ॥ श्रोतेजनी ॥ ५० ॥ ऐसे नांदले नृपवर ॥ तवं श्राधदेव जाला आदित्यासिं पुत्र ॥ तेणे मांडिला यज्ञ थोर ॥ महीमंडळां ॥ ५१ ॥ आले रुषि समस्त ॥ होमद्रव्य मेळविलीं बहुत ॥ पूर्ण केलि पुर्णाहुत ॥ समस्त रुषीं ॥५२॥ समस्तरुषिवरदानाचि आहुती ॥ तेथे कंन्या जंन्मली महाशक्ती ॥ ते दीधलि भूपती ॥ श्राधदेवासी ॥ ५३ ॥ मग ता गेला ब्रह्मभुवना ॥ तेणे प्रसंन्न केलें चतुराननां ॥ यका सहस्त्र वरुषे हट—निग्रहा ॥ प्रसंन्न केला ॥ ५४ ॥ तो प्रसंन्न जाला विरंची ॥ ते कंन्येचा पुत्र रचीं ॥ नावे शुदिमन्य हाची ॥ महाक्षेत्री ॥५५॥ मग तो राज्य करितां ॥ अनर्थ घडला अवचिता ॥ तो पुनरपि जाला वनिता ॥ रुद्रशापें ॥ ५६ ॥ शिवें प्रणिली दाक्षायणी ॥ ते रूपें जालि तरुणी ॥ मग तेथोनि महेश आणि भवानी ॥ आलि काम्यकवनासी ॥ ५७ ॥ ते सुखाचि संगती ॥ अंकि बैसलिसे शक्ती ॥ तवं उदो केला गभस्ती ॥ तये वेळां ॥ ५८ ॥ ते प्रसन्न काळीं ॥ ब्रह्मा आला विनवावया चंद्रमौळी ॥ ते लाजोनि शैल्यबाळी ॥ वढिला अंबर ॥ ५९ ॥ देखोन मुरडला चतुरानन ॥ भवानिने विनाविला त्रीनयन ॥ देवा चाल जावों आणके स्थान ॥ यकांतासी ॥ ६० ॥ हे देवरुषितापसाचें वन ॥ येथ तृप्ति नव्हे पंचबाण ॥ हे बैसले स्थान ॥ अंकि तुझे ॥६१॥ देव ह्मणे हें वन पवित्र ॥ पुष्पी दाटले तरुवर ॥ छाया महासीतळ सकुमार ॥ भुमि हे ॥ ६२ ॥ आणि येक असे अवसर ॥ ये वनि जो येईल नर ॥ तो नारि होइल ऐसें हर ॥ शाप वदला ॥ ६३ ॥ तवं तो श्राधदेवाचा नंदन ॥ पारधि खेळे सुदीमन्य ॥ टाकोनि आला तें वन ॥ नेणतां अकस्मात ॥ ६४ ॥ तों तेणे शाप त्या वना ॥ तटाकी रिघाला स्नाना ॥ तेणे चि वीपरित जालें चिन्हा ॥ पालटलें स्वरुप ॥ ६५ ॥ तेणे पालटलि पुरुष आकृती ॥ सुदीमन्यु जाला शक्ती ॥ तेथ सोमाचा नंदन पारधि खेळतां त्या वनाप्रती ॥ आला बुध ॥ ६६ ॥ ते देखोनियां सकुमारी ॥ तजरासि राजपुत्री ॥ ते बुधे रथा वरि झडकरी ॥ घेवोन मंदिरि नेलि पैं ॥ ६७ ॥ तियेसिं जाले तिघे पुत्र ॥ जे सोमवंशि महापवित्र ॥ तेथे आला रुषेश्वर ॥ वशिष्टमुनी ॥ ६८ ॥ तो सूर्यवंशिचा गुरु ॥ स्त्रिरुपें देखिला श्राधदेवाचा पुत्रु ॥ तो दुखवला रुषेश्वरु ॥ मना माजी ॥ ६९ ॥ मग सूर्यवंशा लागीं ॥ प्राण त्यजु पाहे मानुरागी ॥ पद्मासन घालुन वेगीं ॥ बैसला तपासी ॥ ७० ॥ हृदई त्रिनयनाचें ध्यान ॥ ब्रह्मांडि नेलासे पवन ॥ साभिमाने रुषि संपुर्ण ॥ आपुला प्राण सांडो पाहे ॥ ७१ ॥ ऐसें करितां रुषिश्वर ॥ तपें आराधिला शंकर ॥ तेथे आला शंकर ॥ भवानिसहित ॥ ७२ ॥ मग ह्मणे माग प्रसंन्न ॥ येवढें काये तुझें निर्वाण ॥ जें मागसि तें सत्यवचन ॥ रुषि पूर्ण संतोषला ॥ ७३ ॥ वशिष्ट ह्मणे जी शंकरा ॥ अंत पावला सूर्यवंशाचिया नृपवरा ॥ सुदिमन्य राजेश्वरा ॥ तुझिया नियोगें ॥ ७४ ॥ तयासि घडला तुझा शाप ॥ तो जालासे शक्तिरूप ॥ तो बुधा वरि अकस्मात ॥ देखिला म्या ॥ ७५ ॥ तो पुन-

रपि करावा नर ॥ तया कळंक अपवित्र ॥ येरवि जन निंदि नृपवर ॥ त्यजिल प्राणा ॥ ७६ ॥ मग हर ह्मणे अवधारी ॥ आयुष्या प्रमाण नरनारी ॥ तेणे रचिली सकळिकांच शरिरी ॥ शीवशक्ती ॥ ७७ ॥ शंकर ह्मणे रुपेश्वरा ॥ केवळ नर न करवे त्या नृपवरा ॥ विवंचना जालि पूर्वसूत्रा ॥ परि स्वप्रमाण पर नारि होईल तो नर ॥ ७८ ॥ ऐसें बोलोन गेला हर ॥ तवं सुदिमन्य सोमवंशि प्रशवला तिघ पुत्र ॥ ते वेळि राजा जाला तो नर ॥ आवधिप्रमाणे ॥७९॥ मग आला आपुलिये नगरा ॥ तवं तिघे पुत्र जाले नृपवरा ॥ ऐसि अवस्था संसारा॥ जालि तया ॥८०॥ ते तिघे सोमवंशि क्षेत्री ॥ पुरुरवा रुतुध्वज रविकु अवधारी ॥ तयाचे वांशी गुणराज क्षेत्री ॥ जन्मला तो ॥ ८१ ॥ सुरसेनाचा वसुदेव ॥ वसुदेवाचा कृष्णदेवो ॥ कृष्णदेवाचा रतिनाहो ॥ प्रद्युम्न तो ॥ ८२ ॥ प्रद्युम्नाचा विजयगदु ॥ आणिक सांबु ॥ सांबाचा चंद्र ॥ राजेश्वर तो ॥८३॥ तो अद्यापि कनकमेरुचा पाठारी ॥ राज्य करितसे निर्धारी ॥ तयासि ते परी ॥ प्राप्त जाली ॥ ८४ ॥ सोमसूर्यवंशासी॥ हें येक मुळ गा दोघांसी ॥ परि घात जाला यादवांसी ॥ द्वापारा अंती ॥ ८५ ॥ पुर्वा पासोनि महाअंश ॥ महाअंशाचा भीष्मजस ॥ भीष्मजसाचा पूर्ण–पुरुष ॥ शांतन तो ॥ ८६ ॥ शांतनाचा चित्रविचित्र ॥ चित्रविचित्राचा पांडु विदुर ॥ धृतराष्ट्र तयाचे पुत्र ॥ कौरव ते ॥ ८७ ॥ पंडुचा अर्जुन ॥ अर्जुनाचा अभिमन्य॥ अभिमन्याचा परीक्षिति नंदन ॥ परीक्षितिचा पारिक्षिती ॥ ८८ ॥ पारिक्षिति तो जन्मेजयो ॥ जंन्मेजयाचा आयास महाबाहो ॥ महाबाहोचा वेणुवैश्य पाहो ॥ महाराज तो ॥ ८९ ॥ ऐसा जाला सोमवंश ॥ आइका सोमवंशाचा प्रकाश ॥ सांगितला सौरस ॥ पृथकाकारें ॥ ९० ॥ सूर्यवंशाचे सुदिमन्याचे नंदन ॥ तेणे पितृलांछने त्यजिले प्राण ॥ अग्नि सुदिमन्य करोन तपसाधन ॥ त्यजिले प्राण देखा ॥ ९१ ॥ ऐसे ते तिन्ही नंदन ॥ त्याहि त्रिवेणि साधिलें योगसाधन ॥ सिरें वाहिलीं जाण॥ सदाशिवासीं ॥ ९२ ॥ इति श्रीचिंतामणीकौस्तुभपुराणे इश्वरपार्वतिसंवादे सूर्यसोमवंशोत्पतिकथाकथननामतृतियोध्यायः ॥ ३ ॥

श्रीगणेशाय नमः ॥ तेणे मागुता जाला निर्वंश ॥ मग मागुता कोपला दिवस ॥ ह्मणे समस्तांचा करिन निर्वंश ॥ माझिया वंशा स्तवं ॥ १ ॥ तेथे जाला कल्पांत ॥ अंत पाहों पाहे भुत–जात ॥ थोर मांडला आवर्त ॥ चरांचराचा ॥ २ ॥ ऐसा कोपला आदित्य ॥ तेथ जीव आपटे बहुत ॥ जाले हाहाभुत ॥ तिन्ही लोक ॥ ३ ॥ लोक पाहाति जीवन ॥ तवं जीवन जाये शोखोन ॥ ह्मणति प्रळये मांडला निर्वाण ॥ कोपला देव ॥ ४ ॥ तेथे अग्निचिया धारा ॥ गोपुरें नगरें जळाति भरभरां ॥ ऐसा जाला रगडा ॥ चराचरांचा ॥ ५ ॥ जैसा घन वर्षे जळधारी ॥ तैसा तरणि वरुषे अंगारी ॥ तेथ कौंचि उरी ॥ चराचरासी ॥ ६ ॥ ऐसा जाला अंत ॥ थोर जाला हा भुत ॥ तवं जाले सावचित्त ॥ तिन्ही देव ॥ ७ ॥ मग ब्रह्माहरिहर ॥ आणि ते मिळाले सुरवर ॥ आले सर्व मिळोन ॥

अर्कीजवळी ॥ ९ ॥ मग देवीं समस्तीं ॥ मांडिलि अर्काचि स्तुती ॥ जयजया तेजमूर्ती ॥ सूर्यनारायणा ॥ १० ॥ जयजयजी सहस्रमूर्ती ॥ अंधकारनाशना गभस्ती ॥ तुं कोपालिया त्रिजगती ॥ कैंचि उरी ॥ ११ ॥ तुं कोपलिया सहस्र-कर ॥ कैचें उरेल हें चराचर ॥ आणि तुज विण हा अंधकार ॥ केवि फिटे ॥ १२ ॥ तूं सर्व तेजाचें तेज ॥ उदो अस्त सहज ॥ आणि करिसी काज ॥ भक्त–जनाचें ॥ १३ । ऐसि नाना परि करितां स्तुती ॥ मग बोले गभस्ती ॥ माजिया वंशाचि जालिया विण उत्पती ॥ न सांडि वैर ॥ १४ ॥ मग बोलिले त्रिमूर्ति ॥ आह्मि तुझिया वंशि करु उत्पती ॥ ऐसा बुझाविला गभस्ती ॥ तिहीं देवीं ॥ १५ ॥ अर्कासि ह्मणे ब्रह्माहरीहर ॥ आह्मि तुझिया वंशि करु अवतार ॥ मग तिन्ही देविं केला विस्तार ॥ सूर्यवंशी ॥ १६ ॥ अर्काचि जे निजशक्ती ॥ त्रिकमळा नावें गुणवती ॥ तवं ते जालि रुतुवंती ॥ कवणेक वेळ ॥ १७ ॥ तसि रमला आदित्य ॥ तवं ढळलें तें रेत ॥ तेथे जन्मले समर्थ ॥ तिन्ही देव ॥ १८ ॥ तेणें संतोषला सविता ॥ नयनि देखिलें तिघां सुतां ॥ महातेज सविता ॥ विस्मयो करी ॥ १९ ॥ मग बोलाविला कश्यप ऋषेश्वर ॥ तेणे अर्का जाण-विला विचार ॥ तुझे वंशि विस्तार ॥ जाला अर्का ॥ २० ॥ तरि आतां हे पुत्र ॥ मृत्यलोकिं होति नृपवर ॥ ते काश्यपें आणिले सत्वर ॥ रुषि–आश्रमी ॥ २१ ॥ तेथे मेळविलिया कन्या ॥ कश्यपे केला ॐ–पुण्या ॥ ते कथा सर्व सांगतां ॥ विस्तार होईल कवि ह्मणे ॥ २२ ॥ सोमवंशि राजपुत्रिया ॥ स्वयंवरें केलि काश्य-पेंया ॥ राज्य दिधलें तयां ॥ अर्क–पुत्रांसी ॥ २३ ॥ या परि वंशवृद्धी ॥ पावला तो दिनमूर्ती ॥ काश्यपें केलि वाढति किर्ती ॥ सूर्यवंशाची ॥ २४ ॥ मग ते तिघे नृपवर ॥ वडिल अजानबाहो धनुर्धर ॥ त्या धाकुटा गंगाधर ॥ श्रीधर हे तिघे पैं ॥ २५ ॥ अजानबाहो पासोन वसु ॥ तयासि पुत्र जाले साटि सहश्र ॥ महावंश-प्रकाश ॥ थोर सूर्यकृपे ॥ २६ ॥ मग ते बहुत नृपवर ॥ देशोदेशिं राहिले धनु-र्धर ॥ आपले भुजा बळें राज्यभार ॥ दाविती आजी ॥ २७ ॥ ते महा–क्षेत्रि निपुण ॥ जे धनुर्धर–विद्या–पूर्ण ॥ महाप्रभु सगुण ॥ सूर्यवंशि ॥ २८ ॥ या प्रकारें विस्तार ॥ सूर्यवंशि निर्धार ॥ नइनंदन महापवित्र ॥ राज्य करी ॥ २९ ॥ तयाचा पुत्र सुदिमन्य ॥ जाणो तेजें दुजा भानु ॥ तो महा दारुण ॥ तेज-आकृती ॥ ३० ॥ तणे सुखि केलि वसुधरी ॥ आणि क्षेत्रियां राजे प्रथकाकारी ॥ तो राजा येकछत्री ॥ महाप्रभु तो ॥ ३१ ॥ त्याणे राज्य केले च्यारि सहस्र दिन-रात्र ॥ तो अकस्मात पावला मृत्य ॥ तवं वंशि होता सूत ॥ सावतासंनु ॥ ३२ ॥ तो क्षेत्रियां माजि पंचानन ॥ हरी–भक्तिसी परिपूर्ण ॥ तणे राज्य केलें गहन ॥ तीन संवत्सर ॥ ३३ ॥ तो राज्य करितां नरेंद्र ॥ तयास जालें दान पुत्र ॥ ते महाक्षेत्रि महाविर ॥ सूर्यवंशी ॥ ३४ ॥ वडिला नाम भद्रशेन ॥ त्या धाकुटा रघुत्तम ॥ त्याहि राज्य केलें परिपूर्ण ॥ वसुंधरेचें ॥ ३५ ॥ मग तया वंशवृद्धी ॥

पुत्र जाला ज्ञानबुद्धी ॥ त्या नावं महाशिद्धी ॥ राजा कृपाळ ॥ ३६ ॥ त्याणे राज्य केलें ॥ तीन शहस्त्र दिन बाविस ॥ तये रार्जी बैसला कृपाळ ॥ पुंण्य पुत्र ॥ ३७ ॥ तयाचा पुत्र विजयावंश महाप्रभु तो ॥ तेणे सुखि केले जन समस्त ॥ राज्य भोगिलें बहुत ॥ येकुणिस संवत्सर पैं ॥ ३८ ॥ मग तयाचा नंदन ॥ सोमप्रभु राजा गहन ॥ राज्य करितां त्रिलोचन ॥ संतोषविला तेणे ॥ ३९ ॥ तेणे राज्य केलें वीस संवत्सर ॥ बारा मास दिन च्यार ॥ तयासि जाला पुत्र ॥ कृष्णदेव ॥ ४० ॥ तया राज्य करितां नृपवरा ॥ सुखिया केलें परिवारा ॥ तवं तयासि जाला पुत्र ॥ रघुपति तो ॥ ४१ ॥ मग तयाचें राज्य सरलें ॥ पंधरा शत संवत्सर भरले ॥ तें राज्य रघुपति–कुमरें ॥ राज्य केलें थोर पैं ॥ ४२ ॥ तवं अंत पावलें द्वापार ॥ ते कथा सविस्तर ॥ कौस्तुभपुराणि साचार ॥ सांगितालि असे ॥ ४३ ॥ तवं काळि जाला सचेतन ॥ मग कल्युगि राज्य करितो नृपनंदन ॥ दश सत सा दिन ॥ केलें राज्य ॥ ४४ ॥ तयाचा पुत्र कमळादिन ॥ तो पवित्र राजा गहन ॥ तेणे अठरा शत तीन दिन ॥ केलें राज्य ॥ ४५ ॥ तयाचा अश्विनदेव पुत्र ॥ तश सवें आठ लक्ष क्षेत्रि नृपवर ॥ यकांग धनुर्धर ॥ महाविर तो ॥ ४६ ॥ ते राज्य करितिल पृथकाकारी ॥ परि अश्विनदेव राजा येकछत्री ॥ तेणे सात शत संवत्सरी ॥ केलें राज्य तपोबळें ॥ ४७ ॥ श्रीभानु जाला त्याचा वंशी ॥ तो महाक्षेत्रि प्रतापेसी ॥ तेणे सा शत संवत्सरासीं ॥ केलें राज्य ॥ ४८ ॥ तवं त्यासि जाला पुत्र ॥ तेणे राज्य केलें दोन शत संवत्सर ॥ तयाचा जयसवन पुत्र ॥ सत्य जाण ॥ ४९ ॥ तयासि पांच नंदन ॥ तेणे दिड शत वरुषें गहन ॥ निजप्रतापें परिपूर्ण ॥ राज्य केलें ॥ ५० ॥ तयाचा पुत्र रामराजा ॥ प्रतापें धनुर्धर कल्युगिचा ॥ तवं तुरकाण जालें सहजा ॥ होणार गत ॥ ५१ ॥ तेणे दुखवला त्रिनयन ॥ ब्रह्मकर्तृत्व गहन ॥ पुढा जाला पाहिजे येक–वर्ण ॥ प्रायश्चित–योगें ॥ ५२ ॥ ब्रह्महत्यीं गेलि ब्रह्मशक्ती ॥ रुद्रशक्ति हि गेलि सहजस्थिती ॥ म्लेंछ अवतरले क्षिती ॥ महा अधम ॥ ५३ ॥ तो तवं राज्य करि रामचंद्र ॥ जो क्षेत्रि वंशि दीनकर ॥ तेथ अशुभ पावलें थोर ॥ ब्रह्महत्येचें ॥ ५४ ॥ ब्रह्महत्येचेनि दुपणे ॥ शक्तिहिन जालि नृपनंदने ॥ + + + + + + + + ॥ अशुभ तुरक आहामद ॥ ५५ ॥ तवं वशिष्ट असतां ध्यानी ॥ म्लेंछ देखिले अंतःकर्णी ॥ तो उठिला तेथोनी ॥ तये वेळीं ॥ ५६ ॥ मग बोलावोन समस्त क्षेत्रिजन ॥ तयांसि ब्रह्मविद्या केलि बोधन ॥ करी दिधलि लेखणी ॥ वशिष्ट–देवें ॥ ५७ ॥ आणि व्यासमुनिचा वचनी ॥ जे महाविद्या देईल मार्तंड येवोनी ॥ वारे म्लेंछासि समरंगणी ॥ नाहि जयो ॥ ५८ ॥ आणि क्षेत्रियांसि समरंगणी मुक्ती ॥ आणि म्लेंछासि भीड नाहि निती ॥ जे अमंगळ याती ॥ पुण्या परते ॥ ५९ ॥ मग तो राजगुरु ॥ आणि क्षेत्रियांसि कथिला आचार ॥ यकादशवर्षि दीक्षासूत्र ॥ सांगितलें ॥ ६० ॥ सांगितलिं द्वादश गोत्रें ॥ भृगु भारद्वाज वशिष्ट ब्रह्म कश्यप कौंडण्य

दालभ्य ॥ गौतम नारायण मांडव्य मार्तंड ॥ ही द्वादश गोत्रें ॥ ॥ छ ॥ आणिक उपदेशिताहे कुळगुरु ॥ घोरे सांडावा अहंकार ॥ आहि क्षेत्री युद्धि बाडिवार ॥ सांडोनि द्यावा ॥ ६१ ॥ आणि कळिचा अंती ॥ निद्रे दाटला असे श्रीपती ॥ ह्मणोन म्लेछासि न चले बळशक्ती ॥ येणे परी ॥ ६२ ॥ कलयुगि अधर्म आचार ॥ आणि अदृष्य जाला रुद्र ॥ ते महाब्रह्मकपाट ॥ टाळि अज्ञानबुद्धी ॥ ६३ ॥ कलयुगि हरीहर ॥ दोन्हि गुप्त जाले परमेश्वर ॥ योगनिद्रे सारंगधर ॥ बोध्य जाला ॥ ६४ ॥ आणि रुद्रा ब्रह्महत्यचें लांछन ॥ तेणे प्रवर्तलें आन आन ॥ लोपलें अवदान ॥ देवाद्विजाचें ॥ ६५ ॥ तस्मात् द्विज त्रिमूर्ति ॥ ही वोळख जया चित्ती ॥ तेथे असे निजशक्तिं ॥ तदर्धतेज ॥ ६६ ॥ ते गायित्री परमाक्षरा ॥ ब्राह्मणासिं आर्पिली परोपकारा ॥ ब्राह्मणपदस्पर्शे मुक्ति नरां ॥ कलयुगि साक्षांत भूदेव ॥ ६७ ॥ ते निरंजन शक्ती ॥ ब्राह्मणासि दीधलि जगन्मूर्ती ॥ आपण जाले बोध्यास्थिती ॥ योगनिद्रे ॥ ६८ ॥ तदर्थ मी तुह्मासि देणे ॥ रुद्रशक्ति पूर्णपणे ॥ रुद्रगायित्री ऐक्यनेमे ॥ भवाब्धि तरणे ॥ ६९ ॥ लोकि वर्तला अनाचार ॥ तुह्मी न सोडावा रुद्र ॥ रुद्रशक्ति जप–मंत्र ॥ आचरावा नेमे ॥ ७० ॥ आणि लोपलि सर्व भक्ती ॥ रुद्रलिंगे उपटोन टाकिती ॥ परि तुह्मी न सांडावि गायत्री ॥ रुद्रात्रिपदा ॥ ७१ ॥ ऐसे बहुत अपवित्र ॥ अदृश्य असति हरिहर ॥ ऐसें सांगो तरी विस्तार ॥ होईल ग्रंथाते ॥ ७२ ॥ निंदा ब्राह्मणाचि न किजे ॥ स्वधर्म आपला चालविजे ॥ अन्योन्य रुद्रासि होईजे ॥ ब्राह्मण पुजिजे सदाकाळी ॥ ७३ ॥ ब्राह्मण नामे ब्रह्म पूर्ण ॥ ब्राह्मण त्रिमूर्ति जाण ॥ किंवा सूर्य तत्समान ॥ पुजावा सदा ॥ ७४ ॥ येक ब्राह्मण दुजा सूर्य ॥ हे प्रळयांति राहाति द्वीवर्य ॥ या ईत्तर ते सर्व म्लेंछप्राये ॥ होत सहजें ॥ ७५ ॥ हा वर्णावर्ण–भेद ॥ अवघे होति महाम्लेंछ ॥ येक ब्राह्मण दुजा सूर्य ॥ प्रळयांती ॥ ७६ ॥ अवघा होईल यकाकार ॥ येक ब्राह्मण–वर्ण राहेल निर्धार ॥ तया उदरि कल्कि नारायण–अवतार ॥ संहार करिता ॥ ७७ ॥ यैसें सांगुनि मुनिश्वर ॥ मग गेला तो सत्वर ॥ पश्चममार्गारि अधउर्ध्वाकार ॥ तप करिता होये ॥ ७८ ॥ तवं येरि कडे काये वर्तलें ॥ म्लेंछे फार व्यापिलें ॥ क्षेत्रियांसि भये उपजलें ॥ रुषिवचनी ॥ ७९ ॥ तवं काये करि आहामद ॥ क्षेत्रियांसि आरंभिताहे युद्ध ॥ पत्रे धाडिता होये प्रसिद्ध ॥ देशोदेशीं ॥ ८० ॥ राज्य सांडावें सत्वर ॥ नाहि तरि युद्धास यावें लवकर ॥ समरंगणि राहावें स्थिर ॥ क्षेत्रियानो ॥ ८१ ॥ ऐसें पाठविलें पत्र ॥ मग क्षेत्रियांसि पडला विचार ॥ सांगोन गेला मुनेश्वर ॥ तरि संग्राम न करावा ॥ ८२ ॥ परि वोडालिया उचिता ॥ आपुला स्वधर्म सांडितां ॥ जाईजे नर्कपाता ॥ ऐसिं बोलति पुराणे ॥ ८३ ॥ आपण राज्ये करण ॥ तरि मरणासिं का भिणे ॥ जरि जाईजे काळासि शरण ॥ तरि न राक्षि तो ॥ ८४ ॥ मग समस्ति करोनि विचार ॥ आणि दूत पाठविती नृपवर ॥ संग्राम करणे हा निर्धार ॥ म्लेछांसी ॥ ८५ ॥

आह्मि मुळारंभ–क्षेत्री ॥ युद्ध करणे निर्धारी ॥ रणस्तंभ घातला मल्वरी ॥ महास्थानी ॥ ८६ ॥ सत्व धैर्य मिळाले रणी ॥ हंकारा केला सकळ सैनी ॥ म्लेंछ ते हि आपुले पुरुषार्थपणी ॥ मिळाले युद्धी ॥ ८७ ॥ मोहोरे युद्धाचा प्रसंग ॥ म्लेंछासि होईल युद्ध ॥ श्रोते आईका सावध ॥ चित्त देवोनियां ॥ ८८ ॥ कृता त्रैता द्वापार कालि परियंत ॥ सांगितले जे क्षेत्रि वर्तले भुमंडळांत ॥ कलयुगि म्लेंछ–उत्पति सकाळित ॥ सांगितलें ॥ ८९ ॥ हे पुराणिची कथा ॥ स्वयें वदला ऋषिताता ॥ महेशें कथिलें मुळावस्ता ॥ पार्वति प्रती ॥ ९० ॥ तें उच्छिष्ट मज लाधलें ॥ ह्मणोन अन्वयें आणिलें ॥ भाविष्यार्थ कथिलें ॥ परउपकारा स्तव ॥ ९१ ॥ वंशउत्पातिकथा गहन ॥ प्राकृत वदलों परोपकारार्थ जाण ॥ ऐकतां हरति दोष दारूण ॥ श्रोतयांचे ॥ ९२ ॥ इति श्रीचिंतामणिकौस्तभपुराणे ईश्वरपार्वतिसंवादे वंशाविवंचनकथानाम तृतियोध्यायः ॥ ३ ॥

समरंगणि मिळाले समस्त ॥ आले म्लेंछ हि बहुत ॥ सिष्टाई–पत्रें प्रविष्ट होत ॥ येकमेकां ॥ १ ॥ धीःकारोन ह्मणति म्लेंछासी ॥ जयो नाहि रे तुह्मासी ॥ नीःपात तुमचिया वंशासी ॥ होईल येथे ॥ २ ॥ तुह्मी दुराचारि दुर्जन ॥ युद्धि कापोन रे तुमचि मान ॥ या उत्तरासि अनुमान ॥ नाहि तिळभरी ॥ ३ ॥ अरण्यी मिळालि चतुस्पदें ॥ मृग रिस करिती गद्यपद्यें ॥ हें चडेल काये दुर्बुधें ॥ म्लेंछमंडळी ॥ ५ ॥ तुह्मा उपमा कायेसि दिजे ॥ जैसि वनिचीं सावजें ॥ धरोनि शुंडादंड गजे ॥ पिळोनि टाकिजेती ॥ ६ ॥ तुह्मी असा रे आपुला भुवनी ॥ नांदा रे सर्व सोहिरे मिळोनी ॥ सिंहनाद नाईकीला कर्णी ॥ तवं परियंत अतुर्वेळि वडिवार ॥ ७ ॥ स्वांवा जवळि रक्षणाईत ॥ ठेविले असति बहुत ॥ परसैन्याचा करिती अनर्थ ॥ ह्मणोनियां ॥ ८ ॥ आणि निती तरि ऐसि असे ॥ शस्त्रार्थि सांगितलि दिसे ॥ स्तंभ पुरला मग रात्रदिवसे ॥ सांडो नये ॥ ९ ॥ जवं युद्ध उभयदळि नाहि आरंभलें ॥ तवं परियंत पाहिजे स्तंभासि रक्षिलें ॥ ह्मणोन टाणे ऐसें बसविलें ॥ महाराजयाने ॥ १० ॥ तवं येके रात्रि जालें अपुर्व ॥ देवतें तेज सांडोनि गेलिं सर्व ॥ मध्ये रात्रि ह्मणोन रायें गर्व ॥ व्यर्थ धरिला असे ॥ ११ ॥ येश नाहिं आपुला बाही ॥ म्लेंछासि जयो पाही ॥, रायाचा गर्व काई ॥ ह्मणोन सिद्ध होये ॥ १२ ॥ वाग्वाणि वचनें उमटती ॥ रक्षणाईत श्रवणि आईकती ॥ देव्या जालि बोलती ॥ तें परियेसा तुह्मी ॥ १३ ॥ रायें काये हो आरांभिलें ॥ वोखटें बळत्कारें आंवतिलें ॥ दैवतें तेज टाकिलें ॥ तेथे राखणे काय ॥ १५ ॥ जैताचि न धरावि आस ॥ संग्रामाचा सांडावा मौरस ॥ यैसे कुळदेव्या बहु उदास ॥ बोलिला ते समई ॥ १६ ॥ यैसें बोलिली कुळदेवता ॥ रणभुमि येश न दे सर्वथा ॥ ह्मणोन तुकितसे माथां ॥ वेळोवेळा ॥ १७ ॥ बहुत जाले कासाविस ॥ ह्मणे ब्रह्मनी धरिला म्लेंछवेश ॥ अनाचार घडला विशेष ॥ अवनि वरी ॥ १८ ॥ तदुपरि काये वर्तमान वर्तला ॥ तो पाहिजे

श्रवण जाला ॥ युक्तार्थ असे कथिला ॥ प्राकृत वाणी ॥ १९ ॥ राजा राजधानि बैसला ॥ प्रधान मुख्य पाचारिला ॥ समर्थी सह वर्तमान मांडिला ॥ आला च ते प्रसंगी ॥ २० ॥ तुर्क तरि येवोन बैसला असे ॥ तयाचें बळ तरि विशेष ॥ आणि श्रीवाशिष्ट वर्जोनियां बहुवसे ॥ गेला असे ॥ २१ ॥ हे तरि दुरात्म गौ-घातकी ॥ चांडाळ महापातकी ॥ ह्मणोनि युद्धी मिळाले तवकी ॥ धैर्य धरोनियां ॥ २२ ॥ जरि वर्जिले श्रीगुरुरायें ॥ परंत नरा युद्धी मांडिता राज्यसंप्रदायें ॥ तरि क्षेत्रधर्म निरार्थेसि जाये ॥ हांसति पूर्वज ॥ २३ ॥ ऐसा अवघियांचा मनोरथ ॥ युद्ध करणे यथार्थ ॥ मग रायें पाठविला लीखितार्थ ॥ युध्दासि सीध्द व्हावें ॥ तुमचि आर्त पुरवों आजी ॥ २४ ॥ राजा युध्दी प्रवर्तेल ॥ महामार्गी मिसळतिल ॥ जय निर्जय हा द्वैतभाव ॥ ॥ ह्मणोन सीष्टाचार करावा ॥ २५ ॥ ऐसें पत्र सुमध प्रधान ॥ जेथे तुर्काचे पडिलें सैन्य ॥ नगराचे वामाभिधान ॥ पुरनगर असे ॥ २६ ॥ तेथें माहामद ब्रह्मअवतार ॥ स्थिरावला जैसा डोंगर ॥ तेथें प्रधान गेला सत्वर ॥ पत्र दीधलें तयासीं ॥ २७ ॥ देखिलें सुमध प्रधानासीं ॥ भाषणार्थ केला तयासीं ॥ मानवला महामद मनासी ॥ लिखित पाहोनियां ॥ २८ ॥ येसा लीखितार्थाचा अर्थ ॥ वाचितां असे हांसत ॥ बहु हास्य करोनियां ह्मणत ॥ सुखें असा ॥ २९ ॥ तुह्मी गाडिला रे रणखांबु ॥ युध्द करों ह्मणतो तुमचा प्रभु ॥ शरकांडियेन ॥ भुमिनभु ॥ सन्मुख उभें राहावें ॥ ३० ॥ रायाचें पाहिजे महि-मान ॥ सुखें युध्द करा दारुण ॥ उभयतां हातसे भापण ॥ तवं प्रधान ह्मणे ॥ ३१ ॥ आह्मि आमचें राज्य करित असतां ॥ तुह्मी काय ह्मणोन आणिता अहंता ॥ नगरासि घेरा देवोनि सभोंवता ॥ अतिघाता प्रवर्तलेती ॥ ३२ ॥ रण-भुमि समरंगाणि धडमुंडा होइल विखुरणी ॥ उभयता माजि धणी ॥ होईल भुतांची ॥ ३३ ॥ ऐसें ह्मणोन प्रधान निघाला ॥ आपुल्या मंळिकारा माजि आला ॥ तयासि वृतांत सांगितला ॥ नेम जाला जी युध्दाचा ॥ ३४ ॥ युध्दा-चा जाला निश्चये ॥ युध्द करणे नीःसंशये ॥ तुर्काचा गर्मभाव काये ॥ पुढे उमिर कायेसा ॥ ३५ ॥ मग समस्त जाले संन्निध ॥ अश्वारुढ प्रधान सुमध ॥ तैसा प्रभुकुळि समंध ॥ आपुला ठाइं आरंभिला ॥ ३६ ॥ रायें विचारिलें यकाधें स्थान ॥ देवगिरी असे प्रमाण ॥ तें स्थळ महानिधान ॥ द्वीतिये न्याईं ॥ ३७ ॥ पवित्र देखिला देवगिरी ॥ तेथे आले सर्वक्षेत्री ॥ जैसे अष्टदिशा दिग्गजगिरी ॥ डौरले असती ॥ ३८ ॥ तवं विद्युलता कडाडिली ॥ तडकातडाकि स्फूरली ॥ अशुभ वर्तले ऐसि बोली ॥ समस्त दुखवले ॥ ३९ ॥ मग करोनियां पुजन ॥ फळि पुष्पी नानाविधान ॥ स्तविली अन्योन्य ॥ भावें करोनियां ॥ ४० ॥ तवं कुळ-देवता आली ॥ मध्येरात्रि उभी ठेली ॥ ह्मणे बोवटें जालें भली ॥ गति नव्हे ॥ ४१ ॥ राखणाईत होते चतुर ॥ ते ह्मणति माते कां जालिस निष्ठुर ॥ माझें न चले रे तिळभर ॥ हरीहरां पुढें ॥ ४२ ॥ युध्द होईल दारुण ॥ होईल

रणकंदन ॥ भाके गुंतला त्रिनयन ॥ मी येकली ॥ ४३ ॥ माझें न चले कांहि बळ ॥ म्लेंछा कडे तो हि गोपाळ ॥ होईल हलकल्लोळ ॥ अशुध्द वाहेल भडभडां ॥ ४४ ॥ ऐसि कुळदेवी वदली ॥ हरिहराचि जालि येकजुळी ॥ मी पडिलों निराळी । माझें न चले तयां पुढा ॥ ४५ ॥ आतां युध्द होइल समरंगणी ॥ सूर्यवंशि क्षेत्रि भीडातिल रणी ॥ तुर्कांचि पुरेल आयणी ॥ भूभंडळाचा ठाई ॥ ४६ ॥ उठा रणशिंधु माजेल ॥ अभिनव कथा वर्तेल ॥ व्यास वक्ता पुंण्यसिळ पुराणवित्पती ॥ ४७ ॥ इति श्रीकौस्तुभचिंतामणी ॥ कथिलें असे व्याकरणी ॥ तें बोलतां प्राकृतवाणी ॥ परिसा दत्तचित्ते ॥ ४८ ॥ छ ॥

पुढें रणकथाविस्तार ॥ संस्कृतवचनी कथि मुनेश्वर ॥ तो वशिष्ठवाक्याचा अनुसर ॥ आरंभिला म्या ॥ १ ॥ तेथे पातले म्लेंछसंभार ॥ युद्धी मिसळले रणरंगधिर ॥ नामांकित आले थोर थोर ॥ युद्धा लागीं ॥ २ ॥ रणखांब रायें स्थापिला ॥ युद्ध करों ऐसें ह्मणो लागला ॥ सैन्यासि निरोप केला ॥ सीद्ध असा वीर हो ॥५१॥ तुर्क निर्माण जाले बहुत ॥ वेष्टित चालिले अगणित ॥ पराक्रम दाविती विख्यात ॥ येकमेकां ॥ ५२ ॥ ऐसें सैन्य तुर्कांचें आलें चहु कडे मीमळलें ॥ शब्द टाहो फोडों लागले ॥ सांडा रे सांडा राज्ये ॥ ५३ ॥ तुह्मा राज्याचा काये लोभ ॥ निरार्थक उभारिला रणखांब ॥ जींवंत धरूं तुमचा प्रभु ॥ रामराजा ॥ ५४ ॥ ऐसे गर्वारूढ बोलती ॥ महायुध्दासि प्रवर्तती ॥ शस्त्रें हाति शोभति धावंती ॥ येकमेका वरी ॥ ५५ ॥ ऐसि मांडिलि झुंझारीं ॥ पाये न ठेविती माघारी ॥ रणखांब मांडोनि भीतरी ॥ प्रवेशले म्लेंछ ॥ ५६ ॥ उभयदळिं मांडला झगडा ॥ सैन्याचा होतसे रगडा ॥ तुर्क बैसोनियां दगडा ॥ आला समुद्रा मधोनी ॥ ५७ ॥ पुढें धावंति पायांचे मोगर ॥ दृष्टि पुढें नाणिती महाविर ॥ बळाढ्य प्रतापि महाक्रुर ॥ घाये निष्ठुर हाणती ॥ ५८ ॥ असीवार धावंति चहुकडे ॥ उल्हाळे घेति फेरोफेरि घोडे ॥ तीही पाईं उदाळति लवडसवडे ॥ विर गाढे तुर्क हे ॥ ५९ ॥ येक उठावले रथा वरी ॥जे पेटले महामारी ॥ हांका मारिती गजरी ॥ युध्दा माजी ॥ ६० ॥ तरवार वज्र कोठे ल्याले ॥ मोहाळि घालोनि मिरवले ॥ ते कैसे धाविंन्नल ॥ जैसें अग्निचे हुडे ॥ ६१ ॥ ऐसा म्लेंछभार दुर्घट ॥ त्या माजि माहामद श्रेष्ट ॥ गर्जो आरोहण करुन धीट ॥ मारित सांट चालिला जो ॥ ६२ ॥ नाचत येति परसैन्य–घोडे ॥ राउत त्या वरि बैसले मेहुडे ॥ आरोळि देति उचलोनि खांडे ॥ घ्या घ्या ह्मणोनी ॥ ६३ ॥ माहामद धनुर्वाडा ॥ संधान करित चालला गाढा ॥ उचलोनियां हातिं मेढा ॥ झडझडा टाकि बाण ॥ ६४ ॥ बाण टाकि अतिचपळ ॥ यका मागें येक प्रबळ ॥ दावितसे आपुलें बळ ॥ पारकियासीं ॥ ६६ ॥ प्रथम तो बळियाढा ॥ हरिहराचा वरदि गाढा ॥ तुळित हातिं मेढा ॥ धडधडा टाकि बाण ॥ ६७ ॥ आंता वर्तलें क्षेत्रियां कडे ॥ कैसे आले विर गाढे ॥ ते वर्णिजेति वाडें कोडें ॥ नामे तयांची ॥ ६८ ॥ येक आले गजा वरी ॥

येक आले रहंवरी ॥ कितेक ते अश्वा वरी ॥ ऐसे क्षेत्रि वर्णिले ॥ ६९ ॥ कोपा-च्या उल्का सांडिती ॥ महापुरुषार्थे डुलती ॥ वारु नाचवित येती ॥ राजमंड-पासीं ॥ ७० ॥ त्याच्या पराक्रमास नाहि मिती ॥ पुढें दिसे ठेंगणि क्षिती ॥ ह्मणति तुर्कांचि गणणा किती ॥ धोका कायेसा ॥ ७१ ॥ ऐसे उठावले रणके-सरी ॥ वस्त्रें ल्याले परोपरी ॥ टिळे माळा नाना कुसरी ॥ वरिल्या देही ॥७२॥ टिळे रेखिले कुसरी ॥ चंदनमीश्रित नाना परी ॥ सुगंध केशरि नाना परी ॥ शोभती ॥ ७३ ॥ चंदनचुवा आणि बुका ॥ शरीरी लेपिला बहु निका ॥ वस्त्रा-ळंकार केशरि देखा ॥ केले ते समई ॥ ७४ ॥ यैसे आले व्येष्टित फौजा ॥ शस्त्रास्त्रिं तुळिती भुजा ॥ समस्तीं नमस्कारिला राजा ॥ रामराणा ॥ ७५ ॥ ह्मणति आला हा अंतसमयो ॥ वर्जोनि गेला आह्मा श्रीगुरुराव ॥ परि युध्द न सांडावें ऐसा भावो ॥ सत्यार्थ चि करावा ॥ ७६ ॥ रामदेवराजा ह्मणे सर्वासी ॥ प्रसंग योडवला दुर्जनासी ॥ रणवट बांधणे कवणासी ॥ ऐसें बोलिला ॥ ७७ ॥ मग पाहिलें सर्वां कडे ॥ प्रतापाचे जैसे मेहुडे ॥ बोलते जाले महावीर गाढे ॥ आज्ञा करणे आह्मासी ॥ ७८ ॥ तवं पाहिलें भुरदास—प्रभुसी ॥ वृध्दविष्णु गोत्र जयासी ॥ उपनाम वानठेकर तयासी ॥ काये ह्मणता जाला ॥ ७९ ॥ रणवट बांधणे हा तुह्मासीं ॥ आरूढावें उत्तम रथासी ॥ ऐसें ह्मणोनियां तयासी ॥ गौर-विलें बहुतेक ॥ ८० ॥ कितेकासि दीधले तोडर ॥ यैसे नावाजिले विरें विर ॥ प्रतापाचे जैसे डोंगर ॥ आरूढले वहनी ॥ ८१ ॥ शस्त्राचे घेवोनियां भार ॥ मुखीं ह्मणति मर मर ॥ माहामदा रणी पडो रे सिर ॥ तत्काळ धरणी ॥ ८२ ॥ येक क्षेत्रि महाधनुर्धर ॥ येक प्रतापि महाशुर ॥ बरवा करोनियां शृंगार ॥ युध्दा लागि प्रवर्तले ॥ ८३ ॥ ऐसें उठावले महाथिट ॥ येकमेकांसि अलोट ॥ वाये वाजति साट ॥ तेण्हे भडभडां रुधिर वाहे ॥ ८४ ॥ तेणे जाला हाहाकार ॥ रणि मांडला महागजर ॥ विरे विर पडले थोर ॥ मिरवे तोडर चरणि पैं ॥ ८५ ॥ खाखाईल्या रणमोहोरी ॥ वाजताति रणभेरी ॥ नाद उमटला अंबरी ॥ ब्रह्मकटाह होतसे ॥ ८६ ॥ मांदळा दिधला वावो ॥ नाद अतिशयें पाहा हो ॥ हा चि त्याचा प्रभावो ॥ गुस टावो दाखविला ॥ ८७ ॥ लागले डफांचे झणत्कार ॥ नाना वाद्यांचे गजर ॥ काहाळा वाजति गंभिर ॥ तेण्हे वीर धांवती ॥ ८८ ॥ जीवि-त्वाची नाहि आस ॥ मृत्यासि जाले उदास ॥ महाउग्र सूर्यवंश ॥ क्षेत्रि दारुण ॥ ८९ ॥ नाचतसे रणधेंडा ॥ सीरे होत सेर गण्डा ॥ येक धरोनियां सोंडा ॥ हस्ति पेलिती ॥ ९० ॥ शस्त्रें वाजति सणसणा ॥ बाण सुटती झणझणा ॥ तुर्क बहुत आले रणा ॥ मृदघटप्राये ॥ ९१ ॥ क्षेत्रिवांशे राज्यधर ॥ महामारि रण-रंगधिर ॥ युध्दी भिडति तुर्क अश्वार ॥ येकमेकां ॥ ९२ ॥ माजले रणकेसरी ॥ कुंजर घालिती उदरी ॥ ऐसि होतसे झुंझारी ॥ महामारि मीसळले ॥ ९३ ॥ गर्जति कोपाच्या बळें ॥ घाव हाणति महास्ळें ॥ रणा माजि देति उफाळे ॥

वेळोवेळा ॥ ९४ ॥ पाचारिलें तुर्का आमदासी ॥ क्रोधें गिळों शके आकाशी ॥ तेथे तु कोण मज पुढा होसी ॥ अमंगळा पापिया ॥ ९५ ॥ उडगणा माजि शशी ॥ तैसा रामदेवराजा रणमहिसी ॥ वर्षला अमित्य बाणासी ॥ तुर्का वरी ॥ ९६ ॥ घाव हाणाति नगारा ॥ भेरिया वाजति सैरावैरा ॥ तेणे पडिला भेदरा ॥ म्लेंछासी ॥ ९७ ॥ तवं धाविनला हुशैन ॥ बंधुसि आला टाकोन ॥ मांडलें युध्द दारुण ॥ रणभुमिसा ॥ ९८ ॥ दोन्हि येकवटले सोहोदर ॥ पराक्रमे अतिसुंदर ॥ रणी महादुर्धर ॥ आड घातलें तेही ॥ ९९ ॥ हसनाचा यावा सांभाळिला ॥ समुखें वरिच्या वरि तोडिला ॥ आपण फिरोन पाचारिला ॥ धिरा राउता ह्मणोनी ॥ १०० ॥ दोघां मांडलें निर्वाण ॥ सणसणा वाजति धनुष्यबाण ॥ मारिति अतिनिर्वाण ॥ येकमेकां ॥ १ ॥ ऐसें होतसे उभयता झुंज ॥ समुधाचा बाण जैसि विज ॥ नावेक हृदयांबुज ॥ दुखवलें जाणा ॥ २ ॥ तेणे वींधिला सुमध प्रधान ॥ मुर्छना आलि तया लागुन ॥ तं देखोन चित्र धावोन ॥ आला जवळी ॥ ३ ॥ चित्र ह्मणे हसनासी ॥ बहु मिरविता पाइकिसी ॥ जवं देखिला नाहि शशी ॥ तवं प्रकाश उडगणाचा ॥ ४ ॥ मातंगा वरि जैसा केसरी ॥ तैसा हुसेनासि क्षेत्री ॥ भयाभित होउनि वगर्त्री ॥ काळिमा चढली ॥ ५ ॥ मग चित्रें वधिला हुसेन ॥ सैन्या माजि प्रताप गहन ॥ पारके विर पळवोन ॥ चित्र विजय जाला ॥ ६ ॥ छेदिलें हुशेनाचें सिर ॥ रणतुरे बाजिनालि अपार ॥ तवं धाविनले महाविर ॥ माहांमद–तुर्काचे ॥ ७ ॥ तेथे जाला आवर्त ॥ येकमेकांते पाचारित ॥ हलकालोळ रणात ॥ मांडला तथे ॥ ८ ॥ माहांमदाचा बाप अह्ली ॥ सवा मणाचि फिरंग तोळिली ॥ हाहाकारें बोंब केली ॥ ह्मणे हारपलें पुत्र माझें ॥ ९ ॥ यैसे दोनि वधिले सहोदर ॥ महापराक्रमि अह्लिचे कुमर ॥ रणि पडले ह्मणोनि उत्तर ॥ स्त्रियेसिं काये द्यावें ॥ १० ॥ यैसा भयाचकित जाला ॥ युध्दाचा प्रसंग सांडिला ॥ पाहातां संग्रामि आटला ॥ नवलक्ष दळभार ॥ ११ ॥ देवगिरीदगडातळवटीं ॥ संव्हार जाला जीवयातीं ॥ नवलक्ष्याचि गणणा समस्ती ॥ जाली देवा ॥ १२ ॥ भुरदास निवटला रणांगणी ॥ तयाचा पुत्र दुखवलासे कर्णी ॥ तुर्का माहांमदासी निर्वाणी ॥ महायुध्द जालें ॥ १३ ॥ बहुत लोटले नावाणिक ॥ मग चित्र लोटला सेनानायक ॥ त्याणे पळविले पारके पाइक ॥ भुरदासपुत्रें ॥ १४ ॥ महाक्षेत्रि पडिले समरंगणी ॥ माहांमदाचि पुरलि आयणी ॥ मग गेला रण सांडोनी ॥ आपुले सैन्या माजी ॥ १५ ॥ मग समस्त क्षेत्रि बळवंत ॥ डोरले जैसे वसंत ॥ बळें चालिले मारित ॥ सैन्य म्लेंछाचें ॥ १६ ॥ विंधिती बाण निर्वाण ॥ दुश्चित म्लेंछाचें मन ॥ मग धरिला तुर्क दारुण ॥ महाविर ॥ १७ ॥ मग जाला हाहाकार ॥ जीवें धरिला महाविर ॥ धरिलिया वरि रणक्षेत्र ॥ जालें येथे ॥ १८ ॥ ऐसें युध्द जालें निर्वाणी ॥ सैन्य पाडिले येक क्षोणी ॥ तो विस्तार लीहितां वाग्वाणी ॥ विस्तारेल अति पैं ॥ १९ ॥ व्यास

वक्ता संस्कृती ॥ कथा बोलिला यथास्थिती ॥ ते मी वदलों प्राकृती ॥ अज्ञान-
यागें ॥ २० ॥ पुनरपि तो माहामद ॥ क्षेत्रिया पासोन जाला हस्तगत ॥ मिळाला
आपुलिया दळा आंत ॥ स्वसंगति म्लेंछासी ॥ २१ ॥ ऐका श्रोते यथापुर्वक ॥
कथा सांगितली सकळित ॥ मोरे होणार गत अगणित ॥ महिमा देवाची ॥२२॥
असो मिळोनियां आपुले दळीं ॥ बुध्दी केलि बरवी ॥ मेळविले पुनरपी ॥ महा-
म्लेंछ ॥ २३ ॥ मग केला आपुला निश्चये ॥ युध्दी घेणे आह्मासिं जये ॥ ह्मणोन
उठावले महाबळिय ॥ क्षेत्रियां वरी ॥ २४ ॥ मारणे किंवा मरणे ॥ मागे कोण्हि
न पाहाणे ॥ युध्दासिं मीसळणे ॥ महाविर हो ॥ २५ ॥ वाजिल्या भेरि तुतारे ॥
रणसींगे अपारे ॥ हांका मारिती गजरें ॥ घोर शब्द होतसे ॥ २६ ॥ तैसे च
क्षेत्रि मिळाले ॥ दोन्हि भार आदळले ॥ महामारि पेटले ॥ येकमेकां वींधिती
॥ २७ ॥ येश म्लेंछासिं आलें ॥ क्षेत्रियांचे दळ आटो लागलें ॥ रामरायासी
वधिलें ॥ माहामदें ॥ २८ ॥ तेथे जाला हाहाकार ॥ रणी पडिला महाविर ॥
ईतर ते हि थोर थोर ॥ मृत्यु पावले ॥ २९ ॥ पळापळ सुटलि सैन्यासी ॥ म्लेंछ
प्रवर्तले महामारेसी ॥ प्रेतें नाचति रणभुमिसी ॥ सीरे उसळती ॥ ३० ॥ अशुध्दे
चालिला पूर ॥ दिवसा पडिला अंधःकार ॥ धरणी महाशब्द भुभुःकार ॥ शेष
दचकला ॥ ३१ ॥ दिशा चक्र भयानक ॥ क्षेत्रि पडले असंख्यात ॥ ईश्वरि इछा
यथार्थ ॥ रुषिभाषित ॥ ३२ ॥ म्लेंछासि आला जयो ॥ क्षेत्रि पावले पराभवो ॥
युगप्रमाण अन्वयो ॥ सहजें चि आला ॥ ३३ ॥ ऐसि जालि शांती ॥ तृप्त पावली
भुतयाती ॥ म्लेंछ आपुले बळें राज्यें घेती ॥ क्षेत्रियांचीं ॥ ३४ ॥ मोहोरे होणार
यकाकार ॥ म्हणोनि म्लेंछासि आधिकार ॥ वशिष्ठ सांगोनि गेला महाथोर॥ सूर्यवं-
शासी ॥ ३५ ॥ ऋषिभाषित यथार्थ ॥ भविष्योत्तरि कथिलें सत्यार्थ ॥ रुषि वक्ता
पुंण्यमूर्त ॥ यथानुक्रमे ॥ ३६ ॥ तें उचिष्ट मज लाधलें ॥ ह्मणोन अन्वयि आणिलें ॥
भविष्यार्थ बोलिले ॥ सत्यमेव ॥ ३७ ॥ प्राकृत वदलों यथानिती ॥ पुराणे मीळति
संमती ॥ शैयाद्रिखंडी पुणती ॥ भाषित केलें ॥ ३८ ॥ ब्रह्मोत्तरखांडिची कथा ॥
अन्वयें आणिली यथार्था ॥ श्रोते ऐकावि स्वात्महिता ॥ पुर्वउत्पन्नता यावत्
प्रळये ॥ ३९ ॥ मी अज्ञान मुढ मंद ॥ अन्वयि बोलिलों प्रसिध्द ॥ क्षमा मागतों
शब्दोपशब्द ॥ निवडोनि घ्यावा ॥ ४० ॥ आतां विनती सर्वांसी ॥ क्षमा मागतों
तुह्मा पासी ॥ वेळोवेळा चरणासी ॥ लागेन सहजें ॥ ४१ ॥ भगवान् दत्त म्हणे ॥
श्रोत्यासि विनवी कृपापणे ॥ संपुर्ण ग्रंथ येथोन ॥ म्या केलासे पूर्ण पैं ॥ ४२ ॥
इति श्रीचिंतामणिकौस्तुभपुराणे ईश्वरपार्वतिसंवादे वंशविवंचनकथानाम चतुर्थो-
ध्यायः ॥ ४ ॥

श्रीगणेशायनमः ॥ स्वस्त श्रीनृपविक्रमार्कसमयांति संवत ५७४ माहे फाल्गुन
शुद्ध ९ रविवार ते वर्तमानि माहाराज राजाधिराज सिंहासनमंडित सिंहिसंग्रामति-
लअरीरायविभांड श्रीसवीतावंशभुपाति पाठाराज्ञांतिसमांधि मुळपुरुष रामराजा ॥

गोत्र भारद्वाज ॥ कुळदेवी प्रभावती ॥ उपनाम राणे ॥ त्या पासोन त्रिपाळराजा ॥ त्याचा पुत्र भानराजा ॥ तयाचा पुत्र त्रिबक-राजा ॥ तयाचा पुत्र गोविंदराजा ॥ तयाचा कृष्णराजा ॥ त्याचा वांशीक राजा रामदेवराज ॥ त्या रामदेवाचें राज्य घटिका चहु मध्यें ४ सुलतान आलावदिनाने घेतलें ॥ सेवटि रामदेवरायासिं पराभाविलें ॥ तो रामदेवराजा व आणिक राजे देशोदेशिचे ॥ सूर्यवंशि तथा सोमवंशि ॥ राया समागामि पैठाणि आले ॥ तेथे राजधामि राहिले ॥ त्या रामदेवरायाचा जेष्टपुत्र केशव देवगिरी किल्यावर सिंहासनारुढ केला ॥ द्वीतिये पुत्र राजा बिंब उदयपुरासि स्थापिला ॥ तृतिय पुत्र प्रतापशा अलंदापुर पाटाणि राज्याधिकार दिधला ॥ येसिया प्रकारें आपले समुदायें ज्याचा तो पुरषार्थं राहिला तदनंतरे शालि—वाहन—शके १२१० मध्यें पैठणास सुलतान आलावदिन याणे चाल करोन युद्ध केलें ॥ तेथे हि रामदेवराजा तथा आणिक सोमवंशि राजे थोर प्रभु पराभवातें पावले ॥ तो वर्तमान देवगिरीस श्रुत जाला ॥ त्याणे तो किल्ला बळकावोन आपले पुरुषार्थे राहिला ॥ तदनंतरें उदयपुरास राया बिंबास वर्तमान श्रुत जाला ॥ तेथोन त्याणे चाल करोन गुजराथ काबिज केली ॥ प्रांत मालेरमोलेर नंदन-बारे दाहिठें केशवपुर वडानगर पावेतों पावले ॥ आपलें ठाणे बैसविलें ॥ आणि प्रतापशा हा कनिष्ट बंधु ॥ सन्निध राजगुरु हेमाडपंत समवेत अलंदापुरास आला ॥ तदनंतरे स्वल्पादिनी राजा केशवराव शांत जाला ॥ त्याचा पुत्र रामदेवराव गिरिस राहिला ॥ मग राजा बिंबाने शालिवाहन शके १२१६ मध्यें चाल केलि ॥ आणि गुजराथ प्रांता होवोन अहिनळवाडा पुर-पाटण दक्षणप्रांति देश विलाइत नाइकि या पैकि ठाण-कोकण माहिम पावे तवं काबिज करोन परतापुर राज्यधाम द्वादश राजे सूर्यवंशि आणि २४ राजे सोमवंशि आणि सेनासमुदाये व सेवकजन आणि नवखुमे शेषवंशि आणि सेनासमुदाये राहिला ॥ रायाचे प्रथम राणिचें नावं नागरसिद्धि ॥ द्वितिये स्त्रिचें नावं गीरिजा ॥ जेष्ट पुत्राचें नाम प्रतापशा ॥ कनिष्ट पुत्राचें नाम पुरशा ॥ त्याचा जन्म प्रतापपुरास जाला ॥ राजा संतोष पावोन धर्म रायें येक लक्ष दामाचा केला ॥ कित्येकांस वस्त्रें भुषणे दिधलीं ॥ तदनंतरें राया बिंबाने आपलें प्रधानास आज्ञा केलि ॥ माहिम बेटाचि वसाइत करविली ॥ वाडिया दात्ति लावाविल्या ॥ माहिमाचे द्वादश भाग केले ॥ मग कोणे येके दिवसीं शालिवाहन-शका १२२७ मध्यें राजा बिंब बाग पाहावयास माहिमा गेला ॥ तर ते माहिम जागा उत्तम रम्य स्थळ देखोन आज्ञा प्रधाना प्रत दिधली कीं येथे माहाल बांधावा ॥ आणि ते माहिमी बारा भागाचे बारा माहाल आपले वंशिकासि रायाने दीधले ॥ ते कोणकोण ॥ स्त्रियां समवेत नामाभिधानें गोत्रें उपनामें अनुक्रमे सांगतों ॥ त्याचि वगत ॥ काशेश्वर राजा राणि सावित्री काश्यप गोत्र उपनाम बनकेकर ॥ १ ॥ मदसुदन राजा राणि लक्ष्मी गर्ग गोत्र उपनाम मानपुर्वक ॥ २ ॥ विद्रुमसेन राजा राणि गोदावरि वशिष्ट गोत्र उपनाम वारा-

ढकर ॥ ३ ॥ विक्रमाकृति राजा राणि रखुमावती भारद्वाज गोत्र उपनाम राणे ॥ ४ ॥ सैन्यजित राजा राणि सुलजा गौतम गोत्र उपनाम ग्रामसमंध ॥ ५ ॥ सहस्त्रसेन राजा राणि भागिरथि पौलस्ति गोत्र धृतधृत ॥ ६ ॥ पौंडरिक राजा राणि भानुतनया जमदाग्नि गोत्र उपनाम मोळकर ॥ ७ ॥ अनंतकिर्ती राजा राणि संध्यावळी चेवनभार्गव गोत्र उपनाम भांडारिक ॥ ८ ॥ वासुदेव राजा राणि गौतमि अगस्ति गोत्र उपनाम वरोळि धाकटी ॥ ९ ॥ सुमंत राजा राणि सुलक्षणा कर्दम गोत्र उपनाम वैद्य ॥ १० ॥ माधाता राजा राणि विख्याती कौशिक गोत्र उपनाम वरोळि मोटी ॥ ११ ॥ देवदत्त राजा राणि कामाक्षा हरित गोत्र उपनाम वानठेकर ॥ १२ ॥ हे द्वादश राजे नावाणिक ॥ या ईतर दुसरे पुरी जे देशोदेशिचे काळप्रस्ताय मोडोन आपले कुटुंबि कोकाणि माहिमास आले सह परिवारि त्याचि नामाभिधाने तथा गोत्रें सूर्यवंश तथा सामवंश त्याचि वगत ॥ छ ॥ सूर्यवंशि राजे त्याचि वगत ॥ वृद्धविष्णु गोत्र मुरदास पुरी दुर्गदेशिचा राजा माहिमास आला ॥ १ ॥ पौतमाक्ष गोत्र भारद्वाज राजा मिश्रदेशिचा आपले कुटुंबि माहिमास आला ॥ २ ॥ पौतमाक्ष गोत्र भीमराज भीमाडीपुरा होवोन काळप्रस्तायें माहिमासि आला ॥ ३ ॥ मांडव्य गोत्र शिवराज सिळापुरा होवोन माहिमासि आला ॥ ४ ॥ कौंडण्य गोत्र भीमराज मायापुरा होवोन माहिमास आला ॥ ५ ॥ मांडव्य गोत्र शिवदास प्रभु सौराष्ट्र-देशा होवोन म्लेंछभयें माहिमास आला ॥ ६ ॥ विश्वामित्र गोत्र गोराखिराज गोदापुरा होउन कोकाणि आला ॥ ७ ॥ हरित गोत्र श्रीपतराम माहाजापुरा होवोन म्लेंछें धाड दिधलि ह्मणोन गोत्रि ईछित माहिमास आला ॥ ८ ॥ कौंडण्य गोत्र देवप्रभु पैठणा होवोन माहिमास आला ॥ ९ ॥ पौतमाक्ष गोत्र शामराज श्यामक्षेत्रा होवोन माहिमास आला ॥ १० ॥ शौनल्य गोत्र शिवराज साहाज्यापुरा होवोन महाम्लेंछ-भयें माहिमास आला ॥ ११ ॥ मांडव्य गोत्र त्रिंबकराज मायापुरा होवोन माहिमास आला ॥ १२ ॥ वृद्धविष्णु गोत्र त्रिंबक प्रभु त्रिवेणिनगरा होवोन माहिमास आला ॥ १३ ॥ वृद्धविष्णु गोत्र केशवराज त्रिवेणि-नगरा होवोन माहिमास आला ॥ १४ ॥ ब्रह्मजनार्दन गोत्र गणेशराज गोदावरि-पुरा होवोन माहिमास आला ॥ १५ ॥ विश्वामित्र गोत्र सिवराम दामोदर प्रभु द्वारके होउन माहिमास आला ॥ १६ ॥ वृद्ध-विष्णु गोत्र दामोदर प्रभु त्रिवेणी-नगरा होवोन माहिमास आला ॥ १७ ॥ ब्रह्मजनार्दन गोत्र गणेश प्रभु आपुले समुदायें कोकाणि आला नेवाळया होउन ॥ १८ ॥ वशिष्ट गोत्र केशवराव पैठणा होवोन माहिमास आला ॥ १९ ॥ वशिष्ट गोत्र नारायण प्रभु पैठणा होवोन माहिमास आला ॥ २० ॥ भारद्वाज गोत्र विष्णु प्रभु आपले परिवारि पूर्वदेशा होवोन माहिमास आला ॥ २१ ॥ वशिष्ट गोत्र केशवराव पैठणा होवोन माहिमास आला ॥ २२ ॥ ब्रह्मजनार्दन गोत्र त्रिंबकराव आपुले परिवारे पैठणा होवोन माहिमास आला॥२३॥

पौतमाक्ष गोत्र श्रीपतराव आपुले परिवारे पैठणा होवोन माहिमास आला ॥ २४ ॥ हरित गोत्र परशराम आपले परिवारे पैठणा होवोन माहिमास आला ॥ २५ ॥ वशिष्ट गोत्र गोपाळ प्रभु गोपुरा होवोन माहिमासि आला ॥ २६ ॥ वशिष्ट गोत्र कृष्णनाथ प्रभु पैठणा होवोन आपले समुदायें कोकणि आला ॥ २७ ॥ काश्यप गोत्र चंद्र प्रभु चिंचगावां होवोन कोकणि आला ॥ २८ ॥ अंगि–रस्य गोत्र दामोदर प्रभु दावाजिपुरी होवोन कोकणि आला ॥ २९ ॥ वशिष्ट गोत्र श्रीपद्मराव त्रिपुरा होउन माहिमासि आला ॥ ३० ॥

हे राजे सविता–सूर्यवंशि कोकणि आले शालिवाहन शके १२१५ ॥ या-उपर सोमवंशि त्यांचि वगत ॥ छ ॥ वशिष्ट गोत्र शीवदासराव पैठणा होवोन माहिमास आला॥ १ ॥ गोतम गोत्र + + + + + गोदापुरा होवोन कोकणि आला टाणियां राहिला ॥ २ ॥ नानाभ्य गोत्र नारायण त्रिंबल प्रभु कोकणि आला ॥ ३ ॥ नारायण गोत्र भुरदास तस्य सुरदास भीमापुरा होवोन कोकणि आला ॥ ४ ॥ कुशगोत्र त्रिंबक प्रभु त्रिपुरा नगरा होवोन ठाणे कोकणि आला ॥ ५ ॥ भीमराज प्रभु क्षवण गोत्र माहिमास आला तेथोन परतापुरी राहिला ॥ ६ ॥ कृष्णराज पारश्वत गोत्र मुहिलि राहिला ॥ ७ ॥ भीमराज निळापुरा होवोन गोतभ गोत्र तो नरसापुरि राहिला ॥ ८ ॥ भोज गणेश दातार भीमा-पुरा होवोन पारश्वत गोत्र मालाडिं राहिला ॥ ९ ॥ त्रिपाळराज हारित गोत्र तो कोकणि आला ॥ १० ॥ मुदास प्रभु आपुले समुदाये चिंचगावा होवोन पारश्वत गोत्र तो कोकणि आला ॥ ११ ॥ वशिष्ट गोत्र रायेण प्रभु कोकणि आला ॥ १२ ॥ या खेरिज दालिंद प्रभु सविता–वंशि तथा सोमवंशि बहुत कोकणि आले ॥ त्यांचि नामाभिधाने सांगतां ग्रंथ वाढेल ॥ ह्मणोन मुख्य जे काहि ते सांगितले ॥ या प्रकारे सेना–समुदाये व तथा सेवकजनसभवेत कोकणि आले ॥ या उपरांत पंधरा माहालाचि कमाविस राया बिंबाने केलि ॥ त्याची वगत ॥ माहाल मालाड गावें ५७ तेथे सेना ठेविली गज २ अश्व १२००२ ॥ माहाल मरोळ गावें ६६ तेथे सेना ठेविली गज २ अश्व १५०० ॥ त्या माहालि रायाचे सिंहासन ॥ तेथे टेकरि होति तेथे राजमाहाल नावं परतापुर ॥ व ३ माहाल ठाणे गावे १७ तथा ४ माहाल पांचनदि गावें ७७ तथा ५ माहाल तळोजें गावें १४ तथा ६ माहाला पूर्णे गावे २८ एवं माहाले ६ समंध गावें १३६ ॥ मिळोन सेना हस्ति ४ अश्व २७०० ॥ माहाल सायवन गावें २९ तेथे सेना हस्ति २ अश्व २७०० ॥ माहाल २ मणोर गावे ३९ तेथे सेना हस्ति ३ अश्व १००० ॥ माहाल ३ आसेरि गावें २४ तेथे सेना हस्ती २ अश्व १००० ॥ माहाल केळवें–माहिम ४ गावें २४ तेथे सेना ठेविली गज १ अश्व ९०० ॥ माहाल ५ तारापुर गावें १४ तेथे सेना हस्ति १ अश्व ५०० । माहाल ६ मांजे गावें १४ तेथे सेना हस्ति १ अश्व ५०० ॥ माहाल कल्याण ७ गावें १४

तेथ सेना हस्ति ५ अश्व २००० ॥ माहाल ८ चेंभुरकें गावें ८ तेथ सेना अश्व ५००॥ यवं गावें ४३५॥ य वितरिक माहिम बिंबस्थान माहालें १५ गावें ९ ॥ यवं ग्रामसंख्या ४४४ ॥ या नंतर हे गावं मोकासे सविता–वंश तथा चंद्रवंश आणि शेषवंश ॥ जे यांस राया बिंबाने दिघले॥ आणि कियेक गावं सरकारा मध्यें राहिले ॥ त्या मध्यें माहालें दोन मालाड आणि मरोळ त्यांचि वगत ॥ माहाल मरोळा खालि गावें ६६ ॥ त्या गावांचा उपज त्याचि वगत ॥ गावं मरोळास उपज सरकार–भात मुडे ३५८ त्यामध्यें राजभाग २५४ धर्म २९ सिळोतरें २७५ नगद दाम १४००० ॥ १ ॥ गावं कोंडिवटें उपज सरकार–भात मुडे १०३ राजभाग ८९ धर्म २८ सिळोतर २२४ नगद दाम १३०० ॥ २ ॥ गावं प्रतापपुर सरकार–भात मुडे ५३ राजभाग मुडे ३५ धर्म मुडे १८ नगद दाम १४०० ॥ ३ ॥ गावं दुळधर सरकार–भात मुडे १९ राजभाग मुडे १८ धर्म मुडे १ नगद दाम ३०० ॥ ४ ॥ मुळगांव सरकारभात मुडे ८८ राजभाग मुडे ५५ धर्म १५ सिळोतर १८ नगद दाम ९०० ॥ ६ ॥ कडपें सरकारभात मुडे ४३ राजभाग मुडे १५ सीळोतर १८ ॥ ६ ॥ सांखि सरकारभात मुडे ५३ राजभाग ४५ धर्म ८ नगद दाम ९०० ॥ ७ ॥ + + + + + + + + + मुडे ५ सिळोतर १८ नगद दाम ९०० ॥ ८ ॥ तुंगवें सरकारभात मुडे ५९ राजभाग ४९ धर्मदातृत्व २ सळोतर २८ नगद दाम १४०० ॥ ९ ॥ वरवेंस सरकार–भात मुडे ३२ राजभाग मुडे ३२ ॥१०॥ पोवै सरकार–भात मुडे ६८ राजभाग–मुडे ५६ धर्म ४ सळोतर ८ नगद दाम ३०० ॥ ११ ॥ तिरीदाद सरकारभात मुडे ७१ राजभाग ४५ धर्म ८ सळोतर १८ नगद दाम १००० ॥ १२ ॥ पस्पौलि सरकारभात मुडे ११२ राजभाग ९५ धर्म ४ सिळोतर १३ नगद दाम २१०० ॥ १३ ॥ व्याड सरकारभात मुडे १३९ धर्म ६ सीळोतर २४ नगद दाम १५०० ॥ १४ ॥ गुंडगावं सरकार–भात मुडे ४७ राजभाग ४५ धर्म ४ नगद दाम ३०० ॥१५॥ तुळसि सरकार–भात मुडे १५ धर्म १ सळोतर २ राजभाग १४ नगद दाम ५४ ॥ १६ ॥ साहि सरकारभात मुडे १९८ राजभाग मुडे १९ ॥ १७ ॥ आसनपं सरकार-भात मुडे १३ नगद दाम ७४ ॥ १८ ॥ मुहिलि सरकारभात मुडे ७७ राजभाग ३५ धर्म ५ सळोतर ७ नगद दाम ९०० ॥ २० ॥ साहार सरकारभात मुडे १५४ राजभाग ११२ धर्म १७ सळोतर २५ नगद दाम १४०० ॥ २१ ॥ कुराळें सरकारभात मुडे १५९ राजभाग १३५ धर्म ७ सीळोतर ७ नगद दाम १४०० ॥ २२ ॥ कल्याण वजदार चंद्रप्रभु सरखेल भात मुडे १२७ राजभाग १४५ धर्म १९ सीळोतर ३३ नगद दाम १३०० ॥ २३ ॥ किरोळ सरकार–भात मुडे ६५ राजभागमुडे ६५ नगद दाम ३५० ॥ २४ ॥ कोंपरें वजदार नारायणप्रभु गोत्र वशिष्ट भात मुडे ९४ राजभाग ७५ धर्म ११ सीळोतर २८

नागद दाम ३२९ ॥२५॥ चेंभुर सरकारभात मुडे १२३ राजभाग मुडे ९५ धर्म ४ सीळोतर २४ नगद दाम १३०० ॥ २६ ॥ गावं घाटलें सरकारभात मुडे २४।९ राजभाग २४।९ ॥ २७ ॥ गावं बोरलें सरकारभात मुडे ९७ राजभाग ७४ धर्म १ सीळोतर २२ नगद दाम ३०८ ॥ २८ ॥ गावं देवनरें सरकारभात मुडे ५७ राजभाग मुडे ४२ धर्म ३ सीळोतर १२ नगद दाम ७०० ॥ २९ ॥ गावं मानि नागाचि सरकारभात मुडे ४०।८ राजभाग ३४ धर्म १।१८ सीळो-तर ५ नगद दाम २५० ॥ ३० ॥ गावं मानमोटि सरकारभात मुडे ६२४१२ राजभाग ५४ धर्म ४४१ सीळोतर ४ नगद दाम ९०० ॥ ३१ ॥ गावं मुमें सरकारभात मुडे १०८ राजभाग मुडे ५८ धर्म ५ सीळोतर ४५ नगद दाम ९०० ॥ ३२ ॥ मांडाळे सरकारभात मुडे ७४ राजभाग मुडे ४५ धर्म ५ सीळो तर २४ नगद दाम ९०० ॥ ३३ ॥ गावं नाळें सरकारभात मुडे २७ राजभाग मुडे २८ सीळोतर ३ नगद दाम ११०० ॥ ३४ ॥ गावं मांदुळ सरकारभात मुडे १२१ राजभाग ९४ धर्म ५ सीळोतर ३२ नगद दाम ९००० ॥ ३५ ॥ गावं अनिक सरकारभात मुडे ८५ राजभाग मुडे ६६ धर्म १० सीळोतर ९ नगद दाम ३२७ ॥ ३६ ॥ गावं माहादेवपुर सरकारभात मुडे ७।१४ राजभाग ७।१४ ॥ ३७ ॥ गावं विखरोळि सरकारभात मुडे ५२ राजभाग ३५ धर्म ४ सीळोतर १३ नगद दाम ६११॥३८॥ गावं हरियाळि सरकारभातभात मुडे ५१ राज भाग ४५ धर्म ३ नगद दाम ५४ ॥ ३९ ॥ गावं कानझुरें सरकारभात मुडे १४२ राजभाग १२८ धर्म ५ सीळोतर ९ नगद दाम ९२८ ॥ ४० ॥ गावं खोटसर सरकार—भात मुडे २३ राजभाग १४ धर्म ९ नगद दाम ७०० ॥४१॥ गावं भांडुप सरकार—भात मुडे ११५ राजभाग ९५ धर्म ६ सीळोतर १४ नगद दाम ११०० ॥ ४२ ॥ गावं नाउर सरकारभात मुडे ८४ राजभाग मुडे ५५ धर्म ८ सीळोतर २१ नगद दाम ९५० ॥ ॥ ४३ ॥ गावं मुळंद नाणेटोणे सरकारभात मुडे १२२ राजभाग ९३ धर्म ८ सीळोतर २१ नगद दाम १५०० ॥ ॥ ४४ ॥ गावं कोपरी सरकारभात मुडे १७ राजभाग १३ धर्म १ सीळोतर ३ नगद दाम १०० ॥ ४५ ॥ गावं सानप सरकारभात मुडे १९४८॥ राजभाग १९४८ ॥ ४६ ॥ गावं हजवडी सरकारभात मुडे २३ राजभाग १५ धर्म १ सीळोतर ३ नगद दाम २०० ॥ ४७ ॥ गावं चेंदणि सरकार-भात मुडे १२२ राजभाग १०३ धर्म ७ सीळोतर १२ नगद दाम ३००० ॥ ४८ ॥ गावं चन्हई पांचपारवाडी सरकारभात मुडे १३८ राजभाग १०३ धर्म ११ सीळोतर २४ नगद दाम ९०० ॥ ४९ ॥ गावं खोपेश्वर सरकार—भात मुडे ९४१८ ॥ राजभाग ९४८ ॥ नगददाम २५ ॥५०॥ गावं नांदोळीसिद्धेश्वर सर-कार—भात मुडे ११ राजभाग ९४१९ ॥ ५१ ॥ गावं चाळें सरकारभात मुडे ७८ राजभाग ६८ धर्म ५ सीळोतर ५ नगद दाम ५०० ॥ ५२ ॥ गावं वेळप

सरकारभात मुडे २२ऽ१२ राजभाग १ धर्म १ऽ१२ ॥ ५३ ॥ गावं मोगेत सरकारभात० नगद दाम २४०० ॥ ५५ ॥ गावं वाहुउणवळ सरकारभात १ऽ२१ राजभाग २२ऽ२१ ॥५६॥ गावं आपनळ सरकारभात मुडे ५९ राजभाग ४४ धर्म ३ सीळोत्तर १२ नगद दाम ७०० ॥ ५८ ॥ गावं वेउर सरकारभात मुडे ६५ राजभाग ६४ धर्म १ नगद दाम ५४ ॥ ५९ ॥ गावं वेगणसर सरकारभात मुडे ५८ राजभाग मुडे ५४ धर्म २४ नगद दाम १००० ॥ ६० ॥ गावं सानपें सरकारभात मुडे १४ नगद दाम ३३ ॥ ६१ ॥ गावं सितळेश्वर सरकारभात मुडे ३१ राजभाग ३५ सीळोतर १ नगद दाम १३० ॥ ६२ ॥ गावं माझिवडें सरकारभात मुडे ८८ राजभाग ७५ धर्म ४ सीळोतर ९ नगद दाम ४५० ॥ ६३ ॥ गावं तुरफें सरकारभात मुडे ३६ राजभाग २४ धर्म ३ सीळोतर ९ नगद दाम ३०० ॥ ६४ ॥ गावं कोळमेत सरकारभात मुडे ५७ राजभाग ५४ सीळोतर ३ नगददाम १२०० ॥ ६५ ॥ गावं कांवसर सरकारभात मुडे ६६ राजभाग मुडे ५४ धर्म ३ नगद दाम २१०० ॥ ६६ ॥ एवं गावें संख्या ६६ माझष्ट मिळोन गणित भात मुडे ४५५५ तथा राजभाग ३५८३ तथा धर्म ३३४ऽ४ तथा सीळोतरे ६३७ तथा नगद दाम १०३-९०० ॥ यवं वेरिज मरोळ माहालाचि वगतवार लिहिलि असे सही ॥ छ ॥ छ ॥

या उपर माहाल मालाडचा उपज त्याचि वगत ॥ छ ॥ माहाल मालाड व जमीदार श्रीपतराव गोत्र हरीत ॥ मालाड भात मुडे ४५५ राजभाग ३५७ धर्म ८ सीळोतर ९ ॥ १ ॥ गावं पाहाड वजदार कृष्णराव गोत्र कश्यप सरकारभात मुडे २५४ राजभाग १८० सीळोतर ७४ नगद दाम ३००० ॥ २ ॥ गावं आरें वजदार देवप्रभु गोत्र कौंडण्य सरकारभात मुडे १२७ राजभाग ११४ धर्म १३ सीळोतर ३ नगद दाम १३० ॥ ३ ॥ गावं वेडे वजदार नारायेण केशव प्रभु गोत्र कश्यप भात मुडे ४६ऽ१२ राजभाग ४५ सीळोतर १ऽ१२ नगददाम ४५ ॥ ४ ॥ गावं दिंडोसि ५ वजदार शामराव प्रभु गोत्र पौतमाक्ष भात मुडे ६६ऽ९ राजभाग ५३ सीळोतर १३ नगद दाम १५० ॥ ५ ॥ गाव चिंचवळी ६ वजदार नारायण केशवराव प्रभु गोत्र कास्यप सरकार—भात मुडे ३८ राजभाग ३४ धर्म १ सीळोतर ३ नग दाम ३११ ॥ ६ ॥ गावं बांदवड ७ वजदार रामराव सविप्रभु गोत्र सौनल्य जमा भात मुडे ९८ऽ१३ राजभाग ८५ऽ१७ धर्म ४।२१ सीळोतर ८।२७ नगद दाम ९०० ॥७॥ गावं गोरगावं ८ वजदार गोविंदराव नारायण प्रभु गोत्र स्यौनल्य जमा भात मुडे ११७ राजभाग १०९ सीळोतर ८ नगद दाम ९०० ॥ ८ ॥ गाव आंधेरी ९ वजदार त्रिंबक प्रभु गोत्र कुश जमा भात मुडे ४७ राजभाग ४४ धर्म ३ नगद दाम १३ ॥ ९ ॥ गावं आंबवली १० जमा भात मुडे १०२ राजभाग मुडे ४२ नगद दाम ६४ ॥ १० ॥ गावं वार्सी ११ जमा भात मुडे ११ नगददाम

५६००० ॥ ११ ॥ गावं गुंदवलि १२ वजदार त्रिंबकप्रभु गोत्र कुश जमा भात मुडे ६११८ राजभाग ५४५८ धर्म ७ नगद दाम १०० ॥१२॥ गावं आसणि १३ जमा भात मुडे १३ नगद दाम ३६००० ॥ छ ॥ गावं राजणफर १४ जमा भात मुडे १४ राजभाग १४ नगद दाम ६०० ॥ १४ ॥ गावं ईळेंविळें १५ वजदार नारायण प्रभु गोत्र वशिष्ट जमा भात मुडे १५१ राजभाग ११४ धर्म ३२ सळोतर ५ नगद दाम २००० ॥१५॥ गाव सिवपुरी १६ वजदार कृष्णराव गोत्र कश्यप जमा भात मुडे ६९८१८ राजभाग मुडे ५४ धर्म ६ सळोतर १८ नगद दाम ३१७ ॥ १६ ॥ गावं खाखमहादेवपुर १७ जमा भात मुडे २६ राजभाग २६॥१६॥ गावं वांदरे १७ जमा भात मुडे ३२९ राजभाग २५४ सळोतर ७५ नगद दाम ३६००० ॥ १७ ॥ गाव वासिरानके फेराडोंगर १८ व मुक्तेश्वर वजदार कृष्णनाथ गोत्र वशिष्ट जमा भात मुडे १४ राजभाग १४ नगद दाम ६४००० ॥ १८ ॥ गावं माजास १९ राजचाहुडी सरकारभात मुडे १७८ राजभाग ११३ धर्म ५६ सळोतर ९ नगद दाम २००० ॥ १९ ॥ गाव पाळ २० सरकार–भात मुडे २१ राजभाग २१ नगद दाम ३०० ॥२०॥ गावं मोगेर २१ वजदार देवकृष्णराव गोत्र भारद्वाज जमा भात मुडे १३० राजभाग १०७ धर्म १८ सळोतर ५ नगद दाम ३००० ॥ २१ ॥ गाव गंगाळे २२ वजदार जैत देशला उपज भात मुडे ३१८१८ राजभाग २५ धर्म ३८१८ सळोतर ३ नगद दाम ३०० ॥ २२ ॥ गावं भोवंणे २३ वजदार दामाजि मसाळची जमा भात मुडे ७८१३ राजभाग ७ धर्म फेरे १३ ॥२३॥ गावं ददाइ २४ सरकार–भात मुडे २५ नगद दाम २७००० ॥ २३ ॥ गावं पाटळे २५ प्रभव सरकार–भात मुडे ३३ राजभाग ३३ ॥ २४ ॥ गाव खार व भोईंवें २६ सरकार–भात मुडे १४ नगद दाम १४००० ॥ २३ ॥ गावं महड २७ सरकार–भात मुडे २७१ राजभाग मुडे २५२ सळोतर १९ नगद दाम १४३०० ॥ २७ ॥ गावं येरगळ २८ सरकार–भात मुडे १८० राजभाग १७५ सळोतर ५ नगद दाम ३०० ॥ २७ ॥ गावं तळवली २९ वजदार परशराम प्रभु गोत्र हरित सरकार भात मुडे ७५ राजभाग ६४ धर्म ११ नगद दाम १३०० ॥ २९ ॥ गावं दारवली ३० वजदार गोपाळ प्रभु गोत्र वशिष्ट सरकारउपज भात मुडे ८ ॥ ३० ॥ गावं माळवणी ३१ सरकार–भात मुडे १०६ राजभाग १०१ सळोतर ५ नगद दाम १०० ॥ ३१ ॥ गावं आगासीमलें ३२ सरकार–भात मुडे ८ नगद दाम १४००० ॥३२॥ गावं मणोरी ३३ सरकारभात मुडे १२२ नगद दाम १४००० ॥ ३२ ॥ गावं गोऱ्हाई ३४ सरकारभात मुडे १५८ राजभाग १५८ नगद दाम ३००० ॥ ३४ ॥ गावं उत्तन ३५ वजदार नारायण प्रभु गोत्र वशिष्ट उपज भात मुडे १८५८१८ राजभाग १५२ ॥१८ धर्म ८ सळोतर २५ नगद दाम ३४००० ॥ ३५ ॥ गावं काषवळी ३६ सर-

कारभात मुडे १५९ राजभाग १५२ धर्म २ सीळोतर ५ नगद दाम ३५०
॥ ३६ ॥ गावं चारोळ ३७ वजदार श्रीपतराव गोत्र वशिष्ट सरकारभात मुडे
१२१ राजभाग १०९ धर्म १२ नगद दाम १००० ॥ ३६ ॥ गावं आकुल-
वली ३८ वजदार त्रिंबकराव गोत्र वृद्ध–विष्णु सरकार–भात मुडे ७१ राजभाग
५८ धर्म १०८१८ सळिोत्तर २ नगद दाम १८५ ॥ ३८ ॥ गावं कुहार
३९ वजदार कर्णसेन भात मुडे २७।१३ राजभाग २७।१२ ॥ ३९ ॥ गावं
बोरोवळी ४० वजदार केशवप्रभु गोत्र वृद्धविष्णु सरकारभात मुडे ११६
राजभाग १०७ धर्म २ सळिोत्तर ७ नगददाम ३६५ ॥ ३९ ॥ गावं
सार ४१ वजदार नारायण प्रभु गोत्र वशिष्ट २८३।१४ राजभाग २०८८
१२ धर्म ३९८१७ सळिोतर ३५ नगद दाम ७००० ॥ ४१ ॥ गावं पोईसर
४२ वजदार नारायणराव गोत्र वशिष्ट सरकार–भात मुडे १४४।२२ राजभाग
१२८८११ धर्म ८८१५ सळिोत्तर ७८२२ नगद दाम २६८ ॥ ४२ ॥ गावं
मागाटण ४३ वजदार शिवराम दामोदर गोत्र विश्वामित्र सरकार–भात मुडे
१३२८१९ धर्म ११८ सळिोत्तर १४८१९ नगद दाम ४०० ॥ ४३ ॥ गावं
येकसार ४४ वजदार नामाजि काराणी यात घोडेल सरकार–भात मुडे २२।१२
राजभाग २२८१२ ॥ ४४ ॥ गावं पर्वतगोळी ४५ वजदार विष्णु प्रभु गोत्र
भारद्वाज राणे सरकार–भात मुडे९राजभाग मुडे ९ नगद दाम२०००॥४५॥ गावं
खाडि पारवळ४६वजदार विष्णु प्रभु राणे गोत्र भारद्वाज सरकार–भात मुडे०नगद
दाम २४००० ॥ ४६ ॥ गावं खाडि बागाची ४७ उपज खाडिचा ७०००
॥ ४७ ॥ गावं गोरदेव ४८ वजदार त्रिंबक प्रभु गोत्र ब्रह्मजनार्दन उपजतभात
मुडे ९२९ राजभाग ७५० धर्म ६६ सीळोतर ११३ नगद दाम १४०००
॥ ४८ ॥ गावं मुडवें ४९ सरकार–भात मुडे १२१ राजभाग १५६ नगद दाम
१५००० ॥ ५० ॥ गावं वोलणे ५० सरकार–भात मुडे ५८ राजभाग ५५
सळिोत्तर ३ नगद दाम ९४ ॥ ५१ ॥ गावं सानिवडेकासी ५१ वजदार दामो-
दर गोत्र वृद्ध–विष्णु सरकार–भात मुडे ११९८७ राजभाग ९८८७ सळिोत्तर
१४ नगद दाम ३७०० ॥ ५२ ॥ गावं मिरें ५३ वजदार सींधा शेषवंशि दामो-
दर पद पाटेल उपनावं येवखंडे कुळदेवत हीरबाई सरकार–भात मुडे ५३ राज-
भाग ४५ धर्म ३८८ सळिोत्तर ५ नगद दाम २६४ ॥ ५३ ॥ गावं दईसर ५४
वजदार ठाकुर देशले सरकार–भात मुडे ४८५८१३ राजभाग ४१९८१३ सीळो-
त्तर ५५ ॥ ५४ ॥ गावं वरसावें ५५ सरकार–भात मुडे ११०८१६ राजभाग
९८८७ धर्म ४ सळिोत्तर ८८९ नगद दाम ३०० ॥ ५५ ॥ गावं चेने ५६
सरकार–भात मुडे ७४८११ राजभाग ६४ धर्म ३ सीळोतर ७ नगद दाम
२००३ ॥ ५६ ॥ गावं संभुज ५७ सरकार–भात मुडे २३६८११ राजभाग
२०८४११ धर्म २३ सीळोतर ५ नगद दाम १०२५ ॥ ५७ ॥ गावं वडवळी

५८ सरकारभात मुडे १४५।२१ राजभाग १३२।९ धर्म ६।१२ सीळोतर ७ नगद दाम १०२५ ॥ ५८ ॥ गावं मोरवसी ५९ सरकार भात मुडे ५७ राजभाग मुडे ५७ ॥ ५९ ॥ यवं संख्या गांवाची ५९ ॥ ह्या गावांचे भात संख्या ७०२५८११ राजभाग ५९५६ धर्म २०७८२२ सळोतरें ७०७८१८ तथा नगद दाम ४०३४८५ ॥ येवं माहाले दोन मरोळ आणि मालाड ॥ मिळोन कुल बेरिज भात मुडे ११५८०८१२ तथा राजभाग ९५३४८२४ तथा धर्म ६४१८१६ तथा सळोतरें १३४४८१८ तथा नगददाम ५०७३८५ ॥ येणे प्रकारें मुलुक आबादान करोन राज्याचि बंदिस्त केली ॥ यैसेया प्रकारें राज्य करितां वरुषे ९ मा १ दिन १४ परियेंत राज्याचि कमाविस केली ॥ या उपरांत राजा बींब शांत जाला ॥ त्या उपर प्रतापशा हा रायाचा पुत्र जेष्ट राजकारभार करिता जाला ॥ शके १२२५ या मध्यें वर्शे २८ मास ३ राज्य केलें ॥ या उपर चंपावातिचा राजा केशवराव राणिचें नावं सुप्रभा प्रधान बुधसेन व राजपुत्र नागरशा हे सोहिरे ॥ प्रतापशा मेहुणा ॥ जाणोन वर्तत असतां होणार भाविस्य ह्या मेहुण्या मध्ये कलह—प्रारंभ उत्पन्न ( जाला ) ते सांगतों ॥ नागरस्याने पत्र मेहुण्या प्रतापस्यासि पाठविलें ॥ जर येडख मेहाळगड मला दीधला पाहिजे, आपण वस्ति धरीन ॥ तेधवां प्रतापशा नाकबुल गेला जर गड देणं नाहि कोण्हास ॥ सोहिरा पाउलें च्यार दुर आहे तवं सख्यत्व विशेष जाणोन समीप नसावें ॥ तैं वैर परस्परें वाढले ॥ परस्परें युद्ध प्रसंग वाढला ॥ तेधवां प्रतापस्यान विचार पाहातां नास दिसोन येतो ह्मणोन पत्र देवगिरी रामदेवरायास पाठविलें ॥ सवें मनुष्य पाठविता जाला ॥ बाळसेन, जयेसेन, नागोजी, तथा ठाणेकर, विकोजी हे पांच जण देवगिरीस गेले ॥ राया रामदेवासी भेटले ॥ सकळ वृतांत येथिचा श्रुत केला ॥ जर नागस्या निरार्थक वैरास प्रवर्तला असे ॥ तो सर्व वर्तमान आईकोन राजा रामदेवें आज्ञा जीवननायेक सावखेडकर सेनाधर सेनासहवर्तमानि त्यांसी राज—आज्ञा जाली जर स्वाहार व्हावें ॥ विडा देवोन रवाना केला ॥ तो वर्तमान नागरस्यास श्रुत चंपावति जाला ॥ ह्मणोन आपलि सेना सिद्ध केली ॥ तेधवां राया नागस्याचा पुत्र त्रिपुर—कुमर सिद्ध जाला जर पित्रुकार्यि आपण युद्ध करावें ॥ आज्ञा पित्याचि घेवोन चालिला ॥ ते वर्तमानि जीवननाईक माहोलिचे मैदानि ॥ दोघांसि आदळाआदळ जालि ॥ अकस्मात युद्ध थोरावले ॥ माहामारि पेटले ॥ युद्ध थोर जालें ॥ जीवन नाईक आणि हेमपंडित हे हारिस आले ॥ त्रीपुरकुमर विजय जाला ॥ रामदेवरायाचा पराजय जाला ॥ त्रिपुरकुमर येशेसि चंपावतिस आला ॥ राया नागरस्याने आनंद फार केला ॥ जर आह्मा रायां येश आलें ॥ हा वृतांत माहिमा राया प्रतापस्यासीं श्रुत जालें ॥ तेधवां आपुलें निजांग सैन्य सिद्ध सांगो पाठविलें ॥ द्वादश प्रभु नावाणिक पाचारोन त्यांसि बहुत मान्य केला ॥ त्या नंतर वानठेकरांला बहुत प्रकारें नावाजिलें

। ह्मणितलें जर आपलें सूर्यवंशि अपकीर्ति होये ऐसा प्रसंग जाणोन लज्जा ह्मणे ॥ तैसें चि सोमवंशियांसि सांगितलें ॥ आणि नावाजिलें ॥ तैसें च पत्र येरळकरांस पाठविलें जर सिवे शेषवंशि येश आहे तर या प्रसंगि आपुला पुरुषार्थ राखवावा ॥ ह्मणोन विडे दिधले ॥ त्या उपर कडु पालवण राउतांसि राज्यमान राया प्रतापस्यान दिधला ॥ त्याचि वगत ॥ गोन्हाईकरांस विराणे व सभे मध्ये विरगांठा ॥ तथा नाउरकरांस मंडपि काहाळा वाजवावि ॥ तें आणिकाचे मंडपि न वाजवावी ॥ तथा मांदेगांवंकरास नगारा दिधला ॥ तथा पस्पवळिकरांस व माहुलकरांस आणि कांधवळिकरांस अश्व दिधले ॥ आणि तोरडे बांधले ॥ तथा साहिकरांस चरणि वृंदे दिधलीं ॥ या परि मान्य देवोन सर्व समुदाय नागरस्यान सिद्ध केला ॥ इतक्यांत राया रामदेवान देवगिरि होवोन मनुष्यें अहिनळवाडा पाटणि शिवचापाटोर पाटिणासी पाठविलिं ॥ तेथ राजा जयसिंग त्यासि वृतांत श्रुत केला ॥ जर नागोजी तथा विकोजी तथा बाळसेन यांचा युद्ध घ्यावया पंडितराव पाठविला ॥ परंत ते हि पराजयो पावले ॥ त्या उपर नागरस्यान या प्रांते चढाव केला ॥ राजा प्रतापस्या हा आपले निज सेने सह--वर्तमान गगन-माहाला प्रत गेला ॥ सायेवन माहाल तेथे गगनमाहाल असे ॥ गड गगनमाहाल ॥ या प्रकारें राजा प्रतापस्या हारिस आला ॥ तदनंतरे जैतसिंग व रामदेवरायानें प्रताप वरोन राया नागरस्या वरि सैन्य रवाना केलें ॥ ते स्वाहार होवोन विसामागड मणोर माहालि पैलदेचा तांदुलवाडिस आले ॥ तेथ प्रतापस्या रायाचें सैन्य तथा जैतसिंगाचें तथा रामदेवरायाचें सकळ सैन्य येकत्र जालें ॥ माव करोन कटकबंद केला ॥ पुढे स्वाहार होउन नागरस्या वरि चाल केलि ॥ ते प्रतापपुरास आले ॥ ते समई आंधरि मध्ये युद्ध तुंबळ जालें ॥ अहिनळवाडा पाटकराचा परिवार पराजयो पावला ॥ प्रतापस्या रायाचा सर्व देश राया नागरसें भेदें घेतला ॥ राया नागरशा कडे देशले देसाये पाटेल पाटल्हारे खुमनासिर रयेत या सर्वांहि पूर्विच भेद केला होता ॥ तेणे करोन प्रतापस्या रायाचा पराजयो पावला ॥ त्या वरोन राया नागरस्याने सर्वा पाटला देसायाला रयेतिला उचित देणे दिधलीं ॥ देसायांस अश्व दिधले ॥ कोण्हास हस्तकंकणे ॥ कोण्हास सुवर्णसांखळिया दिधल्या ॥ या प्रकारें उचित देणी दिधलीं ॥ या प्रकारें राया नागरस्याने विना कष्टि राज्य स्वहस्तिं केलें ॥ शके १२५४ मध्यें वर्षे १५ पावेतों नागरस्यान राज्य केलें ॥ शालिवाहान शके १२६९ पावेतों ॥ त्या नंतरे सोमवंशि क्षेत्रियाहि बहिस्कृत केलें व रायाने त्यांसि दंडिलें॥ तें चि ऐसें॥ जें राया नागरस्याचा पाळकपुत्र जइतचुरि होता ॥ त्याचा पुत्र नामे भागडचुरि ॥ द्वालिंबंद नाईकवडा येशवंत होता॥ बहुतां युद्धा मध्ये जयो पावला ॥ ह्मणोन रायाने सेनाधिपति केला ॥ तेणे किती येक कार्यें रायाचि बहुतें प्रकारें उतमान्वयें यथापुरुषार्थि सिद्धि पावविली ॥ ऐसें जाणोन राया नागरस्याने माहिचा कारभार दिधला ॥ तेणे करोन भागडचुरि

आपालि स्वतासी कामाविस करूं लागला ।। त्या नंतरें सेताची मोजणि केलि ।। काठि हात ७ सात करोन जमिन मोजिली ।।१२।। काठियांचा बिघा १ येक त्यास धारा ।। २ बिघे यांसि हारा १ त्याचे फेरे ४ राजश्रयतेने दिवानास द्यावे यैसा तह केला ।। येकसें अठाविसा बिघ्या चावर येक केला ।। या प्रकारें कामाविस करूं लागला ।। तें राया नागरस्यासि मानलें ।। की हा आपले हितार्थि उत्तम प्रकारें वर्तुणक स्वामिकार्ये तत्पर ह्मणोन रायाने अधिकाधिक मान्यता केलि ।। दिवसें दिवस प्रतिष्ठा वाढली ।। यैसि कामाविस वरुषें १२ अधिकोत्तर भरलीं ।। ते समई ईश्वरी ईछा म्हणोन भागडचुऱ्याचि बुद्ध फिरली ।। स्त्रिवेशनि प्रवर्तला ।। किल्येकां भल्या भल्यांच्या स्त्रिया बळत्कारें भोगिल्या ।। भल्या भल्यांच्या ईजति घेतल्या ।। किल्येकां पासोन द्रव्य घेतलें ।। आणि अभिळासवृत अद्भुत ह्मणोन गाऱ्हाणि राया नागरस्यास गेलिं ।। तेधवां अतिशयें गाऱ्हाण्यास रायान ह्मणितलें की आपण त्यास सिक्षा लाविन, तुह्मी चिंता न करणे ।। यैसिया प्रकारें भागडचुरि उन्मत होउन रायांचि हि चिंता मनी नाहिं ।। जीवास उदार ह्मणोन राजा हि मनि दचके ।। जर बळाढ्य आणि जीवास उदार ।। ह्मणोन राजा तयास दुख-वित नसे ।। परंतु आशंकित असे ।। जर यैसिया दुष्ट--कर्मास दंड करावा ।। परंत त्यासि जें महत्व दिधलें होतें ते पाळित गेला ।। यैसें असतां मालाड माहालिचा सोमदेशला सोमवंशि त्याचे बंधुचि स्त्रि अतिसुंदर जाणोन तजविज भागडचुऱ्यान मांडिलि ।। जर ते स्त्रि बळत्कारें हरावि ।। ह्मणोन तो सोमदेशला व त्याचा बंधु व घरांतिल पुरुष अवघे आणोन बंध केले ।। बंदिखानी दिवस पांच होते ।। तेधवां त्यास वर्तमान कळला जर आज्ञा भागडचुऱ्याची सिपायास जालि जर जावोन ते स्त्रि काढोन आणावि ।। ते आईकोन सोमदेशल्यान तावडतोब सेवक रवाना केला जर ते स्त्रि उताविळ पळवावि ।। तेधवां तो सेवक घरि जावोन समा-चार सांगितला ।। जर ऐसें होणार ह्मणोन ते स्त्रि त्या सेवके समागामि घेवोन कुऱ्हारास नेलि ।। तेथे रात्र क्रमिली ।। तेधवां हे सिपाये घरि येवोन पाहों लागले ।। तेधवां ते स्त्रिला न देखत ।। ह्मणोन भागडचुऱ्या जवळ गेले ।। जर ते पळविली ह्मणोन भागडचुरि कोपला ।। मग त्या सोमदेशल्याचा बंधु ते स्त्रिचा भ्रतार ताव-डतोब मारिला ।। तो वर्तमान कुऱ्हारास कळला ।। मग तेथोन माईस्या मात्रुपाशि नेलि ।। तेथे मास येक होति ।। तेधवां ते माईबापास चिंता वर्तलि ।। जर हे सगर्भ चहुमासाचि ।। हे येथे ठेविता कामा नये ।। जर प्रसूत--काळि प्रगट होईल आणि त्या भागडचुऱ्यास कळेल तर आपणास बाईट होईल आणि ईलाहि काढोन नेईल ।। ह्मणोन समागमि बाप घेवोन भिवंडी मामारपाशि घेवोन गेला ।। तेथे ते ठेविली ।। मग तेथ ते प्रसूत जालि ।। पुत्र जाला ।। तो वाढला ।। वरुषें १२ भरालि ।। तेधवां तो मुल शास्त्रविद्या--पूर्ण जाला ।। तेधवां येक दिवस त्या मुलास वर्तमान मातेन सांगितला जर तुझा पिता भागडचुऱ्यान मारिला ।। तें आईकोन तो

मुल मनी विस्मित होउन अभिमानि पडला ॥ जर त्याण्हे माझा पिता मारिला ॥ त्यास मी मारिन ॥ हा निश्चये करोन आपले कुटुंबि बैसोन विचार केला ॥ तेथवां ते सर्व मामारपक्ष त्यास साह्ये जाले ॥ हा अभिमन आमचा ॥ ह्मणोन दिवस दिवस आपले समंधि भाव त्यांस पाचारोन विदित केलें ॥ ते हि साह्ये त्या मुलास जाले ॥ मग थोरथोर ठीकाणि अवघ्याचि समंते घेवोन पत्र नागरस्यास पाठविलें ॥ जर मला देशलिक देसिल तर आपण पित्याचा सुड घेइन ॥ भागडचुरि मारिन ॥ तुझी आज्ञा असेल तर आपण तुझे चरण देखावयास येतों ॥ आणि जी सेवा भागडचुरि करित असे ते द्वीगुण त्या करावि ॥ ऐसें पत्र प्रविष्ट माहिमा राया प्रत जालें ॥ राये वाचोन अभिप्राव मनासि आणिला जें रायाचे मनि होतें तें तें चि होउन आलें ॥ जर दुरात्मा घातकि भागडचुरीयाचा परस्परें घात होईल आणि तो राजाज्ञा अन्य करिल ह्मणोन परस्परें कार्य होवोन येतें ह्मणोन रायाचे चित्तास आलें ॥ मग तें पत्र गुप्त प्रकारें मरोळ माहालि कान्ह देसल्यास पाठविलें ॥ तें पत्र त्या देशलें वाचोन पाहिलें ॥ त्यास हि संतोष जाला ॥ मग तें पत्र मालाड माहालिं साष्टि मध्यें दाखविलें आणि सर्व मिळोन निश्चये केला ॥ जर भागडचुरि मारावा ॥ ह्मणोन सर्वांचे समंते पत्र त्या मुलास पाठविलें ॥ तो मुल तेथिल आपला समुदाये समागमि घेवोन रात्रौ मरोळास आला ॥ तेथे सर्वांस भेटला ॥ तेथे जमा सर्व केला ॥ तेथोन रात्रि पाचवा देविस दबा मारिला ॥ उदय सोमवार महड–देविची यात्रा ॥ ते समई भागडचुरि मोहटे पाहाटि उठोन येसाव्यास गेला ॥ मुक्तेश्वरि स्नान करोन देवळा मध्यें देव–दर्षन घेवोन राहिला ॥ ते समई दर्शन घेवोन बाहेरि पडला ॥ समागमी बारा अश्वार स्वांग जिवाचे ॥ अवघे येतां देशकें काहाळा भेरि वाजविल्या ॥ हा हा शब्द होतां च हे अवघे तुटोन पडले ॥ तेथवां घाबरे प्रकारें बारा श्वारा मधोन दोन स्वार तेथे च ठार जाले ॥ मग ते दाहा जण आड घालोन पळों लागले ॥ ते अश्व चिखलांत न चालत ह्मणोन पाये उतारा जाले ॥ पळों लागले॥ तेथवां त्या मुलान निर्वाण घोडा टाकिला ॥ तो आला ह्मणोन उड्या खाडित टाकिल्या ॥ पोवंत चालिले ॥ ते च संधी त्या च खाडित होडे होते ॥ त्या वर तांडेल कैवर्तक बैसला होता ॥ त्यास त्या मुलान हडकिलें जर तो निळे पागडिचा भागडचुरि मारिसिल तर जें तुं मागसिल तें मी देइन ॥ माझें सत्यवचन ॥ यैसें यैकोन तो तांडेल बोलता जाला जर मला आपणा सारिखें कराल व जातित घ्याल तर मी मारितों ॥ अड तैसाच जाणोन त्याणे आपलें सत्यवचन दिधलें की कबुल केलें ॥ तेथवां त्या तांडलें पालकोइती ह्मणोन भागडचुरि मारिला ॥ सिर घेतलें ॥ आणि ते निजंग भागडचुऱ्याचे पैलपार जाले ॥ त्याचि कथा मोहोरे आहे ॥ मग त्या तांडलें भागडचुऱ्याचें सीर आणोन त्या मुलास दिधलें ॥ तें घेवोन सर्व जमा मुक्तेश्वरि आले ॥ तेथे खुशालि करीं आद-

रिली ॥ काहिक धर्म हि केला ॥ जर हा मुल लाहान वयसे मध्ये येशवंत जाला ॥ आणि पदाधिकारि सर्वपणे प्रौढि बाढली ॥ मग तेथे जातिभोजन आरंभिलें ॥ ते वेळि सर्व सोमवंशि आणि सूर्यवंशि मेळवोन भोजन आरंभिलें ॥ तो प्रसंग जाणोन हा तांडेल सोंवळे नेसोन तेथे आला ॥ ह्मणो लागला कीं भाष उतिर्ण करावि ॥ ते येसि कीं पंक्तिपावन मज करावें ॥ तेधवां सर्व बोलते जाले की आह्मि द्रव्य तु जे मागसिल तें तुज देतां ॥ आह्मा सारिसा करितों ॥ तें आईकोन तो तांडेल बोलता जाला कीं मला द्रव्याचि ईछा नाहि ॥ तस्मात् द्रव्य चिरकाळ नव्हे ॥ ह्मणोन आपलि भाष उतिर्ण करणे ॥ असेल तर जातित घेणे ॥ जे माझे पढोपेढिस राहेल ॥ ह्मणोन हा निश्चये ॥ येसा ठराव जाणोन कठोर वचन आई-कोन समस्त बिचारि पडले ॥ तेव्हा हा मुल बोलिला कीं मला भाष उतिर्ण करणे लागेल ॥ न केल्यास पुर्वज हांसतिल ॥ ज्याची भाख जाईल तो निरार्थक जन्मी ॥ आणि पूर्वजांस अधःपात ॥ ह्मणोन कबुल केलें ॥ तेधवां कित्येक ईश्वरिभये धरोन उठोन रिघाले ॥ काहिक त्यांचे समागमि गेले ॥ आणि बहुतांहि त्या मुलाचा अभिमान धरोन त्या प्रसंगि राहिले ॥ मग तो तांडेल पंक्तिस बैसविला ॥ येसे प्रकारें तांडेल जातित सरता जाला ॥ भोजन संपादलें ॥ मग तेथोन सर्व समुदाये तो मुला सहवर्तमान राजदर्शनास माहिम बिंबस्थानि गेले ॥ जावोन तो मुल राया नागरस्यासि भेटला ॥ त्यासि देखोन रायाने बहुत मान्य दिधला ॥ बैसकार जाले ॥ ते समई वर्तमान ॥ रायाने पृछा आदरिली ॥ कीं तुज देखोन फार संतोष जाला ॥ परंतु हा समाचार कळला कीं तुह्मी कैवर्तक जातित घेतला ॥ हे अनकृत्य आचरलेत ॥ कर्मबाह्य म्हणोन राजगुरु पोशनायक बोलावोन धर्मशास्त्र पाहों लागले ॥ तेधवां निवाडा जाला कीं अकृत्यास दंड कर्मबाह्य यज्ञोपवितें वर्जावि ॥ तेधवां त्या मुलान म्हणितलें कीं ज्यास भाष देणे ते पाळणे आह्मास ॥ ऐसा निश्चयो त्या मुलाचा जाणोन रायाने यज्ञोपवितें काढविलीं ॥ तो प्रसंग जाणोन क्षेपि फार जाले ॥ तें पाहातां राजा बोलिला कीं पंचरात्रि परस्परें निव-तिल ॥ मग त्या मुलास सीरपाव दिधला ॥ साशष्टिचा देसाय केला ॥ मालाड माहालचा फरमास दिधला ॥ देसलिकिचा विडा देवोन आज्ञा केली ॥ मग ते सर्व तेथोन मालाडास आले ॥ त्यांचे मागं प्रधानास आज्ञा केलि की त्या साशष्टि मध्ये जीतके त्या तांडला समागमे जेविले असतिल ते त्यांचि येज्ञोपवितें हरणे ॥ ते आज्ञा प्रधान वंदोन २०० अश्व घेवोन साष्टि मध्ये आला ॥ येवोन ढांढोरा पीटिला कीं जे त्या भोजनि जेविले असतिल त्याहि यज्ञोपवितें वर्जावि ॥ जे न येकतिल त्यांस राजदंड आणि कर्मबाह्य कैवर्तक ॥ येसें प्रतिपादिलें ॥ धर्मशास्त्र-संमति कैवर्तक कर्मबाह्य जाले ॥ छ ॥ या नंतरें राया नगरस्याचा जमातदार नामे यकांगविर सिंधा शेषवंशि नाथराव गोत्र हरिद्र कुळदेवता हिरब्राये उपनावं भंडारी ॥ त्यासि आणि राया नागरस्यासिं वैमानस जालें ॥ व्हावयास कारण ॥

त्याचे जातित कथला पडला होता की ठाकुर त्रवथे मानाचे आधिकारि ॥ तो ठाकुर गोत्र कपिल कुळदेवता काळबादेव त्याचा मान काढिला ॥ ह्मणोन या नाथरावास रायाने धिःकारिलें ॥ तो दंप त्या नाथरावें धरोन तुर्क पातस्या मुलतान मलिक आलावदिन वडनगरि होता ॥ त्यासी मिळोन मुलतान मलिक सर्क यांचे सैन्य घेवोन फितव्यासि मिळाला ॥ तेधवा निका मलिक सरदार सैन्यसमुदायें समवेत खरांड वरोन चाल करोन आला ॥ रात्रिचा समई चालावें ॥ दिवसा दवा मारिता॥ या प्रकारें पाताळगंगेश रिघोन कारवि डोंगरखांड अरण्या मधोन दवा देवोन जासुद रवाना केले ॥ आपण पायगावांचे मोरिया वर नवका सिद्ध केल्या ॥ रात्रभागे सैन्य मंभुजे वरि उतरले ॥ तेथे त्या बंदरा पासोन वारा खाड्या अरण्य वोवरियांचे ॥ तेथ १२ घटिका रात्रि मध्यें उतरले ॥ ते राना मध्यें दवा देवोन राहिले ॥ पुढे तेथोन कान्हेरिस येवोन राहिले ॥ तेथ बंदोबस्त करोन रात्रसमई अवघि ठाणि पालत करोन अवघि ठाणि मारिली ॥ तेथे युद्ध तुंबळ जालें ॥ तुर्क जयो पावला ॥ आणि नागरस्या पराजयो जाला ॥ शालिवाहन शके १२७० या समंति तुर्काण जाले ॥ तेधवां सवितावंश आणि सोमवंशि कौल घेवोन रयत होवोन राहिले ॥ छ ॥ नीमित्य कलयुगिं लक्ष्मीनारायणें कलिस भाष्य दिधली व हरीहर गुप्त जाले आणि ऋषि तेहि बद्रिकाश्रमास गेले ॥ आणि वशिष्ट राजगुरु तेहि गेले ॥ त्याहि सविता आणि सोमवंशि यांचि विद्या वोध्य केली ॥ हे साक्ष चिंतामणिकौस्तुभपुराणि आहे ॥ आणि हे कथा सूर्यवंशाच्यिया राजावळि मध्ये आहे ॥ आणि राया बिंबाचा सीका लिहिला आहे ॥ श्लोक ॥ नृप गोत्र भारद्वाजं ॥ बिंब नाम प्रतिष्ठितं ॥ महीपुरिकृतं राज्यं ॥ मम मुद्रा विराजितं ॥ १ ॥ हा राया बिंबाचा सिका ॥

मग तें राज्य तुर्कें घेतलें ॥ त्या सूर्यवंशियांसि त्याचा अमल खरा करार केला ॥ या प्रकारें निका मालिकान राज्य हस्तगत केलें ॥ आपण प्रतापपुरास जावोन राज्याचि कमावीस करों लागला ॥ जागोजागीं ठाणि बैसविलीं ॥ वसई मध्यें मलिक आलावदिन ठेविला ॥ पुढें सुलतान माहामद सर्क याणे पातस्या जवळ लेहोन पाठविलें जर जमी कोंकण घेतलें ॥ तेधवां पातस्याने लेहोन हुकुम पाठविला की त्या मुलकाचि कमाविस बरि करावी ॥ त्या उपर सुलतान आलावदिन मृत्य पावला ॥ त्याचा पुत्र मलिक आहामद पातस्या जाला ॥ त्या मध्यें कुफराणा होवोन भोंगळ्यांहि राज्य घेतलें ॥ त्याहि ते राज्य केलें वरुषे २० ॥ त्या उपर लोक त्याही फार पीडिले ॥ ते लोक मिळोन पातस्यासीं मुलुक देवोन पातस्या येवोन ते मारोन काढिले ॥ ते समई मलिक आहामदें अमल वर्षे २५ पावे तवं राज्य केलें ॥ त्या उपर पातस्या मृत्य पावला शालिवाहन शके १३१२ ॥ त्याचा पुत्र मलिक बाहादुर पातस्या जाला ॥ ते समई साष्टि मध्ये प्रतापुरास निका मलिक उंबराव पाठविला ॥ त्याणे माहिम बिंबस्थानि लोक आणि फौज-

दार पाठविलो ॥ दवण-प्रांति बाहादुरखान बाग्र करोन यावत् वसई प्रांत त्यास जाला ॥ त्याणे सींधे शेषवंशि बाहादरपुरि आणोन पुरा वसविला ॥ यावत् साष्टि मवोन वालिवा होवोन जमा सिंध्याचा आपले ताबिन ठेविला ॥ मलिक आलावदिन होता त्यास विसामा गड चांदुळवाडियेचा किलेदार केला ॥ त्याणे त्या पर्वता खालिं बुराणपुर वसविलें ॥ व दक्षणप्रांति अमदानगर किराठ वसविलें ॥ ऐसे राज्य करितां वर्षे ६४ भरलीं ॥ त्या नंतर निकामलिक या समागमे सैन्य देवोन रवाना केला ॥ त्याण्हे सीद माहाल विलाईत घेतली ॥ त्या वर देवागिरी काबिज केलि ॥ तेथे हि म्लेंछ जयें पावले ॥ रामदेवराजा आणि हेमाडपंत हे दोघे गुप्त जाले ॥ त्या उपर माहाराष्ट्र-राजा वरि पातस्याहि हल्ला जाला ॥ मग सर्व विलाथ यावत् देवागिरी राज्य दस्त केली ॥ त्या नंतरे मलिक बाहादुर प्रमादला ॥ ते समई श्रीपंढरपुरी नामदेव सिंपा हरिभक्त होता ॥ तो श्रीवाराणसिचे यात्रेस जातां पातस्याने बोलाविला ॥ हिंदु कुफराणदार ह्मणोन त्याचा अंत पाहों लागला ॥ त्यास खाने सानक कंदुरि मोहोरे ठेविली ॥ भक्ष ह्मणोन बळत्कार करों लागला ॥ ते समई श्रीविठल भक्तकैवारि ॥ त्या कंदुरिचि पुष्पं जाली ॥ ते करामत देखोन पातस्या आश्चिर्य पावला ॥ तेधवां नामदेवा प्रत पातस्या विचारों लागला ॥ जर तु जातिचा कोण होसी ॥ त्याणे सांगितलें की माझि जात सिंपा ॥ ऐसे बोलिलें ॥ मग तो नामा दस्त केला ॥ त्याचा आशिर्वाद पातस्यासि फळला ॥ तो पातस्या प्रमादला ॥ त्याचा पुत्र सुलतान तोगिल ॥ त्याचा पुत्र सुलतान पेरोजस्या ॥ येसे साता वर्षा मध्यें तीन पातस्याहि जाले ॥ तदनंतरें प्रतापस्याचे राखे पासोन पुत्र देवशा ॥ त्याचा पुत्र रामस्या ॥ तो रामस्या फुंड होवोन १५७ गावं वसविले ॥ ते समई त्या प्रांतिचें नावं रामनगर ठेविलें ॥ तो तेथिल राज्य युगमहिमे स्तवं करों लागला ॥ तदनंतरें फिरंगि या प्रांति शालिवाहन—शके १४२२ तथा फिरंगि शके १५०० येक हजार पाचसे मध्ये पुर्तुगाला होवोन तारवें दोन घेवोन आले ॥ त्या तारवाचि नावें ॥ येक सीनोर देसकोर व दुसरियाचें नाम बोजिजुझ ॥ हीं दोन तारवें घेवोन कापितान लोरेस लुइस देताव्र कापितान या प्रांति आला ॥ त्याण्हे प्रथम येतां च कोचि बंदर कवज केलें ॥ तेथोन गोवें घेतलें ॥ तेथोन तारवें अरमाद घेवोन आला ॥ शालिवाहन—शके १४३४ तथा फिरंगि १५१२ मध्यें दवण प्रांतासि आले ॥ तेथोन अमदारति करों लागले ॥ बेवसाया मुळें बाहादुरखाना समागमे मैत्रिकीचा अर्थ विशेषात्कारें दाखवोन फेतोरि वसईचे बंदरि करावि येसा प्रसंग उद्भव केला ॥ आणि अर्थ जखातिचा अधिकोत्तर दाखविला ॥ ह्मणोन जागा उत्तम फेतोरी घालावया कारणे ॥ त्यास उदिमा मुळें पातस्याह्मास हासल होईल आश्या जाणोन बाहादुरखानास तहकिकता मनास आलें जे यास फेतोरि द्यावी ॥ मग बाहादुरखान मिळोन त्या फिरंग्यासि जागा दांडाळया तळया वर नेमिली ॥

सर्व मिळोन तेथे त्या तळया वर नागेश महातीर्थ तेथें घेरा देवोन आईति भिताडे होति त्यास काम लावोन मजबुद केलि ॥ वस्ति फिरंग्याचि जाली ॥ अमदानि करित चालिले ॥ प्रीतिचि लक्षणें बहुत प्रकारें दाखविलीं ॥ ऐसि वर्षे तिन पावे तवं समाधान धरोन मजबुदी अधिकोत्तर करित चालिले ॥ भांडि सोळा त्या फेतोरि वर आणोन ठेविलीं ॥ आणि ते प्रसंगि बाहादुरखां दवणेस होता ॥ तेथ तो कापितान त्याण्हे हेर ताहाक्किक जाणोन गोमताचळा होवोन आरमाद आणिलें ॥ मग आपण त्या आरमादास ईस्यारत नीट देवोन आपण भेट घेवोन बाहादुरखानास भेटविली ॥ आपण जावोन त्यास अतिमान्य चाहुडि होवोन जाहाजा वर नेता मार्गि दगा दीधला ॥ तैसे च अवघे दवणे उतरले ॥ मारामारि करोन दवण घेतली ॥ तेथोन कांहिक समुद्रमार्गि काहिक पायेमार्गि वसईस आले ॥ तेथे होते ते हि पराभाविले ॥ राज्य अवघें घेतलें ॥ यावत माहिम बिंबस्थान पावे तों काबिज केले ॥ कर्तव्य जांवदे आलमेद वसईस फेतोरिस होता कापितान त्याण्हे केलें ॥ त्या दिवसा पासोन फिरंगि लोकांचि कब्जजाद जालि ॥ तुर्क पातस्या पराजयो पावला ॥ त्या उपर कितेक लोकां सवे समाधान दाखवोन ज्यास जे वस्तु पाहिजे त्यास ते वस्तु दिधली ॥ येणें प्रकारें सर्व लोकां सवे समाधान रक्षुन प्रीतीची लक्षणे दाखविलीं ॥ ऐसिया प्रकारें मुलक कबजदस्त केला ॥ ज्यांची वतने त्यांस दीधलीं ॥ ऐसिया प्रकारें चालवित गेले ॥ धर्म ज्याचा त्यास चालता केला ॥ ऐसें चालविलें वर्षे २५ ॥ वरुषा पंचविशि भय निर्माण केलें ॥ कीं जो धर्म आपला करिल त्यास राजआज्ञा कीं गोमताचाळिं बंध पाठउं ॥ त्या भया स्तवं कितेक दुर वोसरले ॥ कितेक धरोन गोमांताकि पाठविले ॥ व आपला स्वधर्म स्थापिला ॥ ते समई अवघ्यांस अर्थ कळला कीं हे फिरंगी ॥ हा शब्दार्थ अर्थि निवडावा ॥ ज्ञानि पाहावा ॥ या उपरी रामनगराचिया राज्याचे गावं दवण पासोन यावत् केळवि मणोरे आसेरि माहिम पावे तवं सिवसेजार लागला असे ॥ तेथे फिरंग्याहि नित्य घसघस लावोन केळवें माहिम मणोर कित्येक गावं कबज केले ॥ त्या नंतर रामनगऱ्याणे आपले ठाइं विचार केला ॥ कीं फिरंग्यासि भांडतां पुरे पडत नाही ॥ ऐसा निश्चये करोन मग देस्तिकिचा अर्थ केला ॥ हेजिब वसई फिरंग्या जवळ पाठविला ॥ रदबदल करितां जे गावं फिरंग्याहि घेतले होते ते पुन्हा त्यास दीधले ॥ त्या गावांचि चौथाये रामनगरचे रायास द्यावी ॥ पुढे राहिले गावांचे वाटे न जावें ॥ ऐसा तहनामा करोन पत्रें आणि तहनामा पुर्तुगाला पातस्यास रवाना केला ॥ कितीयेक रीतिनें रायाचि सीपारस फिरंगि याही लिहिली होति ॥ त्या वरोन पातस्यास समाधान पावोन रामनगरचे रायास पातस्याने पत्रें पाठाविलें ॥ कीं हरयेक समई बलकुबल पडीलिया वर तुह्मी मदत करोन दोस्तिकीची सरीयेत करावी ॥ व गोवेच्या विजरेलास आज्ञा पाठाविलि कीं त्या रामनगरचे राज्यास मज समांना बहुमान्य करोन समाधान चालवावें ॥ तदनंतरें

जवारकर कोळि हा रामनगरचे रायाचा उंबराव होता ॥ त्याण्हे फितवा करोन कितियेक गावं कबज केले ॥ युद्ध करितां त्या कोळियाचें बळ बहुत जाणोन राम. नगऱ्या उगा चि राहिला ॥ जे गावं कोळ्याने घेतले त्या गावांचे राज्य कोळि करों लागला ॥ आणि वैरसमंव दोघां मध्यें चालत असे ॥ या प्रकारें ही हाकिकत असे ॥ छ ॥

त्यानंतर तिसरा सेजारि पटेकर राजा पूर्वि निजामस्या कडिल लसकरचा सरदार होता ॥ ते समई गनिमास युद्ध जालें ॥ तेधवां याणे दों हाति दोन पटे घेवोन घोडिया वरि श्वार होवोन लढाये तुंबळ करोन गनिमास पराभाविलें ॥ तेधवां पातस्या निजामस्याने मेरबान होवोन हा मुलुक या पैकि गावें १६० इनाम्म देवोन तेथिल राजा करोन फरमाना दिधला ॥ ह्मास ते गावं फिरंग्याचे सिवं—सेजारि ह्मणोन त्यासी ही निरंतर घसघस लावोन त्या मधोन फिरंग्याहि जोरावरिने प्रथम गावं ७६ कबज केले ॥ परंतु पटेकर सल्लासि आला नाहीं ॥ आपले जमावा सहित युद्ध करों लागला ॥ त्या उपर आणिक गावं फिरंग्याहि कबज केले ॥ या करितां फिरंगि जोरावर ह्मणोन पटेकर सल्यासि आला ॥ त्याण्हे हेजीब पाठविला ॥ विजुरे जवळ रदबदल करितां तह केला कीं तुह्मा कडे गावें ४४ राहिले ॥ त्यांतिल गावें २२ तुह्मी घेणे ॥ त्याचा उपभोग तुह्मी सुखि करणे ॥ हरयेक पदार्थे आमचे तर्फेन उपद्रव होणार नाहि ॥ बलकुबलेस वसईस हरयेक समई तुह्मी आपले लोकां सहित रक्षावें ॥ यैसा तह मान्य जाला ॥ तीं पत्रें पुर्तुगालास पातस्या जवळ पाठविलीं ॥ येथोन वीजुरेन जो तह केला त्या बरहुकुम पतेंत पातस्या हस्तिचे पटेकरांस आले ॥ यैसें सख्यत्व चालतां गावांचे सिंवेवरोन कच्चाट जालें ॥ ते कळ पेटली ॥ मग फिरंग्याहि अति माव पदार्थ धरोन मुळि च राज्या वरोन काढिला आणि त्याचे गावं २२ ते हि जोरावरिने फिरंग्याहि घेतले ॥ या प्रकारें पटेकराचि हकिकत असे ॥

श्रीगणेशायनम: । स्वति श्रीनृपविक्रमार्क समयाति संवत १५३५ अंकि पंधरासें पंचतिस ॥ चैत्रमास शुद्ध १ गुरुवार तद्दिनी अहिनळवाडा पाटण तक्त ठाणे—कोंकण माहिम बिंबस्थान विलायत नाइकि या पैकि सरकारभार बाहादुर पुरा ॥ मालिक माहामद फौजदार व ढोकखान पातस्याहि दिवान ॥ व सरदेसाई राजश्री आबाजि नायक व रघुनाथपंत कावळे पैठणकर अमलदार प्रगाणे साशष्टि ॥ आणि सोमदेशले व हरदेशले पद्माक्ष गोत्र कुळदेवता जोगेश्वरी उपनावें ठाकुर ॥ पुर्ववास पैठण ॥ सुखवास वस्ती मालाड ॥ याही दिवानि प्रवाणा केला ॥ मजकुर यैसाजे ॥ राजश्री आबाजी नायक स्यामक्षेत्रकर सांडोरे आणि रघुनाथपंत कावळे पैठणकर आमचे सरदेसाये व कुळगुरु ॥ तर तुम्हास ठाउकें कीं सोमवंशि साशष्ट कुळें नामांकित राजे आणि साशष्ट गोत्राचे व त्याचि देवतें व त्यांचा स्वधर्म तो तुम्हास ठावका ॥ यैसें असतां तया वंशिकि जे आहत ते कोणकोण

त्यांस सभेमध्यें मान्य करावें ॥ आणि त्याहि कोण्हे मर्यादे मध्यें असावें हें सर्व सविस्तर येथे दिवाना मध्यें सभेस सन्मुख लेहोन महमझर करावा ॥ कां जर तुह्मी त्या सोमवंशियाचे आणि आह्मा द्वादश गोत्रांचे हि कुळगुरु आणि चवदा प्रगाण्याचे सरदेसाये ॥ पुर्वापार तुह्मासी सर्व ठावकें आहे ॥ आणि या वंशि उत्पति जालि आहे ते हि सर्व तुह्मास दाखल आहे ॥ ह्मणोन अर्ज आमचा कीं तुह्मी कृपा करोन हे उत्पतिचा निवाडा सांगावा ॥ साकल्य कोण कोणाचा, त्यास मान्य कोणता, हें साकल्य वीदित करावें ॥ त्या प्रमाणें चालिलें जाईल ॥ हें आईकोन वेदमूर्ति आबाजि नायक आणि रघुनाथपंत कावळे पैठणकर सरदेसाये मिळोन लेहोन महझर केला ॥ तो यैसा जे ॥ सोमवंशि आणि सूर्यवंशि याचे आह्मि कुळगुरु हें सत्य ॥ आणि चवदा प्रगाण्याचे सरदेसाये ॥ पैठाणा होवोन आल्या उपर सुलतान आलावदिन पातस्या आले ॥ त्यासि आह्मि जावोन भेटलों ॥ मुलुक जमि आदाये कामाविस सर्व सांगितली ॥ आणि देशमुखि खरि केलि ॥ ते च किताब लेहोन घेतली ॥ ते आज पावे तंव चालत आलि ॥ तर आतां तुह्मी पुसता तें सांगतों ॥ सर्व सावध असा ॥ छ ॥

राजश्री बिंबशा स्वामी या प्रांतास आले संवत ११२५ ॥ बाबरशा पातस्याचे भयें करोन ॥ हा देश स्वामी बिंबास प्राप्त जाला ॥ स्वदेश सांडोन परदेश काबिज करोन माहिमा राज्याधिकार केला ॥ माहिमा राहिले ॥ ते समई समागमे अष्टप्रधान व बारा उंबराव त्यांचि नावें कोणकोण ॥ मुख्य राजगोत्र भारद्वाज कुळदेवता प्रभावती ॥ पुर्वराज गोरखपुर ॥ त्याचे मुख्य प्रधान ॥ परशरामराव गोत्र वृद्धविष्णु उपनाम वाणाध्व पूर्वराज्य कडेमाणिकपुर ॥ त्यांचे जामात शंकरराव सूर्यवंशि पूर्वराज मातापुर पाटण ॥ पंडितराव राजपंडित आणि रघुनाथपंत कावळे पैठणकर राजकुळगुरु गोत्र भारद्वाज कुळदेवता येकाविरा मातापुर प्रमाई वाजनीस स्याखा कात्यायनि शुत्र वाचन्हि शाखा माध्यान्दीनभेद ॥ आणि आबाजि नायक मुख्य सेनाधिपत्य यजुर्वेदि माध्यादीन–भेद वाजस्नि शाखा कात्यायनि शुत्र उपनाम सांडोरे श्यामक्षेत्र पूर्वठिकाण ॥ रघुनाथपंत कावळे समयुक्त कर्मस्थान पैठण, दुर्गाडि वर वाडा, माहाजन वृति गाविची, सोमसूर्यवंशिचे कुळगुरु ॥ आणिक बाबरे पातशायाने सरदेशमुखि विलायेत घेवोन दीधलि राजश्रीस सही ॥ छ ॥ आणिक श्रीपतराव आणि भास्करराव सूर्यवंशि गोत्र मांडव्य राजाज्ञा गोविंदराव तेजप्रभास गोत्र कौंडण्य हे अष्टप्रधान तयांसि मान्य सभेमध्ये सही ॥ सन्मुख अनुक्रमे लिहिल्याप्रमाणे ॥ आतां सोमवंशि साशष्ट पदकि त्यांचा उद्धार ॥ अनुक्रमे करोन बहुमान राजसभे मध्यें विवाहि मोहोत्सवि ॥ मुख्य पदें मालाड ॥ सोम देशले तपे मरोळ ॥ हर देशले पद्माक्ष गोत्र कुळदेवता जोगेश्वरी हे मुख्य मान्ये यांसि ॥ या देशायांसि येकयकासि च्यार च्यार चौधले ॥ त्यां मागे तया देशाचे वाणि ते कोणकोण ॥ पोईसरकर जैतराव वशिष्ट गोत्र कुळदेवता

जोगेश्वरी येथिल पद ह्मातरे हे पहिले चौघले ॥ दुसरा कृष्णाजित येकसारकर गोत्र आत्रि सास्वन गोत्रि कुळदेवता महालक्ष्मी पुर्ववास करविर ॥ हे दोघे चउघले नावाणिक ॥ मालाड तपयास आणि मरोळ तपयास ॥ मरोळ तपयांत माहार ॥ मालाड तपयात येकसार ॥ हैबतराव आणि हनुमंतराव ॥ गोत्र गौतम कुळदेवता येकविरा ॥ चौघले तिसरे ॥ आणि पांप राउत वंशनाम राउत गोत्र पद्माक्ष कुळदेवता येकविरा आंकुलवलि कडु पालवण ॥ आणि परशराम गोत्र हरित उपनाव चोधरि सुखवास कांढोळ ॥ हे चौघले ४ ॥ तपे मरोळ गारसाहाणी गोत्र सात्विक ॥ आणि प्रतापुरकर स्वनल्प गोत्रि केशव ह्मातारे ॥ आणि वांदर बाण राउत राजण–पाखाडि गोत्र भृशुंडि ॥ कडु पालवण मुग ह्मातारे गोत्र शिश्री कडु पालवण ॥ माजगांवकर जोग राउत भार्गव गोत्रि चौघले ४ प्रांति मरोळ सही ॥ यानंतर स्वामिहि कोळंबा गोत्रि वंशिचे च्यार पुरुष व शिळंबा वंशिचे च्यार पुरुष त्यांस मुतारकर्म बळत्कारें सिखविलें ॥ कां जर राजसेवा घडित माहालें घरें करावि ह्मणोन ॥ तरि राजश्री स्वामीहि सर्वास आज्ञा केलि कि हे अष्टपुरुष तुह्मा मध्यें येतिल ॥ तरि यांसि बहुमान चौघल्यां मागां करावा ॥ तरि हा दिवस परियंत तुह्मी आह्मि चालवितोचि असों ॥ आणिक यांस बहुमान ॥ येसा जर कोण्हि कोण्हि जातिचा हें कर्म मुतारपणाचें सिखला तो अथवा सरदेशाये अथवा देशाय व कोण्ही विद्या करिल त्याणे गुरुदक्षणा विडा शक्तिनुसार या पुरुषांचे वंशास द्यावा ॥ आणि बहुमान करावा ॥ ऐसें गोसावियाहि सर्वांस श्रुत केलें ॥ तेव्हां अनंत देशले व देवदेशले हे दुर्वांचे पुर्वपक्ष केला तो येसा ॥ जर राजश्री कृपावंत होवोन यांसि थोरपणाचि बकसिस केली ॥ तरि यांसि योग्य आहे ॥ परंतु स्वामी माहाराजा मागां पुढां कोण्हाचि कार्य गत होईल आणि कोणकोण कोण्हे पदासि पावतिल ॥ तरि आमची विज्ञापना की बहुमाना विसी चौघालियां मागें यास बहुमान करावा ॥ राजसभे मध्ये व विवाहि व मोहोत्सावीं व शोमनि बहुमान करावा ॥ परंतु येक आह्मि मागोन घेतों स्वामीजवळ की जर आमचे वंशिचा कदाचित कोण्हि हे विद्या अभ्यासिल कदाकाळानुसास जाले तरी यांचे वंशिकीं गुरुदक्षणा न मागावी ॥ आणि तो त्या कुळिचा ह्मणोन त्यासि बहुमान करावा ॥ कां जर पुर्विल बहुमान प्रमाणे वर्तणुक करावी ॥ कां जर धर्मशास्त्रि स्मृति–महार्णवि निर्वाह आहे ॥ ऐसा कीं राजश्री प्रधान कुळगुरु असतां पुरुष याणे कीं कोण्हेहि कडोन कोण्हे ही विद्या अभ्यासिली तरि गुरुदक्षणा न द्यावी ॥ बकसिस भाग्यानुसार द्यावें ॥ विवंचना ॥ श्लोक ॥ राजगुरु तथा मंत्रि राजवंश नृपोत्तमः ॥ न शिष्यत्व कस्यैव गुरुत्वं तस्य विराजते ॥ १ ॥ या स्तवं स्वामी माहाराजि त्या अष्ट पुरुषांसि पाचारोन आज्ञा केलि की तुह्मी आज पासोन कोण्हेके सभे मध्यें बहुमान राजश्री रघुनाथपंत कावळे पैठणकर सरदेसाई राजकुळगुरु व सोमदेशले तपे मालाड व हरदेशले तपे मरोळ हे त्रिवर्ग सर्व सभे मध्यें देशल्यां

चौघल्या मागें बहुमान तुह्मास करितिल ॥ हे राजश्री स्वामिची बकासिस ॥ या नंतरे कोण्ही जातिचे या प्रांति तहद परनाळा अहद अमलाद जे कोणि सुतारविद्या करितिल ते तुह्मास बैसणपटि व गुरुदक्षणा देतिल ॥ खेरिज देशाये वंश व अष्ट चौघले व कडु पालवण याचे वंशिचाकोण्हि येक तुह्मा जवळ येवोन विद्या संपादिलि अथवा कोण हि विद्या करोन आला तरी तुह्मी त्याचिया पुर्विल पदा प्रमाणे बहुमान करावा ॥ ह्मणोन स्वसिक्याने पत्र लेहोन दिधलें ॥ आणि राजश्री रघुनाथपंत कावळे राजकुळगुरु यांचे चरणकमळि परस्परें हात ठेवोन विडे वांटिले ॥ हा वर्तमान पुसिल्या प्रमाणे श्रुत केला ॥ मग ते राजसभे मध्यें चौघल्या भागां केळंबा—वंशिक पुरुषासि बहुमान जाला ॥ मग निश्चयात्मक अष्टपुरुषाचे वंशिकांसि सांगितलें कीं आज पासोन कोण्हि हे विद्या करितिल त्या पासोन बैसणपटि व गुरुदक्षणा घ्यावी ॥ तेव्हां हे विद्येस आज्ञा द्यावी ॥ पद्मदेशाले व दाददेशाले खोति तपे मालाड व तपे मरोळ आणि अष्ट चौघले यांचे वंशिचा कोणि विद्या अभ्यास करिल तरि तुह्मासि त्याचे गुरुत्व नाहि ॥ कां जर हे जाति मध्यें वरिष्ठ.॥ प्रथम मान्याधिकार यांचा ॥ हे बैसणपटि आणि गुरुदक्षणा न देतिल ॥ कां जर स्वप्रजेचे शिष्यत्वास योग्य नव्हे ॥ ऐसियासि कोणि स्वभाग्ययोगे करिल तरि धर्मशास्त्रि मयुरग्रंथी सांगितलें असे ॥ वचन ॥ श्लोक ॥ स्वगुरुन्मान्यहंतारो श्रेष्टश्च मानहंतकाः ॥ एवं दुष्टात्मको नष्टो स्वगोत्र नरकं पचेत् ॥१॥ या नंतरें सूर्यवंशि राजश्री स्वामिचे वंशिक आणि प्रधानवंशिक सर्व द्वादशगोत्रान्वित प्रभु भानुकुळमंडण यांसि सर्वत्रापि बहुमानासि सर्व सभे मध्यें मुख्यत्वीं निश्चयात्मक आहे ॥ परंतु वर्णानां ब्राह्मणो गुरु येदर्थि बोलणे नलगे ॥ या नंतर पंत्परत सोमवंशि कार्तवियोंद्भव जे आहेत त्यासी भिन्न गंधपात्र करोन गंधार्चन करावें ॥ ते लक्ष्मीविष्णोद्भव आहेत ह्मणोन सूर्यवंश व सोमवंश या दुवांघी समागमे सुखें गंधार्चन करावें ॥ ते च समंति कदाचित पांचाळ आले तरि त्यासि ही बहुमान करावा ॥ आणिक सिंधे शेषवंष ह्मणोन मांडारि आले तरि सुखें गंधार्चन करावें ॥ नीमित्य शकाधिकार ह्मणोन उक्त आहे । यदंन्यायें पांडवि अश्वमेध केला ते समई धर्मरायानें सभापुजन केलें ॥ हे सही ॥ हें पुसिल्या प्रमाणे हा लेख केला॥ दामोदरराब वृद्धविष्णुगात्रि ते सभेस होते॥ सही॥ देवदेशाले सही॥ अनंतदेशाले सही ॥ आबाजिनायक सही ॥ रघुनाथपंत कावळे सही ॥ अष्ट चउघले सही ॥ मुख्य प्रधान सही ॥ हा पंत राजमुद्रा व प्रधानमुद्रा म्लेछार्णव राष्ट्र जालें ते समई लीहिला॥ सही ॥ हा असत्य मानिल तो नरकि पचेल । साक्षयुक्त लीहिला आहे ॥ संवत् १५२५॥ इति वंशावळि संपुर्ण ॥ शके १७४१ प्रमाथिनाम संवत्सरे माहे वैशाख—शुध्द प्रतिपदा रविवासरे ते दिवशीं वंशावळिलेख समाप्तः ॥ हस्ताक्षर बालजी पाटिल सिंधे शेषवंशि वस्ती वसई बाहादरपुरा॥ हे वंषावळिची पोथी राजश्री हीराजी रामजी राउत सिंधे शेषवंशि वस्ती वसइ बाहादरपुरा यांचि असे ॥ ॥ पत्रे सुमार ॥ ६९ ॥